श्रीगोपालकृष्णाय नमः



भगवद्भक्त परशरामकवी कृत

बोधपर व शास्त्रोक्त

# परशरामी-लावण्या

भाग १-२-३.

हें पुस्तक,

संग्राहक वि. ना. कोल्हारकर यांचे कडून

तुकाराम पुंडलीक शेट्ये,

बुकसेलर आणि पब्लिशर.

यांनीं

सर्व हक्कासह विकत घेऊन,

'एस्. रमण' छापखान्यांत छापून

माधवबाग-मुंबई येथें प्रसिद्ध केलें.

सन १९२४ इसवी.



किंमत १॥ रुपया.

# कै. वा. परशराम.

वर लिहिलेल्या नांवावरून साहजीकच सदर कवीचें चरित्र खालीं रेखाटलें असेल असा वाचकांचा तर्क होण्याचा संभव आहे ! म्हणून प्रथमारंभींच आह्मी असा इषारा देतों कीं, हें त्याचें चरित्र नसून त्यासंबंधीं दोन शब्द लिहिण्याचा आमचा मानस आहे ! वास्तवीक सदर कवीचें चरित्र त्याच्या कवितासंग्रहाला जोडायला अवश्य पाहिजे होतें. परंतु सदरहू कवी हा सामान्य दरजाचा कवी होऊन गेला नसल्यानें त्याचे साग्र चरित्र लिहावयाचें म्हटलें म्हणजे त्याच्या कवितासंग्रहा इतकेंच तें पुस्तक मोठें होणारें असल्यानें आम्ही तें स्वतंत्र पुस्तकरूपानेंच अगर जमल्यास पुढील अवृत्तीचे वेळीं कवितासंग्रहासच जोडून प्रसिद्ध करण्याचें योजिलें आहे ? तूर्त त्याची थोडक्यात माहिती देऊन वाचकांनी रजा घेण्याचें करतों.

परशराम कवीचा जन्म वावी गांवीं शके सोळाशेंच्या अखेरीस झाला असावा असें आम्हांस मिळालेल्या माहितीवरून समजतें. ( नक्की शक समजण्यास विश्वासनीय पुरावा आम्हांस अद्यापि मिळालेला नाहीं. त्याच प्रमाणें मृत्युचीही स्थिती ! ) मरण समयीं त्याचें वय ८०–९० च्या दरम्यान असावें असें मिळालेल्या माहितीवरून समजतें.

परशराम हे एक जातिवंत प्रतिभावान कवि होते ! त्यांची प्रसिद्धि सर्व देशभर झाली म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु ते गंगथडीचे रहाणार असल्यामुळें त्याभागात त्यांची प्रसिद्धि फार झाली, इतकेंच नव्हे तर गंगथडी व पेहेर थडी ( प्रवरा किनारा ) हद्दींतील अगदीं दोन घराच्या खेड्यांत सुद्धा परशरामाचें नांव सर्वतोमुखीं झालें आहे. लावण्या, पोवाडे अगदीं नवरस परिप्लुत करण्या विषयीं जसा त्यांचा हात खंदा असे, तसें ते म्हणण्यातही पहिल्या तोडीचे अगदीं फर्डा होते.

हे मूळ वावी गांवचे राहणार. वावी हें गांव राजाची वावी या नांवानें प्रसिद्ध आहे १८५७ च्या बंडांत जे जंगली महाराज प्रसिद्ध होते त्यांच्या सख्या बंधुचा वंश अद्यापि तेथें आहे. त्यांची तेथें पाटीलकी असून ते तेथील जमिनदार आहेत. असो;

परशराम जातीनें शिंपी होते. वडिलांची शिवणकला त्यांनाही लहानपणींच अवगत झाली. त्यावेळीं शिवण्याची यंत्रकला हल्लीं इतकी घरोघर शिरली नव्हती. जाडें दाणगट कापड देशांतच पिकत असून तें टिकण्यास भक्कम असे. हल्लींसारखा एक डझन शर्ट दर माणसीं करण्याचा तत्कालीन प्रघात नसल्यामुळें एकाद्या शिंप्याचें देखील खेडेगांवीं पोट भागण्यास केवळ शिवणकाम पुरत नसे. असो; ही विद्या जशी परशरामांनीं आपल्या अल्पवयांत संपादिली तशीच लेखनकलाही त्यांनीं त्या खेडेगांवच्या मानानें उत्तम संपादिली होती. असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यावेळचें शिक्षण म्हणजे लेखन, वाचन आणि तोंडी गणित. पण हेंच आमच्या आंताच्या मॅट्रिकच्या विद्येसही जड पडेल म्हटल्यास वावगें होणार नाहीं अथवा मुख्य निरीक्षण करणाऱ्यास अतिशयोक्तिही वाटणार नाहीं. त्यांच्या बालवयांतच ज्ञानदेव, नामदेव तुकाराम आदि कवींचे ग्रंथ त्यांनीं वाचून काढले होते. आणि म्हणूनच त्यांच्या प्रत्येक कवितेंत तुकारामांचे वेंचक शब्द ज्ञानदेवाचा भारदस्त शृंगार व नामदेवांचा लडिवाळा करुणरस, ठिकठिकाणीं झळकून दिसतो हें कुणाही मार्मिक वाचकास तेव्हांच कळेल. परशरामाचे भारत भागवतांची भाषांतरें आणि रामविजय, हरिविजय, पांडवप्रताप ग्रंथही पूर्व वयांतच वाचून झाले होते. पुढें ज्ञानेश्वरी व दासबोध यांचाही अभ्यास त्यांनीं कांहीं दिवस केला. असें म्हणतात कीं, परशरामांनीं आपल्या वयाच्या सोळाव्या वर्षीं सात दिवसांचें ज्ञानेश्वरीचें कडकडीत उपवासित पारायण केलें असतां [ हें पारायण मंजूर येथें गंगेच्या तिरीं जंगलांत असलेल्या विठोबाच्या पडक्या देवालयांत केलें असें म्हणतात.] ती विठ्ठलाची मूर्ति त्यांच्याशीं बोलली. त्याचवेळीं त्यांना आपल्या तीन अवतारांची आठवण झाली. हें पुढील लावणीवरून दिसून येईल. तेव्हां त्यांनी पुन: आपली अभंग करण्याची इच्छा दर्शविली. त्यांवर विठ्ठलाचें उत्तर असें आलें कीं " आम्ही 'अभंग' होऊन बसलों आहोंत. आतां आमची लावणी करा " त्याचवेळीं परशरामांनीं वंदन करून तिथें पुढील लावणी केली. " **करिन लावणी अलक्ष वेंचुनी देवा पंढरिराया । अभेद गाणें नामें तुझिया । गाइन मी ताराया ।** अशी ही चार कडव्यांची लावणी तेथेंच करून स्वारी घरीं परत वावीस आली. कोणी असेंही सांगतात कीं,

देवीचे मायेगांवीं गोदातटीं परशरामांनीं वरील पारायण केल्यावर त्यांना विठ्ठलाचा साक्षात्कार होऊन लावण्या करण्याचा अनुग्रह झाला. कसें का असेना; परंतु परशराम हा प्रासादिक कवी होऊन गेला एवढें मात्र खरें. आतां कोणी असेंहि म्हणतात कीं परशरामास विठ्ठलाचा साक्षात्कार झाला म्हणून परशरामानें आपल्या लावणीच्या प्रत्येक शेवटच्या चरणास 'नामें विठ्ठल' ही संज्ञा आपल्या नांवास जोडून आपला विनयशीलपणा व्यक्त केला. तर कोणी असें म्हणतात कीं, परशरामास ही कवितास्फूर्ति प्रेरित होण्यास कुणी विठ्ठलनामी नांवाचा मनुष्य कारणीभूत झाला. म्हणून परशरामानें आपलें नामाभिधान त्याच्या नामाच्या किरीटानें मंडित केलें. परंतु या दुसऱ्या लोकवार्तेवर मुळींच विश्वास ठेवतां येत नाहीं. कारण याला सबळ पुरावा उलट बाजूनें परशरामाच्याच वर दिलेल्या कवितार्थावरून पुरे होतो. अर्थात् त्यांच्याच लावणीच्या आधारानें चिकटून असलेली पहिली लोकवार्ता खरी ठरते. परशराम घरीं आल्यावर त्यानें आपल्या मातापितरांस वरील हकीगत कळविली व आपण तमाशाचे उद्योगास लागला. परशराम पूर्ण प्रसिद्धीस येई पर्यंत त्याच्या आई बापांस आणि सासूरवाडीच्या मंडळीस ही गोष्ट पसंत पडली नाहीं. त्यांनीं त्यांना तमाशा न करण्याबद्दल बराच विरोधी उपदेश केला. परंतु त्यांनीं आपला झालेला निश्चय मागें फिरविला नाहीं. आणि म्हणून भाषासौंदर्यानें सजलेली, गोड शब्दांनें भरलेली अप्रतीम कविता—लावणी महाराष्ट्रीयांस पहावयास सांपडली.

देवपूरकर बाबा भागवतांना परशरामांनीं आपले मोक्षगुरु केले होते, पण हा अनुग्रह त्यांनीं कधीं घेतला हें कांही नक्की समजलें नाहीं.

परशरामाचे वेळीं प्रसिद्धीस आलेले असे कांही राजाश्रयी कवी महाराष्ट्रामध्ये होते. त्यांत आनंदफंदी, होनाजी बाळा, सगन भाऊ, बाळा बहिरु, नथूबाबा ( सौंदाणेकर ) इत्यादि शाहीर प्रसिद्ध होते. त्यांतही परशरामाच्याच कवितेची सरसता सर्वांनी कबूल करून जसा मोरोपंतांस कवितांचा शिक्का मोर्तब मिळाला होता, तसाच परशरामास लावण्या करण्याचा कौल दिला होता. त्यांस सर्व शाहीर मंडळीकडून एकाद्या मुलखाप्रमाणें मान मिळत असे. सर्व शाहीरांत त्याची

कविता पहिल्या प्रतीची. त्या खालोखाल होनाजी बाळ आणि तिसऱ्या प्रतीची सगन भाऊची. वास्तवीक सगनभाऊ हा शाहीर मंडळींत चमकला देखील नसता परंतु रामा गोंधळ्याच्या योगानें त्यास आनंद फंदी, होनाजी बाळ यांजबरोबर राजाश्रय मिळल्यानें सगनभाऊ नावारूपास आले. थोडक्यांत सांगायचें म्हणजे परशरामाची कविता जितकी लोकप्रीय झाली तितकी वरील शाहिरांपैकी तर नाहींच—पण रामजोशीचीही कविता इतकी प्रेय झाली. परशरामांची वाणी प्रासादिक असून भाषा सरळ गोड सुबोधकारक पदलालित्यानें थबथबलेली असल्यानें सर्व महाराष्ट्रीयांच्या मनांवर तिनें आपली छाप बसविली. परशरामाची राहणी अगदीं साधी स्वभाव मितभाषी असून विनयशील असा होता. ते परदारा आणि परधन यांविषयीं अगदीं पूर्ण सोंवळ होते. तसेंच सुपारीच्या खेडा व्यातिरिक्त ते आजन्म निरव्यसनीं होते. त्यांस सुपारी खाण्याचें मात्र जाडें व्यसन होतें तें इतकें कीं सुपारीचा तोंडातला भाग संपतांच पुन: तोंडांत सुपारी गली पाहिजे. एकदां तर त्यांच्या लगोटया येसूनें एक ठिकाणची मंडळी तमाशाचें बोलावणें करण्यास आली तेव्हां बिदागीचें ठरवतांना सांगितलें कीं, शिमग्याच्या पांच दिवसांची तुम्हांला एक मण सुपारी द्यावी लागेल ! असो.

परशराम हे पेशवाईच्या शेवटच्या काळांतले असल्यामुळें त्यांना त्या वेळच्या राजकीय व समाजिक परिस्थितीसंबंधानें पूर्ण माहिती होती म्हणून त्यांनीं ती सर्व परिस्थिती आपल्या लावण्या—पोवाड्यांतून गाइली आहे. त्यांच्या लावण्यावरून त्यावेळच्या देशाची संपत्तीक स्थिती राजकीय स्थिती, समाजिक स्थिती चांगली कळते. त्यांच्या वेळेस स्वराज्य असल्यानें तत्कालीन मराठे सरदारांची वैभवशाली राहणी, ती त्यावेळच्या मराठमोळ्याची चाल, त्यांस चांगली पहावयास मिळाली होती. त्यांनीं राजधान्यांतूनही आपल्या तमाशाचे कडे वाजविल्यामुळें, राजे रजवाड्यांच्या घरांतील वागणुकीही त्यांस अवगत झाल्या होत्या. पेशवाई नष्ट होऊन इंग्रेजी झालेली त्यांनीं पाहिली होती म्हणूनच या राज्यक्रांतीनें झालेला परिणाम—समाजाची पालटलेली परिस्थिती त्यांनें आपल्या लावण्यांतून वर्णिली आहे. ती वाचल्यास मवाळ बंधूस एक प्रकारें अंजनच बसेल म्हटल्यास हरकत नाहीं.

परशराम हा एक अवतारी तमासगीर आहे अशी वार्ता त्यावेळीं सर्वतो-मुखीं झाली होती. मोठमोठाल्यांच्या गोषांतील स्त्रियांनीं परशरामाचा तमाशा डोळ्यांनीं पाहिला परशरामाचा तमाशा म्हणजे जणूं एखाद्या कथेकरी हरदासांची हरिकथाच दुसरी ! अशी त्यावेळीं सर्व लोकांची अगदीं ठाम समजूत झाली होती आणि म्हणूनच परशरामाचा तमाशा मोठमोठ्यांच्या चौकामध्यें होऊं लागला. कारण, त्यांच्या तमाशांत चुकून सुद्धां एखादा ग्राम्य, अश्लिल अथवा बीभत्स शब्द उच्चारला जात नसे. यामुळें लहान मोठ्या स्त्रीपुरुषादि नवीन जुन्या-वळणाच्या सर्व लोकांचा तो आवडता झाला. परशरामाच्या तमाशाचे योगानें स्वार्थ आणि परमार्थ दोन्हीही साधलीं जातात असें त्यावेळचे कित्येक जुन्या वळणाचे वृद्ध मंडळींचे उद्गार निघाल्याचें अजूनही कांहीं ठिकाणचीं वृद्ध माणसें सांगतात. या योगानें कित्येक ठिकाणीं परशरामाचा तमाशा हरिदिनीं एकादशीचे दिवशीं मुद्दाम करून हरिजागर करीत कारण, परशरामाचें गंधर्वगायन ऐकावयाचें साधून हरिनामही साधलें जात होतें. अशा तऱ्हेनें परशरामचा तमाशा बराच लोकप्रीय झाला म्हणून परशरामास कधीं गर्व शिवला असेल तर शपथ ! उलट परशरामाचे कांहीं शत्रूही होतेच व ते असायचे. परशराम एकदां नवाशास गेले असतां तेथें मोहनी राजाचे मंदिरा समोर चौकांत तमाशा करण्याचें ठरलें. तेव्हां कांहीं द्वेष्टे मंडळी कडून हरकत झाली. हरकत होतां-क्षणींच परशराम आपलें चंबूगबाळें आटपून बसले व तमाशा एथेंच करीन, जर एथें करूं देत नसाल तर मी मुळीं तमाशाच करणार नाहीं. तेव्हां चार समंजस पुढाऱ्यांनीं त्याच ठिकाणीं तमाशा करण्यास कोणत्याही प्रकारें हरकत नाहीं. परशरामांचा तमाशा इतर तमाशांसारखा नसून तो हरिकथेसारखाच असल्यानें देवाच्या समोर सभामंडपाबाहेर करूं देण्यास हरकत नाहीं. शिवाय परशराम हे खरे तमासगीर नसून ते एक अवतारी संतच आहेत. अशा प्रकारें त्या गुण द्वेष्ट्यांची समजूत केली आणि परशरामांचा तमाशा अखेर तेथे करविलाच त्याच-वेळीं परशरामांनीं तमाशांत जडणी करून मोहनीराजाचा एक लावणी केली, ती आम्हास पुरी मिळाली नाहीं. ती यांत दिली आहे, अस्तु.

अशा तऱ्हेनें परशरामाची प्रसिद्धी बरीच लांबलांब पसरली गेली होती. तेव्हां एकदां असें झालें कीं, परशराम कोल्हापूराकडे जातां जातां पंढरीहून जावें म्हणून पंढरीस मुद्दाम श्रीपांडुरंगाचे—आपल्या आराध्य दैवताचे पाय पाहण्यासाठीं—वळले. तेव्हां चंद्रभागेचें स्नान करून सकाळचे वेळीं पुंडलिकाचें दर्शन घेऊन स्वारी श्रीपंढरीशाचे मंदिरांत शिरली. दर्शन घेऊन भगवंताचें नामस्मरण करून मग येथून कूच करावें म्हणून हातांत डफ घेऊन लगेच 'साक्षात देव पंढरी दिगांबर मूर्ती' ही लावणी म्हणण्यास सुरवात केली तोंच सर्व बडवे येऊन परशरामास खूप बडवून बाहेर घालवून देऊं लागले. इतक्यांत आणखीही कांहीं संत-भक्त ( दिखाऊ ) मंडळीही बडव्यांच्या बाजूनेंच परशरामास बाहेर घालवूं लागले. या गडबडींत परशरामास पुष्कळ चोप मिळाला त्यांचीं पांघुरणेंही मंडळींनीं हिसकावून घेतलीं झालें. परशरामास बाहेर घालविलें.परशराम बाहेर आल्यावर देवास-मोर पुन्हां उभा राहून सुरू केलेली लावणी पुरी करून नंतर मग वाळवंटावर जाण्यास निघाले इतक्यांत देवास स्नान घालून दोघे बडवे देवाचे अंग वस्त्रांनीं पुसूं लागले. सर्व अंग पुसण्याचे आधीं प्रभूचें मुख पुसून सर्वांगही पुसून काढलें. नंतर गंध-उटी लावण्याचे आधीं कपाळास लावूं लागले तेव्हां श्रीपांडुरंगाचे दोन्ही डोळ्यां-तून खालीं गालावरून दोन ओघळ गेलेले त्यांनीं पाहिलें. तेव्हां स्नानाचें अथवा गंधाचें पाणी ओघळलें असेल म्हणून त्यांनीं ते ओघळ पुसून काढून हात कोरडे करून गंध लावूं लागले. तों पुन्हां दोन्ही गालांवरून दोन ओघळ घळले. तेव्हां बडव्यास आश्चर्य वाटून त्यांनीं गंध लावण्याचें सोडून पुन्हां पुन्हां ते ओघळ पुसूं लागले. परंतु ओघळ कांहीं केल्या राहीना. तिकडे परशराम वाळवंटावर खिन्नतेनेंच पण सद्गदीत कंठरवानें 'तुझी लीला तूंच वदविशी बहु एक नाना परी' ही लावणी म्हणूं लागले. इकडे श्रीपांडु-रंगाचें मूर्तिमंत रुदन कुणासही कळेना. नुसते ओघळ पुसतां पुसतांच त्यांचे हाल झाले. शेवटीं हां हां म्हणतां ही वार्ता सर्व राउळभर पसरून सर्वांनीं येऊन हा चमत्कार पाहिला. कोणी म्हणूं लागले आज उकाडा ज्यास्त होतो आहे म्हणून विठ्ठल मूर्तिसही घाम येत असेल. अशा अनेकांच्या अनेक कल्पना झाल्यावर या एक वृद्ध वारकऱ्याच्या रूपानें प्रत्यक्ष श्रीपरमेश्वरानें येऊन सांगितलें कीं, पर-

राम हा अवतारिक तमासगीर श्रीपांडुरंगभक्त आहे त्याला तुम्हीं सर्वांनीं मारून बाहेर घालविलें म्हणून श्रीरुक्मिणीकांत शोक करित आहेत. तरी तुम्ही जाऊन त्यास समजाऊन येथें आणून जर त्यास नामस्मरण करूं द्याल तर डोळ्यांच्या धारा अखडतील नाहींपेक्षा कांहीं जरी केलें तरी देवाचा भक्तासाठीं चाललेला शोक थांबणार नाहीं. असें सांगून तो वृद्ध वारकरी अस्ते अस्ते राउळा बाहेर जाऊन एकदम अदृश्य झाला. इकडे या वारकऱ्यानें सांगितल्या गोष्टीवर बरीच भवती न भवती होऊन अखेर दोघां चौघां बडव्यांनीं जाऊन परशरामास आणण्याचा विचार केला. दोनचार बडवे निघतांक्षणींच पांच पंचवीस वारकरीही त्यांबरोबर निघून वाळवंटावर गेले.

तेव्हां परशरामाचे वरच्याच लावणीचे " बौद्धरूप झालासी संकटें कोण आतां निवारी " हे चरण घोळुन घोळुन म्हणणें चाललें होतें तोंच वरील मंडळी तमाशांत घुसुन परशरामास हात जोडून म्हणूं लागले कीं "आम्ही मोठा अपराध केला, आम्हांस आपली पारख झाली नाहीं आतां राऊळाचे समोर उभें राहून अगर आपणांस वाटेल तर आंत—पण आपण देवासमोर तमाशा—आपलें नामस्मरण करण्याचें करा " म्हणून मंडळीनें गच्च पाय धरून त्यांना बळेंच ओढलें व तेथें परत आणलें. मग परशरामानीं पुनः विचार केला कीं, राउळाचे बाहेरच तमाशा करावा उगीच पुन; कित्येकांची मनें दुखावलीं जातील म्हणून त्यांनीं राउळाबाहेरच तमाशाचें सामान ठेवून स्वारी बडव्याबरोबर आंत गेली. तेव्हां आपल्याला दुःख झालें म्हणून श्रीपांडुरंगासही दुःख झालें असें पाहून परशरामानेंही आपल्या डोळ्यांतून अश्रू गाळले आणि नंतर बाहेर येऊन कड्यावर थाप मारून "श्रमलास फार जगजेठी फार जगजेठी बारे विटेवरी उभा कर कटीं " ही सहा कडव्याची लावणी म्हणून डफ खालीं ठेवला. तेव्हां सर्व पंढरपूरांत या आश्चर्याचेंच आठ दिवस निव्वळ पुराण सुरू झालें. नंतर परशरामानें श्रीपंढरीनाथास दंडवत घालून दोनप्रहरीं तेथें प्रसाद घेऊन कूच केलें. असो; असेच एकदां परशरामाच्या कडकडीत एकपत्नि व्रताची आणि परदारा विन्मुखतेच्या घमेंडीची टवाळी करण्याच्या उद्देशानें परशरामाचा मुक्काम मौजे रामपूर ( ता० राहुरी ) येथें असतांना म्हणजे नगरावरून संगमनेराकडे जात असतां

गांवांमध्यें एक प्रसूत होणारी बाई फार अडली होती. दोघी चौघी दाया येऊन त्यांनीं हात टेंकले होते! बाळंत होणारी बाई सारखी ओरडत होती तेव्हां परशरामाचा एक जिवाचा मित्र यशवंत (हाच फक्त परशरामांची केव्हां केव्हां उक्त धंदा करीत असे तो) रामकृष्ण रामा म्हादूसह स्नानास चालले होते तिकडून एक बाई अति घाईनें रस्त्यानें चालली होती म्हणून यशवंतनें सहज त्या बाईस हटकून विचारलें-"बाई काय गडबड आहे गांवांत?" त्यावर ती म्हातारी म्हणाली-"बाबा आज दोन तीन रोज झाले एक बाई अडली आहे." ती कसं काय करते आहे ह्मणून धांवत चालले. ' यावर यशवंत थट्टेनें म्हणाला-' बाई त्या देवळांत तो परशरामभाऊ बसला आहे त्याच्या पायाचं पाणी आणशील तर बाई एका घडींत मोकळी होईल.' असं सांगून यशवंत अम्मळ कांहीं पावलं जाऊन पुनः वळून ह्मणाला-' बाई खोटें नाहीं मी सांगितलें तुला, असा आह्मांला अनुभव आलेला आहे म्हणून तुला सांगितलें. ' बाई मोकळी होईल ' असं बजबजाऊन सांगून यशवंतादी मंडळी नदीचे टेकडीवर जाऊन बसली; तेथून त्यास परशराम टळक दिसत, पण परशरामास मात्र हे दिसत नव्हते. इकडे ती बाई जाऊन लगबगीनें त्या बाईच्या नवऱ्यास सांगूं लागली; त्याचा पहिल्यापहिल्यांदा विश्वास बसेना परंतु बायकोच्या प्राणास्तव आणि सर्व बायांचे आग्रहास्तव तो परशरामाकडे गेला.

इकडे परशराम नित्यनैमित्तिक पूजा आर्चा साहून ज्ञानेश्वरीचा ग्रंथ हातीं घेऊन वाचण्यास आरंभ करणार तोंच तो वरील मनुष्य देवळांत येऊन अतिदीन मुद्रेनें परशरामाचे जवळ त्यांचे आंगठ्याचें पाणी मागूं लागला. तेव्हां परशराम ह्मणाले 'बाबारे! आम्ही नव्हेत ब्राह्मण! किंवा आम्ही मोठे संतही नव्हेत; मग आमच्या आंगुठ्याचें तीर्थ आम्हीं तुला कसें द्यावें व तें तुं कशासाठीं घेत आहेस'? हें ऐकून तो कुणबी म्हणाला-महाराज मला नाहीं फार बोलांत येत! आणि आतां सुचतबी कांहीं नाहीं! माझी बायको आज दोन तीन दिवस झाले अडली आहे ती कांहीं वांचेलसें वाटत नाहीं; उपचार मोप केलेत परंतु गुण नाहीं'! इतक्यांत ती वरील भोळीभाबडी म्हातारी धांवत येऊन खूप जारानं ओरडून ह्मणाली. ' द्या ये बाबा तुमच्या पायाचं पाणी

ळकरांबाळाची भक्तीन हाहे कीं ती ! तिचा जीव अगदीं जाया झालाय ! ' असें म्हणून तिनं ती पाण्याची वाटी हातात घेऊन त्यांच्या पायांजवळ नेऊन पायाचे दोन्ही आंगठे हातानें धरून वाटींत बुडविले आणि झटकन् घरीं गेली व तें पाणी त्या बाईस पाजिलें. पांच दहा मिनिटांत ती बाई प्रसूत होऊन मुलगा झाला. इकडे यशवंत आपल्या सवंगड्यांसह स्नान करून आला तों परशराम पाय पुढें करून डोळे मिटून बसले आहेत. पायांचे आंगठे ओले आहेत, असा देखावा पाहून त्यास अनावर हसूं आलें व आश्चर्य वाटलें. तोंच ती बाई मोकळी होऊन मुलगा झाल्याची खबर कळली. इकडे परशरामाचें ध्यान विसर्जन झाल. ती सर्व हकीकत ऐकून यशवंत मनांत खजील झाला आणि त्यानें पुनः ' तुझ्या पायाच्या पाण्यानें अडलेली मोकळी होईल ' असें कधींही म्हटलें नाहीं. ही हकीकत ज्या ज्याचें जन्मसमयीं घडली तो माणूस १९१८ सालापर्यंत हयात होता. व वरील हकीकत त्यानें त्याचे आईचे तोंडून ऐकली होती. ती त्यानें आम्हांस कित्येक वेळां अशाच गोष्टी निघाल्या म्हणजे सांगावी. असो; अशा कित्येक गोष्टी आम्हीं चौकशीपूर्वक लावण्याचे शोध करतांना ऐकल्या आहेत त्या सर्व येथें देतां येत नाहींत. आधुनिक काळांत आणि त्यांतूनही इंग्रजी विद्येनें अभक्त बनविलेल्या तरुणांचा अशा गोष्टींवर मुळींच विश्वास बसणार नाहीं. असो; एकंदरींत परशराम हे एक अवतारी पुरुष होऊन गेले यांत शंका नाहीं. तेव्हां त्यांच्या गुणाचें जेवढें वर्णन करावें तेवढें थोडेंच आहे.

आनंदफंदी, सगनभाऊ, होनाजी बाळ, इत्यादिकांप्रमाणें किंबहुना यांच्याही पेक्षां ज्यास्त असा राजाश्रय परशरामांना मिळविता आला असता परंतु त्यांना द्रव्याचा अशा नव्हती. राजाश्रयांच्या आयत्या धनावर मजा करण्याची त्यांची इच्छा नव्हती आणि पैशाच्या लालचीमुळें कोणाचाही बंदा होऊन त्यापुढें लांगूल चालन करण्याचा त्यांना फार तिटकारा असे. एकदा असें झालें कीं, श्रीमंत पेशवेसरकारची स्वारी कोपरगांवीं गोदातटाकीं आली. त्यावेळेस स्वारी बरोबर नित्याप्रमाणें होनाजी बाळ व सगनभाऊ हे तमासगीर होतेच. त्यावेळीं त्रिंबकजी डेंगळ्यानीं जासूद परशरामाकडे बोलावीस पाठविला. व त्याच्या

तमाशास बोलावून घेतलें. परशरामाची प्रसिद्धी श्रीमंत ह्यावेळ पर्यंत नुसती ऐकूनच होते. परंतु प्रत्यक्ष पाहिला मात्र नव्हता म्हणून मुद्दाम त्यांस बोलाविलें होतें. परशराम आल्यावर क्रमाक्रमानें तमाशास सुरवात झाली. परशरामास बोलावणें पाठविल्या वेळेपासून ह्या राजाश्रित तमासगिर शाहीरांचें धाबें दणाणलें. ह्मणून जो तो आपली सरशी व्हावी या हेतूनें कांहीं तरी नवीन पण चांगली उठावदार लावणी रचूं लागला. त्यांत होनाजी बाळानें गंगेची लावणी तयार केली. परंतु थोडया वेळेमधीं ती पूर्ण पाठ न होऊन त्यांना अखेरीस ती कागदावरून वाचावी लागली. मागाहून सगनभाऊनेंही गंगेवरच लावणी करून म्हटलेली पाहून परशरामासही वाटलें कीं, आपणही गंगेवरच लावणी करावी. इतक्यांत परशरामाची पाळी आली. परशराम गमतींत उभे राहिले. कडयावर थाप मारली. गणेशस्तवन केलें आणि लगेच गंगेची लावणी मुखानें करून म्हणण्यास सुरवात केली. तेव्हां सर्वच आश्चर्यचकित झाले. होनाजी, सगनभाऊ पेक्षांही परशरामाची गंगेची लावणी सर्वांत सुंदर बनली. त्याच वेळीं श्रीमंतांची मर्जी परशरामावर खुष होऊन श्रीमंतांनां त्याचा तमाशा चालू असतांनाच तुला आम्ही जहागीर करून देतों कोणतीं गांवें पाहिजेत सांग असें म्हटलें असतां परशरामानें लगेच श्रीमंतांना वंदून "सुइ दोऱ्याला हयात असोंद्या तोचि इनाम मर्शी मोकासा" ह्या लावणींतून उत्तर दिलें. ती लावणी वाचल्यावर वाचकांची खात्री होईल कीं, परशराम किती निस्पृही होते. त्यांनी मनांत आणलें असतें तर त्यावेळच्या सर्व शाहिरांतच काय पण एखाद्या मोठ्या जहागीरदारापेक्षां ही मोठे जहागीरदार त्यांना होतां आलें असतें. इतके त्यांच्या गाण्याला व गुणाला राजेरजवाडे, अमीर उमराव लुब्ध होत असत.

परशराम बडोद्यास गेले असतांही एकदा अशीच गोष्ट घडून आली. परशराम एकदा होळीवर तमाशा करीत असतां हल्लींच्या श्रीमंत सरकार सयाजीराव गायकवाड यांची स्वारी त्याच रस्त्यानें जात होती. तेव्हां फारसिंग महाराजांवर परशरामानें केलेली लावणी ऐकून स्वारी फार खुष झाली! आणि लगेच बहुमोल जरतारी दुपटा व शेला परशरामास बक्षिस दिला. असा प्रकारें गायकवाड सरकारांतुन परशरामास बऱ्याच वेळां बहुमोल देणग्या मिळाल्या.

त्याचप्रमाणें परशरामानें ग्वाल्हेर, इंदोर, नागपूर, सातारा, कोल्हापुरादि राजधान्या खेटून आपल्या गुणांवर त्यांचेपासून पुष्कळ देणग्या मिळविल्या. आणि त्यांना आपल्या गाण्याचें नुसतें वेड लावून ठेविलें. यावरून परशराम किती निर्लोभी आहेत हें कळेल! या नाशिवंत जनाची त्यास पूर्ण ओळख झाली होती म्हणून त्यांनी आपल्याला मिळालेल्या बहुमोल देणग्या सुद्धां आपल्या तमाशांतील साथीदार नोकरांस गुणानुक्रमानें वेळोवेळीं बहाल केल्या.

मानवाची स्तुती करणें हें त्याच्या मनास रुचत नसे आणि म्हणूनच त्यांनीं आपल्या लावण्याचा झोंक आजन्म ईश्वरगुणानुवाद गाण्याकडे ठेविला. हें त्याच्या कवितांचें निरीक्षिण करणारास सहज दिसून येईल. त्यांचें मुख्य आराध्य दैवत ' श्रीपांडुरंग मूर्ति '! यांचीच सेवा त्यांनी आजन्म केली. त्यांनीं आपल्या प्रासादिक वाणीचा हिडिस, अचरट व फाजील विनोदी लावण्या अगर ग्राम्य रंगबाजी लावण्या करण्याकडे न करतां भारदस्त शृंगार, सहज विनोद साधी व सरळ भाषाईशनाम युक्त, बोधपर स्त्रिपुरुषांनीं मुलांमुलींनीं वाचण्याजोग्या लावण्या करण्याकडे केला. त्यांनीं बायकांचींही गाणीं पुष्कळ केलीं आहेत. त्याच्या लावण्याचे मुख्यत्वेंकरून तीन भाग पडले जातात! ईश्वर गुणानुवाद वर्णनपर, वेदांतपर, आणि शृंगार वर्णनपर, त्यांत पहिल्या भागांत ईश्वरस्तवन किती गोड भाषेंत केले आहे हें पुढील चरणांवरून समजेल!

" निराकार गण निर्गुण नमिला वेद पुराणीं ठिका! वेदां आदीं गण, तुझा नकळे पार ब्रह्मादिकां " " ना कळा तीळ रतिचळ। कळातव अचळ। तूं निर्मळ ब्रह्मचारी। अनंत माया शेष वर्णितां दुभागली वैखरी "। " तुझी लीला तूंचवदविशी। बहुएक नाथापरी। कर्ता तूंच करविता वेगळा होउनियां श्रीहरी "। " श्रमलास फार जगजेठी। बारे विटेवरी उभा करकटीं "। " कळा अचळ कर्तार धन्यता अवतार श्रीहरी " इत्यादि. त्याचप्रमाणें वेदाच्याही महाभारत भागवत वगैरेंतील कथानकांवर जड मूढास समजण्यास सोप्या अशा किती गोड व बोधपर लावण्या केल्या आहेत हें पुढील चरणांवरून कळेल.

" दुर्घट माया ब्रह्मादिकांहीं ऐक कवीच्या मुला "। त्रिगुणाचे तिनपण केलं सर्व पाहिली मजा। " केंस थोडे बाई पुरुषइतके करूं करूं बसले तपें

इतकें करून पतिव्रता आगळी घर माझें निजरूपीं "। " दहा शिंदळक्या करीन परंतु एक लग्नाचा नको नवरा"। "अंत पार श्रीहरीचा नकळे भरून उरला किती"। " कशी सोन्याची लंका झाली। ऐका देशाची मूळवार्ता। जुनाट कथनें पाहून केली वाल्मिकानें कविता "। इत्यादि. श्रृंगार वर्णनाची परशरामाची हातोटी कांहीं औरच होती ! किती भारदस्त विनोद, किती अमाल शब्दालंकार आणि सरळ भाषा हें पुढील उदाहरणांवरून कळेल. " टुमदार कुणाचा छान नवलभिर ज्वान। पुसारे आली कुठून। स्वरूपाचे तुटती तारे कडाकड विजवा पडतिल तुटून "। "रुप चांदाचा तुकडा मुखडा पाहुन मन धालें। अमदाबाद कीं शहर बडोदे पुसा कुठचे राहाणेवाले"। " पोषाग जरिग जर बाब करुनिया जरा नवर पहाशी। मुखडा ग तुझा धुंद सदा कैफांत धुंद राहासी"। "कटिवरि कचितांची जशी बोथाटी देखणी सरळ सडक। दाही बोटें रंगविलीं मेंधा अनवट बिचवे पायीं कडक "। " दंत दाळिंबाचे दाण त्यावर दातवणाच्या रेघऱ्या। नैन चकोर गरगराट फिरवी। तीक्ष्ण जैशा सुऱ्या "। "देहकांता कर्दळीचा गाभा प्रभा तिच्या मुखचंद्राची। तूंच परी का इंद्राची " इत्यादि परशरामानें जवळपास पंधऱ्यानदा तमाशास सुरवात केली त्य वेळीं बाबासाणभाई व मलुराज ब्राह्मण हे त्याचे साथी असून नारायण या नावाचा एकनाथाचा पोऱ्या होता. पुढें याच नारायणानें तमाशा फाडला व स्वतः तमाशा उभारला. नंतर परशरामांनीं अकोला तालुक्या नजीक असलेल्या रुंभोडी गांवचा भवानी तेली हा नाच्या ठेवला. हा फार गुणी होता. यासच सोंगाच्या अप्रतिमतेमूळें बडोद्यास बाकेराव ' ही पदवी मिळून तो पुढें बाकेराव या नावानेंच प्रसिद्धीस आला. बाकेरावानें फक्त चारपांच वर्षे नाचण्याचें काम केलें कारण पुन्हां नारायण हा आपल्या तमाशासह परशरामास येऊन मिळाला होता. नारायण येऊन मिळतांच बाकेरावानें नाचकाम सोडून तमाशांत सोंगाच्या बतावणीचें काम पत्करलें. ही चाल परशरामा पासूनच प्रथम सुरू झाली. ' बाकेराव ' हा सोंगाची उठावणी, फार अप्रतिम करीत असे. तो तमाशांत नुसता येऊन उभा राही तरि त्याच्या उभें राहण्यांत कांहींतरी कृती असायचीच ! कीं, इकडे प्रेक्षक जनांच्या हसतां हसतां अगदीं मुरकुंड्या वळत असत ! कित्येकांची

पोटें दुखत. इतकें नुसतें त्याच्या उभे राहण्यानें हंसूं येई. अशा तऱ्हेनें बाळे-राव हा बडोद्यास फारच लोकप्रिय झाला. यानें सोंगाच्या बतावणीवर परश-रामाच वेळीं व त्यांच्या पश्चात् बऱ्याच देणग्या मिळविल्या. परशरामाचे पाठीमागें यानेंच त्याचा तमाशा कांहीं दिवस चालू ठेविला होता.

परशराम हे जातिवंत प्रतिभेचें आणि जिवंत रसवंतीचें जणू माहेर घरच होतें. त्यांची स्फूर्ती नेहमीं जागृत होती. हें पुढील उदाहरणावरून कळेल. परशराम वाईस असतां एकदां आनंदफंदी वाईस आले होते. तेथें आल्यावर त्यांची उभयतांची मुलाखत झाली. तेव्हां आनंदफंदीनीं एक लावणी तीस बत्तिस बाळांचे वर्णनाची केली. त्यावेळीं परशरामांनींही तावडतोब तेथच्या तेथें तवढीच लावणी केली. "माझी अर्जविनंती पातराया ऐका नग आज घडवा" [ ही लावणी आणखी अप्रसिद्ध लावण्या कुणाही वाचकांजवळ असल्यास कृपा-करून खालील पत्त्यावर पाठविणें म्हणजे पुढील आवृत्तींत प्रसिद्ध करण्याचें करूं.

'मु० पो कोल्हापूर जि० अहमदनगर वि० ना० कोल्हारकर'

तसेंच ती लावणी पाठ येत असलेला एक गोसावी एकदां त्यांस मंजुरगावीं भेटला त्या ठिकाणीं त्यानीं लीलावती म्हणतांच परशरामानीं लगेच त्यांस प्रश्नार्थक उत्तर म्हणून "अंतपार श्रीहरिचा नकळे भरून उरला किती' ही लावणी म्हटली; तेव्हां तो गोसावी निरुत्तर झाला व तेथून निघून गेला. परशरामानीं ज्या दिवशीं मंजुरास प्रथम लावणी केली त्याच दिवशीं वाईस आल्यावर त्यांनीं आपल्या आईस आपली निधनवार्ता कळविली व आपल्या तीन जन्माचा ओळख करून दिली.

"करिन लावणी अलक्ष वेंचुनी । देवा पंढरीराया । अभेद गाणें ।
नामें तुझिया । गाइन मी तारा या ॥ ध्रु० ॥ दारिद्रदुध प्यालों ।
रास खेळलों । नित्य हरिच्या फंदा । अति आवडता श्रीकृष्णाचा
व्रजवासी पेंदा । खंत जाहली पुन्हां मनाला भेटावें गोविंदा ।
म्हणुनी झालों अभंग गाया नामयाचा गोंदा । जन्म दुसरा घेउनि
भजलो अखंड पंढरिराया । करिन लावणी ॥ १ ॥ अभंग गाणें
अभंग पुजणें अभंगाचा धंदा । अभंग केला । प्रपंच सगळा ।
अभंग झालों बंदा । बहु दिस झाले म्हणून गमलें पाहूं मेघश्याम ।
आतां लावणी करणें साठीं झालो परशराम ।"

[ ही लावणी अपुरी आहे इच्या पुढचा भाग आम्हांस सांपडला नाहीं. ]

परंतु आईस ती मृत्युवार्ता खरी वाटली नाहीं व कांहीं तरी हा सांगतो असें समजून तिनें तें ऐकल्यावारींच नेलें. मरणापूर्वी पुन्हा त्यानें सर्व मंडळीस आपले मरणाची वार्ता पंधरा दिवस आगाऊच कळविली होती. परंतु तें खरें कोणास वाटेना. शेवटीं पांच दिवस मंजुरास जाण्याचे उरले तेव्हां त्यांनीं आपल्या इष्टमित्रांस व आप्तेष्टांस कळवून त्यास आपले पंक्तीस घेऊन जेवण केलें. नंतर दुसरे दिवशीं म्हणजे मरणापूर्वी तीन दिवस अगाऊ मंजुरास जाण्या साठीं निघाले. त्यावेळीं सर्व मंडळीं व आप्तेष्ट इथेंच मरा असें म्हणूं लागले. परंतु त्यांनीं सांगितलें कीं, आम्ही ज्या दिवशीं पहिली लावणी केली त्याच दिवशीं मंजुरास मरण्याचें आम्हीं मंजूर केलें ( यावरून त्यांनीं आपल्या पहिल्या लावणींत आपला मरणकाळ लिहून ठेविला असला पाहिजे.)असो;मंजुरास गेल्यावर तेथील मंडळीसही ही वार्ता कळविली. ( हें गांव वावीपासून जवळ जवळ चार कोस दूर असून गोदावरीचे कांठीं आहे.) परंतु त्या लोकांचा त्यांवर मुळींच विश्वास बसला नाहीं. तेव्हां कांहीं मंडळींनीं सहज कुचेष्टेच्या भावानेंवर प्रेम दाखवून ‘ आम्हास शेवटचा तमाशा तरी आज: करून दाखवा ’ असें मोठ्या कळकळीनें म्हटल्यावर त्यांनीं वावीहून साथीदार मंडळीस आणण्यास सांगितलें. त्यावर त्या मंडळींनीं तावडतोब वावीहून ती मंडळी आणून मरण्याचे आदलेच रात्रीं तमाशा करविला. त्यावेळीं नारायण शिंपी, रामा कुंभार, बाकेराव सोंगाड्या, परशरामाची सून व आई इतकी मंडळी गेली होती. परशराम त्यांना पाहून खुष झाले व म्हणाले ‘ रामकृष्ण कां नाहीं आला? तेव्हां त्याची आई म्हणाली तो भोकणीस गेला आहे. त्यासही परभारें बोलावलें आहे येईल उद्यां दुपार भरता. रामकृष्ण या नांवाचा त्यांना एकच मुलगा होता. नंतर सर्वजण गोदेवर स्नान करण्यास गेले. स्नान करून आल्यावर सर्व जणांनीं फराळ पाणी केला व थोडीशी विश्रांती घेण्यासाठीं म्हणून बसले. इकडे परशरामांनीं नवीन लावण्या करण्याचा सपाटा सारखा दोन दिवस चालविला होता. तोंच सायंकाळ होऊन रात्रीचे तमाशाची तयारी झाली. त्या दिवशीं तमाशांत सर्व लावण्या परशरामांनीं नवीन म्हटल्या म्हणून तमाशा मोठा बहारीचा झाला. शेवटीं तमाशा आटोपल्यावर त्यांनीं बाकेरावाची पाठ थोपटून सांगितलें कीं, आमचे मागें आमचे तमाशाचें नांव तुम्ही चालवणें. तुम्ही योग्य आहात म्हणून आम्ही तुम्हांस सांगतों. नंतर मंडळी निजली. पुढें

दुसरे दिवशीं मोठ्या पहाटेस उठून त्यांनीं आपल्या काशीबाईस-सूनेस उठवून सांगितलें कीं, आज द्वादशी आहे तेव्हां चटदिशीं जेवावयाचें तयार करा नाहीं तर आमचें मरणामुळें घोटाळा उडेल ! असें म्हणून परशरामानीं काशीबाईस स्वयंपाकास लावून सर्व मंडळीस उठविलें व स्नानास लावून दिलें आणि आपण शौचमुखमार्जन करून आईजवळ जाऊन वंदन करून बसले. माताच ती ! तिच्या प्रेमाचा अंत कुणाला लागणार ! मुलाच्या मरणाची वार्ता आयांना कधीं सुखकर झाली आहे काय? एकादशीची सारीरात्र त्या माउलीनें देवापुढें बसून अश्रू ढाळण्यांत घालविली व दुसरे दिवशीं परशराम जवळ येऊन बसतांच तर मोठ्यानें धायधाय मोकलून रडायला सुरवातही केली. परशरामांनीं आपल अश्रूंनीं मातेचे चरण धुवून काढले. नंतर कशी तरी समजूत करून त्यांनीं तिला आपले जवळ द्वादशीस जेवण्यास बसविली. तिनें मुलाच्या शेवटच्या इच्छेसाठीं दोन घांस खाल्ले. परंतु कालकूटाहूनही प्रत्यक्ष जाळणारें कालकूट तिला कसें खाववणार ! सर्वच मंडळींत उदासीनता पसरली. सर्वांनीं आपल्या जेवण्याचे नाटक उरकून घेतलें. नंतर परशरामांनीं ज्ञानेश्वरींतील अकरावा अध्याय वाचून काढला व सर्व मंडळीस पुढची फुलाबिलाची व्यवस्था करा म्हणून सांगून आईस वंदन केलें व मांडीवर डोकें ठेवण्याचे वेळीं सर्व मंडळीस नमस्कार करून म्हणाले आतां आम्ही जातों आमच्या बऱ्या वाईट गोष्टीची सर्व जणांनीं आम्हांस क्षमा करावी आणि आमचेवर पोटच्या मुलाप्रमाणें प्रेम ठेवावें असें म्हणून आईचे मांडीवर डोकें ठेवून पुंडलीक वरदे हरि विठ्ठल म्हणाले झालें. इतक्यांत कोणी मुद्दामच रामकृष्ण आला असें म्हणाले म्हणून डोकें वर उचलून पाहिलें परंतु रामकृष्ण खरोखरच आला नसल्यामुळें त्यांनीं पुनः मांडीवर डोकें ठेवून ' पुंडलीकवरदे हरी विठ्ठल ' असा घोष करून वैकुंठ-वास केला. नंतर पुढची सर्व तयारी लोकांनीं केली आणि वाजत गाजत त्यांस गंगेवर नेलें. तेथें चिता तयार होतीच. नंतर अग्नी देऊन सर्व लोक स्नान करून घरीं परत आले. दुसऱ्या दिवशीं रक्षा गंगेंत टाकून मंडळी वावीस आली. धन्य धन्य त्या मातेची कूस कीं, असलें पुत्ररत्न प्रसवली आणि धन्य धन्य त्यांची कीं, ज्यांनीं असल्या इच्छामरणी योग्याचें जन्म व मरण डोळयांनीं पाहिलें व त्याचे अमृतबोल ज्यांनीं कानीं ऐकिले त्याचेंही भाग्य त्रिवाच धन्य ! धन्य !! धन्य !!!

# आभार प्रदर्शन !

आतां ज्यांनीं ज्यांनीं आह्मांस ह्या लावण्या मिळवून दिल्या त्यांचे आभार मानणें हें आमचें मुख्य कर्तव्यकर्म होय !

त्या आधीं हें सांगणें जरूर आहे कीं, आम्हांस हें पुस्तक प्रसिद्ध करण्याची आज बरीच इच्छा उत्पन्न झाल्यामुळें जिथें जिथें गोंधळी, भराडी, भुते, जोशी, तमासगीर अगर नुसताच एखादा शार्ढीय लावण्या ह्मणणारा आह्मांस भेटला कीं, आह्मी आमची कागद पेन्सील बाहेर काढलीच ! अशाचे आभार प्रदर्शन करतां येणें शक्य नाहीं तरी त्यांचेही आभार मानणें हें आमचें कर्तव्य होय, ह्मणून आम्ही त्यांचे आभार सर्वांचे आधीं मानतों.

परशरामाचा नाच्या नारायण याचे तमाशांत असलेला एक भराडी हा जातीचा भराडी असून त्यास थोडें बहुत लिहितां वाचतां येत असे. जेव्हां नारायणानें तमाशा दुसरा केला तेव्हां त्याच्या तमाशांत हाच भराडी पुढारी होता. याचें नांव गोविंदा भराडी ! हा लिहिणारा असल्यामुळें याच्याजवळ हा परशरामाचा तमाशा सोडून निघेपर्यंतच्या सर्व लावण्या उतरलेल्या होत्या. पुढें यानें तमाशा सोडला. त्यानंतर परशराम ५।६ वर्षांनीच कैलासवासी झाले. हा भराडी चिंचपूरचा राहणार हाही भराडी ह्मणण्यांत इकडल्या प्रांतीच्या चांभार गोंद्याच्या बापुभराड्याप्रमाणें नांवाजला होता पुढें यास मुलगा नव्हता फक्त एक मुलगी होती, त्यामुळें याचें सर्व घरदार याचे जावयास मिळालें. याचा जांवई नथु भराडी यापासून आम्हांस ती गोविंद भराड्याची वही पाहण्यास मिळाली. पण ती अतिशय जीर्ण झालेली असून तिच्या घडच्या ठिकाणीं ती फाटून पुष्कळसे कागद बरेच खालचे कांहीं पाठिमागचे गहाळ झाले आहेत. त्यामुळें त्या वहींतल्या सर्व लावण्या आह्मांस घेतां आल्या नाहींत.

त्याचप्रमाणें वावीचे मोहनराज बापू यांनीही आम्हांस वह्या मिळवून देण्याचे बाबतींत खटपट केली.

तसेच कुंभारीचे बाळाभाऊ नाईक, बाळशेट मारवाडी, आणि बाळकृष्ण पाटील कानडी यांनींही आपल्या वह्या देऊन आम्हांस मदत केली. पैकीं बाळकृष्ण पाटील यांनीं बरींच वर्षे तमाशांत घालविलेलीं आहेत. बाकेरावाचा तमाशा मोडल्यानंतर याचा तमाशा सजला; परंतु तितका तो नांवारूपास न येण्यास कारण सोजिंदे बरोबर मिळाले नाहींत. बाकी म्हणण्यामध्यें त्या भागांत अजून त्यांचा हात धरणारा प्राणी कोणी नाहीं. असो या सर्व मंडळींचा मीं फार आभारी आहें !

# कै. परशरामी लावण्या.

## अनुक्रमणिका.

---

## परशरामी लावण्या. भाग २ रा.

# परशरामी लावण्या. भाग ३ रा.



# परशरामी–लावण्या.



## गण १ ला.

निराकार गण निर्गुण नमिला वेदपुराणी ठिका। वेदा आधीं गण। तुझा न कळे पार ब्रम्हादिकां ॥ श्रीमंगलमूर्ती नमो गणपती तुझिया चरणांप्रती। सरस्वती अंबिके भवानी हो प्रसन्न द मज मती ॥ १ ॥

निराकार गण निर्गुण ज्योती शक्ती ह्मणती जिला। शक्ती पासुन अवघी रचना आधीं वंदू तिला। चैतन्य शक्तिध्यातो ॥ चैतन्यशक्ती। नमो गणपती। सर०॥ २ ॥

ज्योतिस्वरूपा कृपानिधाना त्रिभूवना नायका। दशनामावर मंडळा तूझें सर्वांहुन अधिका ॥ निशिदिनीं ध्याती तुला। निशिदिनि ध्याती ॥ नमो० ॥ ३ ॥

चौदाविद्या प्रसन्न तुजला दिला शिवानें वर। नामें विठ्ठल करि प्रार्थना जोडुनि तुजला कर। परशराम मनिं चिंतीं तुज गणपती। सर० ॥ ४ ॥

## गण २ रा.

वंदु वंदु त्या आदि निर्गुण जी ॥ धृ० ॥ शंखासुरानें वेद

नेलें देवें मत्स्यरूप धरिलें जी । केशवानें समुद्र मंथिला जी ॥ माधवा धरणीधर कृष्ण माधवा जी । [ चाः– ] वराहरूप तुझें हिराण्याक्ष मर्दना जी ॥ वंदु वंदु त्या आदि निर्गुणा देई वरदाना जी ॥ धृ० ॥ १ ॥

फोरंड काष्टीं प्रगट होसी । हिरण्यकश्यपु मर्दुनी । निजभक्त रक्षिसी प्रल्हाद ॥ हरि येसी वामनबटु होउनी । वामन बटु होउनी बळिला हारिवलें जी ॥ [ चाः– ] भार्गवराम । त्वांच वधविलें सहस्रार्जुना ॥ वंदु० ॥ २ ॥

पितृ वचनास्तव जासिवना सेतु बांधुनियां जी । रावण बधिला तो द्वापारीं मज साजना जी ॥ [चाः–] नखाग्रीं धरुनि उचलसी गोवर्धना ॥ वंदु ॥ ३ ॥

जगन्नाथ बौद्ध अवतार कलंकी होसी । जग संव्हारा जी ॥ विठू परशराम ह्मणे स्मरा रामकृष्ण रामा गातो सीराजी । [ चाः– ] पदीं लीन होउनियां हरि येसु करी गर्जना ॥ वंदु० ॥ ४ ॥

## गण ३रा.

जय सिद्धिविनायक वेषा । ओंकार नमूं आदिपुरुषा ॥ धृ० ॥ जेव्हां कांहींच नव्हतें सार । होतें निरगुण निराकार ॥ स्वइच्छा शून्याकार । शून्यापून ध्वनी ओंकार ॥ तें मूळ मायेचें घर । मायेपून त्रिगुणाकार ॥ त्रिगुणाचे षड्विकार ।

आदि अंत विनायक वेषा ॥ जय सिद्धिविनायक वेषा । ओं-कार नमूं आदिपुरुषा ॥ १ ॥ ज्योतिप्रकाश तरू आणि छाया । जळ तुंगच एकच ठाया ॥ झाली प्राणरूपिनी माया । तिनें ब्रह्मांड आणलें लया ॥ घर पंच भूतांचें राया । आली सगुण निरगुण पाह्या ॥ लघु स्वर्ग दीर्घ अक्षरें भाषा । करी जप एकवीस हजार सहाशा ॥ जय सिद्धिविनायक वेषा । ओंकार नमूं आदिपुरुषा ॥ २ ॥ निवर्त निरगुण दोन्ही । आह्मी ना ऐकूं हो ज्ञानी ॥ मायापुण सगुण आणि ध्यानीं । होय श्वेतधातूचें पाणी ॥ पाण्यांत ज्योत आली ध्यानीं । चिद्रुप वस्तु गुरु ज्ञानी ॥ कोणी जातील विरळा प्राणी । घणघणाट घण करी घोषा ॥ गुरुपुत्र शोध करी भाषा । जय सिद्धिविनायक वेषा ॥ ओंकार नमूं आदिपुरुषा ॥ ३ ॥ सर्व निरगुण निरगुण ह्मणती । नाहीं सगुणाविण मनशांति ॥ जे कोणी अष्टगणाशीं ध्याति । गण नाहीं मुळींचा आदि अंतिं ॥ ती विटेवर आवीट मूर्ति । त्या विठ्ठलाची गाऊं कीर्ति ॥ विठू परशराम करी आशा । भावें वंदून पद ठेवी सरशा ॥ जय सिद्धिविनायक वेषा । ओंकार नमूं आदिपुरुषा ॥ ४ ॥

## लावणी ४ थी.

ना तीळ रतीचळ । तव कळा अचळ ॥ तूं निर्मळ ब्रह्मचारी । अनंत माया । शेष वर्णितां । दुभांगली वैखरी ॥ ध्रु० ॥ विधी करि ध्यान । ना स्वरुपिं वान ॥ त्रैलोक्य निधान । ते अवतरले

गोकुळीं ॥ बहुत प्रकारें । रिझवी माता । नंद गवाळि पिता ॥ दधि मग ठेवि पुढें फुंदु फुंदु रडे । माय घेई कडे । तव अधिकच रडे हरी वनमाळी ॥ घरांत नेतें । बाहेर आणितें । गाती स्वर मंजुळी ॥ राधा नार उभी द्वारीं । रूप लावण्याची कळी ॥ हासे गदगदा हरी । राधिका अनंत मुख प्रक्षाळी ॥ बोले यशवदा सुंदरी । राधेची विनंती करी ॥ न तुझ्या घरीं हा हरी । राधा आनंदली फार ॥ कडे घेई मनोहार । तिचे सासू भ्रतार ॥ गेलीं हाटा एकली घरीं । मुखचुंबन दे वाजवी टाळी । गदगदा हांसे हा हरी । ना तीळ ॥ १ ॥

भरी लोणियाची वाटी । आज झाले स्तन तुटी ॥ तिच्या आंगुळ्या चाटी । पुढें वदन करी दे मुका ॥ दुड दुड धावे नृत्य करी । त्यानें रिझविली राधिका । राधा आनंदली मनी । तुह्मीं भले चक्रपाणी ॥ मजाविण राहूं नका । बसा पालखा तुह्मां हलवितें हळूच देतें झोका ॥ राधा मदनानें जार । जरी असता मोठा मनोहर ॥ तरी पार नसता सुखा । राधिकेचा मानस जाणून उपवर झाला सखा ॥ लावि द्वार घालि कडी खिटी । रूप सुंदर अति गोमटी ॥ राधेला धरी मनगटी । धरी स्तन गळां घाली मिठी ॥ लावी निर्दम ＊ ＊ । केली देहाची मोट ॥ उरीं भरली ऊरपोट । केली चळवळ झाली घाबरी ॥ पुरे हरी हा पलंग मोडला । नवार तुटली सारी ॥ ना तीळ रतीचळ० ॥ २ ॥

घाली मुखांत मुख । अति वाटे कौतुक ।। दावी राधीकेला सुख । करी जुलुम धरी आवळून ।। कांहीं केल्या सोडिना । केली हिंपुटी गेला रंग ढळून ।। जळो असा कसा फंद । तुटले कांचोळीचे बंद ।। नेत्रीं आले असू ढळढळून । हात झिडकावी राधिका ।। पुरे कर देह भाव गेला गळून । सुटे चळचळा कांप ।। मारी दरवाज्यावर थाप । तिचा भ्रतार हाक तळतळून ।। उघड राधे दरवाजा कां फुंदती आले मशीं कळून ।। गेलें अवसान करी प्रार्थना । व्हा लहान जगजिवना ।। हरी झाला निपट बाळ तान्हा । पती उत्तर दे कामिना ।। बैसले हरी भोजना । माझे मनीं एक भाव ।। तुझी कपटी कुभाव । पडला राधिकेचा डाव ।। मग पतीची छळणूक करी । दिली पतीनें रजा राधा नित हरी । आणित जाय घरीं ।। ना तीळ रतीचळ ।। ३ ।।

राधा हरी दोघेजण । किती रिझविती मन ।। तिचें सारें तनमन । मदमक्षिकारशी ।। जरा पडेना चैन राधेला । हरी विण आंधळी जशी ।। ल्याली सोळाश्रृंगार । भांगीं भरुनया गुलाल । घाली अवघा अलंकार भरतारुण्य मुसमुसी ।। अमळ सासू बाहेर गेल्या । घरीं आणी हृषीकेशी ।। एके दिवशीं फार । कामिले मनोहर ।। विसरली द्वार । नालाविलें त्या दिवशीं ।। अवचित आली सासु बाहेरून ।:उभी पलंगापाशीं ।। होती नबार आंत बाहिशीं । करकचून दोहीला कशी ।।

जसें बांधी बांधूं दिले तिशीं । राधा करी हळहळ । गेली अबरू नाहीं ताळ । व्हा लहान गोपाळ ॥ मग विनंती हरीची करी । थोर होऊं जाणतो लहान होईना ही गोष्ट नाहीं बरी ॥ ना तीळ रतीचळ० ॥ ४ ॥

राधा हरी धरून । मारकुटी करून ॥ नेलें यशवदे जवळ बांधुनी । तुझा हरी हा चोरटा ॥ आणून गवळ्यानें घातली धुणी ॥ बरें राहा–तुम्ही स्थीर व्हा । यशवदे पहा–हा पलंग उघडूनी ॥ राधा राधेचा भ्रतार दोघे कसे आणले बांधुनी ॥ बरा केला मेळ–अवघड हरीचा खेळ ॥ हरी माझें तान्हें बाळ– पहा मंदिरांत जाऊनी ॥ पाळण्यांत रडे हरी सावळा बाळरूप होऊनी ॥ राधा खुशाल झाली मनांत । राधेची सासू लज्जीत ॥ नाकळे हरीचें मत । नामी विठ्ठल नामांकित ॥ पुढें हिताचें काम । मुखीं स्मरा राम राम ॥ शिंपी परशराम । कवीश्वरी ॥ शके सत्राशें बारांत होता मुक्काम मथुरेवरी ॥ ना तीळ रतीचळ– तुम्ही कळा अचळ–तूं निर्मळ ब्रह्मचारी ॥ अनंत माया शेष वर्णितां दुभांगली वैखरी ॥ ५ ॥

## लावणी ५ वी.

चक्रपाणी । नको धरूं पाणि । भरूंदे पाणी । जाइल पाणी झाणीं माझें ॥ मी नव तरणी । माया तरणी । देहभान गेलें हरी तुझें ॥ धृ० ॥ अघटित कर्णी । केलि मजकर्णी तुझि कुल-

कर्णी । पडेल कर्णी अवघ्यांच्या ॥ जन सरानिबनी । जातों आह्मीं । सोड पदर हरी नंदाच्या । बामनमुद्रा । बुद्धिसमुद्रा । परखुणमुद्रा । सुवर्णमुद्रा दे अमुच्या । जगदोद्धारा । पर्जन्य-धारा । होती गर्जना गोपिविणा । गोपाल कृष्ण तूं श्रीकृष्ण । तुजविण कृष्ण । असतील तृष्ण त्यांशीं रिझें । मी नव तरणी । माथा तरणी । देहभान गेलें हरी तुझें । चक्र० ॥ १ ॥ कमला-कांता मी परकांता या एकांता । रुक्मिणीकांता पडशि गळां । नको धरूं पदरीं पदरीं । रयतेचा पाळिजे लळा । जगन्यवासी गोकुळवासी । तूं कामवासी । सासुरवासी मी अबळा ॥ मज घरधंदा । चळला नंदा । नको करूं तूं गोपाळा । नाभीकमळा । विनवी कमळा । तुज पदकमळा । वाहिन ऐसें शिर माझें । मी नव तरणी ।माथा तरणी। देहभान गेलें हरी तुझें ॥चक्र०॥ २ ॥ या संसारीं । केलीस्वारी । तूं कंसारी । करून स्वारी खगावर । ऐकुन मुरली । इच्छा मुरली । तव अगाध लीला यदुवरी । हरि गोपाळा । घेऊन पाळा । यमुने पाळा । करून पाळा कमळावर । जन्माशिधोरी । वाटि शिधोरी । भक्तालागीं कृपा कर । पडू यमाते । वरी रमा तें । सुख आह्मातें । तुज वांचुनियां कोण बुझे । मी नवीतरणी । माथा तरणी देहभान गेलें हरी तुझें । चक्र० ॥ ३ ॥ हरिनें राधा केली सुराधा । जय कृष्णराधा । कृष्णराधा सकळ जनीं । कल्प अधिकारा । जग अधिकारा ॥ दृढ धरा राघवा मनीं । भामादानी । कैवल्यदानी ।

बळिच्या दानीं । त्रिपादांनीं । रुंदीवनी । नामीं तरले पार उत-
रले ।। विठ्ठल ध्यातो संतजनीं । परशराम ह्मणे नाम हरीचें
घेतां । नाहीं बहुत ओझें । मी नव तरणी । माथा तरणी
देहभान गेलें हरी तुझें । चक्रपाणी ।। ४ ।।

## लावणी ६ वी.

गणगोताची आशा सोडली संसाराला हात धुतले ।। जीव
घेतो लग्नाचे नवरे परपुरुषीं हें मन रतलें । गणगोताची ।।धृ०।।
पूर्ण ब्रह्म जो ब्रह्म सनातन ज्याला ध्याती धूरजटी । यज्ञ
याग जपतप साधन ज्यास्तव करिती अटाअटी । त्या हरिला
जिंतुन सहपरिवारें यमुनातटीं । यज्ञशाळा उभविल्या हरोहरीं
दिव्य तरूच्या पर्णकुटी । गोपाळांसहित विसरून शिदोऱ्या आला
आनंदी जगजेठी । गोपाळ ह्मणती कसें करावें क्षुधा लागली हरि
मोठी । ऋषिपासुन जा अन्न आणारे हृद्गद जाणून सांगितलें।गण०
।। १ ।। ज्यास्तव करती यज्ञ ऋषी तोच उपाशी वनीं आला ।
श्रीधर स्वमुखीं अन्न मागतो भाग्योदय तुमचा आला । ऐकुन
उत्तर सर्व क्षोभले क्रोधें धुतकारुन त्याला । अवमानून परत-
विलें दांभिक भक्ती भुलले वेदाला । म्हणून अपुल्याकडे
धाडिलें अवघ्याजणी सख्यांनो चला । या भक्तीला आग
लावा निष्काम फक्त कटफाला । सकळ विषय हा भावें
पूजितां मग जितले । गण० ।। २ ।। चंचळ झाल्या ऋषि-

पत्न्या त्यांनीं षड्रसिं हरे भरले । एक राहिली मागें निपट तिच्या पतीनें तिशीं धरलें । न पुसतां कश्चि जाश्चि जारिणी विधि इंद्रानें तुज वरिलें । बंधन करितां उत्तर करी मग अनंत जन्मीं मी फिरलें । स्थूळ सूक्ष्म कारण महाकारण चार देहां- तून तीन उरले । स्थूळ देहाचा स्वामी तुझा तूं होऊन नातें हें ठरलें । भजनीं पुजनीं निमग्न होउनि हरीपदीं मन रमलें । अवघ्याजणी उद्धरल्या देविभागवतिं व्यासीं कथिलें । गण० ॥ ३ ॥ सकळ गोपी विषयानें तरल्या परपुरुषीं ज्यांचें मन रमलें । प्रकृति दृष्टि पाहतां कवलें उफराटें सकळांत दिसलें । तेंच नारदीं जाऊन द्वारके सोळाहजारां घरीं पुसलें । ऐकून भरला रागें त्यावर ब्रह्मरुद्र गदगद हसले । परपुरुषाला गावें ध्यावें स्वहित करणें जर असलें । नामीं विठ्ठल करून पसारा परशराम म्हणें जिविं रुतलें । गण० ॥ ४ ॥

## लावणी ७ वी.

मी चांगट फांकडी रुपानें तूं काळा बेंदरा । दूर होय वाट नको धरूं पदरा, चित्त चोरट्या धिरा ॥ धृ० ॥ वय तरण्या आम्ही गरती देखण्या एकीहून एक रूपचढी । वाट सोड आज हाट मथुरेचा आहे जाणें तातडी । जर दंगा बेढंगा करशील श्रीरंगा तूं या घडी । कवलाचा बाजार कोण लावील फुलाची छडी ॥ चाल ॥ दहीं दुधाच्या कावडी । माठ भरून । तुझे

आडवे झाले गडी । वाट धरून ॥ नाहीं चालणार कांहीं अटी । बोल दुरून ॥ भीड नंदाची म्हणून गम केली मुरवत धरली जरा । कान कातरून हातीं देईन मुकाच जाशिल घरा । मी चांगट० ॥ १ ॥

वनमाळा घाली गळां हातामधीं वेळाची बासरी । पर मोराचे डोईवर बांधून मुगुट मिरविशी शिरीं । काणे कोचे कुबडे येचे मुलें गवळ्याचीं हरी । मिळवून करशील धिटाई तेव्हां मी नाहीं दुरी । जर कां मजवर धिटाई करशील तेव्हां गोष्ट नाहीं बरी । तुझी कळूंदे मज मनसुबी । बोल दुरून ॥ जें दान होईल वाजवी । न्याय करून ॥ काय असेल मना-मधीं खुबी । दाव करून ॥ पाप नजर तुझी परनारीवर जनांत हा बोभारा । नाहीं वाघाचे वाडे बसले पहा विचारून जरा । मी चांगट० ॥ २ ॥

गोरीपान लसलसीत मी गवळण चांगट फांकडी । नग दागिने जडाव अगदीं, मस्तकीं मुद राखडी । जुरत कोणाची पाहील मजकडे नजर करून वांकडी । नाकेदार म्हणशील गोकुळचा घेऊं चवकी रोकडी । नवी तरणी जान जमान । कांहीं वदर ॥ नको आसडूं लचकेल मान । सोड पदर ॥ चांगट म्हणून येशील छान । सांग सदर ॥ बायकांत नाय-कीण होऊन तूं बसली पाहशील कुरा । धूळ घालुन जाऊं मथुरेशीं आम्ही कंसाच्या घरा । मी चांगट० ॥ ३ ॥

अनंतरंग जो श्रीरंग आवडे चित्तापुन गोपिसी । वियोग तयाचा घडी नसाका ही इच्छा मानसीं । तो नाबोले आपुणच बोले करून भलती हशी । आधीं माया लाऊन प्रीतिनें वश केलें हृषिकेशी । करी विलास यमुने तिरा । दहिं लुटाव ॥ कवि नामीं विठ्ठलची तऱ्हा । खूप घटाव ॥ परशराम येसूचे छंद शिरा । करी कटाव ॥ सहजलीला भांग टिळा कशाला दे वचन इल शिरा । अशी पोटाची कमाई लाधेल पहा विचारून पुरा । मी चांगट० ॥ ४ ॥

## लावणी ८ वी.

राज्यीं स्थापिलें पंडुसुता । तोषविलें पांडव भक्ता । तेचि सभा गातों सभेमधी तेचि सभा गातों ॥ धृ० ॥ पांडव वीर भारी । धर्मराज धर्मनीतिचे होते द्वारी । मयासुराचे हातें करविली सभेची रचना सारी ॥ चाल ॥ हें शल्य निरंतर ज्याचे शत्रुच्या हृदयांतरीं । परी न चाले उपाय कांहीं ज्याला साह्य श्रीहरी ॥ ऋषी केले साहित्याकरितां । न्यून नपडे तेथें सर्वथा । नानापरी केली कुशळता । तेजें झांकली जशी विद्युल्लता । तेचि सभा गातों० ॥ १ ॥ सभेमधीं बैठकी बांधिल्या कोण कशा ऐका । रत्नखचित मधीं तक्त बांधिलें यदुनायका । द्रोण गुरू आणि भीष्मकर्ण आणीक ऋषीदिका । श्राण्णव कुळीचे राजे मिळाले यज्ञभूमिका ॥ चाल ॥ प्रथम पुजिलें लक्ष्मीकांता । ऋषी पुजन करी धर्म स्वहस्तां । तेच सभा

गातों० ॥ २ ॥ शिवसभा विष्णुसभा ब्रह्मसभा तृतीयी । इंद्रसभा ध्रुवसभा सांगतों एक सभा सहावी । सूर्यसभा समसभा झाल्या आदिपर्वी । धर्मसभा वर्णिली कशी देऊं उपमा येठाई ॥ चाल ॥ तशी तसे बैसले सभा करून । मी प्रार्थितों कर जोडून । लहान थोर अवघ्यांलागून । जागविलें आज ह्मणून । श्रम मागून घेतों मी श्रम मागून घेतों । तेचि सभा गातों० ॥ ३ ॥ सभेशी बसले सभा करूनि तुह्मी श्रीमंत । पांच तिथें परमेश्वर आमचे भगवंत । वेडें वाकडें गाणें ऐकलें देऊ–निया चित्त । आतां करावी क्षमा मागतों रजा जोडुनि हात ॥ चाल ॥ राम राम घ्या सकळ सभेला । विठ्ठलगुणी कवी नामीं रंगला ॥ मति मार्ग त्यानें आम्हा दाविला । परशराम करी वंदन त्याला । यसूगुण गातो । करूनिया वावीमधीं राहतो । तेचि सभा गातों सभेमधीं तेचि सभा गातों ॥ ४ ॥

## लावणी ९ वी.

दुर्घट माया ब्रह्मादिकांही एक कवीच्या मुला । शेषाला नाहीं अंत लागला काय समजलें तुला ॥ धृ० ॥ ब्रह्मीं माया कोणी पाहिली कोण गुरूचा पुरा । श्वानापरी अवघेच भुंकती दृष्टि गार ना हिरा । निराकार जे निर्गुण ज्योति अभंग अक्षई धुरा । इच्छा रचना त्यामध्यें मिश्रित मूळबीज हें अंकुरा । नर नारी जेथें नांवच नाहीं ह्मणशील कलगी तुरा । ज्योतीची काजळी गोठली विराट् स्वयंभु चिरा । विघ्न वाहाली त्यावर

लेली कोणी प्रमाण बोला । आऊट वज्र हेंच अखंडित श्रीगुरु-
मुखें दाखला । दुर्घट माया० ॥ १ ॥ निरगुण शून्यापून शू-
न्याकार निरगुण इच्छाबळें । इच्छा नारी अचळ चळेना
ज्योतिर्मय आगळें । शून्यापासुन ध्वनि निघे अगणित असे
केवळ । स्वयं ओंकार ह्मणती तयाला शून्य तेंच मावळे ।
ओंकारांतुन माया झाली हिच्याहून झळझळे । मायेपासून
त्रिगुणात्मक हे तिन्ही गुण जावळे । आजी आणि माय
मावशी चारी नाहीं जिला । स्त्री भागणी ती कन्या म तवी
दोष ठेवा तिला । दुर्घट माया० ॥ २ ॥ निज वस्तु संचली
अभास ज्योतिर्मय झगझगी । त्या भवतींच पाहुन मूळ
माया तगमगी । शून्य आकारी येऊन गगन खाण कळगी ।
गगनापासुन वारा गव्हारा तुरा ह्मणावत जगीं । वायूपासुन
तेज निपजलें अग्नीपरी धगधगी । तेजापासुन आप आपापुन
वर पृथ्वी उगमगी । पंच मिळुन मुसा ओतलें ब्रह्मांड तुपट
विणविला । शून्यापासून आंख नव झाले पुढच्या योग्यं
गणाणिला । दुर्घट माया० ॥ ३ ॥ महत् भुतापुन पंच
भुतांतें एकमेकां प्रसवली । जन्मुन मायाचक्र भ्रमतां नांव
नसेत्याप्रती । मायेनें त्याचें नांव ठेविलें एका कोणे रीति ।
प्राण अपान व्यान उदान समान जी उत्पत्ति । त्याहून परता
परमात्मा ज्योति तेथें मायानिवृत्ति । महानंद [illegible] वेले
उभारी चैतन्यापून रीति । जीव शिव दोन्ही भाग लागून

चैतन्यधन कोंदला । म्हणून ह्मणती चैतन्य माया कोण पाहुनि आला । दुर्घट माया० ॥ ४ ॥ निवृत्ति नार गुण प्रकृति पुरुष धातुमय एक मुशीं । पिंड ब्रम्हांडाची रचना झाली निवांत ऐका अशी । भगाईनें सगुणास आणिलें स्वइच्छासमरसीं । ह्मणून श्रीभगवान नांव ठेविलें परि माया विलसी । साधु संत निरगुण मिळाले महान महान ते ऋषी । कोणीच माया नाहीं पाहिली ह्मणून अगोचर पद इसी । घडमोडीच्या अनंत कोटीं अंत नाहीं लागला । तुमची आमची कथा किती जेथें सहस्त्रमुख भागला । दुर्घट माया०॥५॥ निरगुण ज्योती सगूणमाया हेंच खचित अनुभवी । सगुणावांचून निरगुण भक्ती न घडे कालत्रयीं । उंच नीच कोणास ह्मणावें सगुणाचे गंधर्वमही । एक पक्षीं जर निंदा करशिल जाशी तूं गैरवीं । मायबापाची सेवा करून देवच आणिलागाही । खरी सनद परी नयनीं पाहून प्राण्या शाहाणा होई । विठ्ठल बरदे परशराम ह्मणे आला भाग चांगला । निंदा द्वेष कसेंही गाऊं हाच छंद लागला । दुर्घट माया ब्रह्मादिकांही एक कबीच्या मुला । शेषाला नाहीं अंत लागला काय समजलें तुला ॥ ६ ॥

## लावणी १० वी.

त्रिगुणाचें तीनपण केलें सर्व पाहिली मजा । आत्महित काय जन्मुन केलें मी अपराधी तुझा ॥ धृ० ॥ मूळ जनानिच्या

जठरीं जन्मलों उत्पन्न झालों जेव्हां । सोहंशब्द भागाशीं आला इथून सोडवी देवा । सहा जन्मांची आठवण प्राण्या माहित होती तेव्हां । चवजन्मांचीं दुःखें रडशी कांहींच नाहीं अनुभवा । चाल ॥ आली बाळदशा गोजरी । लेण्यानें दिसे साजरी । लेवविती वस्त्र भरजरी । चौभवते हाट गुजरी । मोड । कडे खांदे घेऊन बोलतात हित गुजा । पाळण्यात जेऊन निजविती हाड–शीर ह्मणती निजा । त्रिगुणाचें० ॥ १ ॥ बारा सोळा वीसपंचविशी तारुण्याचा भर । मद विषयामध्यें चाले उताणा पगडी कानावर । वडिलांचें सांगितलें ऐकेना हित अनहित तिळभर । आप्त सोयरे बोलती बळानें दौलतिची भरभर । चाल । तीस चाळीस आले घडून । अवघ्यांवर जरब कडकडून । इच्छिलें कार्य ये घडून । चालता काळ चहूकडून । मोड । पूजेचा वर खटला न पडला अर्धे आयुष्य झालें वजा । नेम धर्म तीर्थ नाहीं घडलें आणिक साधू पूजा । त्रिगुणाचें० ॥ २ ॥ साठसत्तर वर्षें झालीं आली उतरती कळा । शाम केस सफेत झाले मंद दिसतें डोळा । दंत भग्न झाले मुखाची लाळ गळे भळभळा । कोण कोठून आलें म्हणून पुसतसे हातलाऊन निढळा । चाल । उठतां बसतां संकटीं । बुलबुला हाले हनवटी । जवळ कोणी नये शेवटीं । अवयवांशीं पडल्या तुटी । मोड । स्त्री शेजेची राग करिती अजून तरी हरी भजा । शरीर संपदाही निघून जाईल आपण देतील

निजा ॥ त्रिगुणांचें० ॥ ३ ॥ ऐशीं नव्वद वर्षें झालीं अझून नाहीं भरला धुरा । पित्त कफाचा अमल बसला कंठ वाजे घरघरा । गुदद्वारानें धीर सोडला वाजतसे भरभरा । बळें खाटेवर नेऊन निजविती ओढुनिया फरफरा ॥ चाल ॥ घर थुंक्यानें नासलें । शेजारी जन त्रासले । शत वर्षें दुःख सोशिलें । हें असें खर्चांत भासलें । मोड । विठ्ठल नामें परश-राम ह्मणे चुकलों कीं मूळबिजा । रामकृष्ण गुणीं रामा गाती नामें लाउन ध्वजा । त्रिगुणाचें तीनपण केलें सर्व पाहिली मजा । आत्महित काय जन्मुन केलें मी अपराधी तुझा ॥ ४ ॥

## लावणी ११ वी.

एकुणरीला उणें बोलती एकाहून एक आगळी । आप-आपल्या स्वरूपाला वाणिती गोरी आणि काळी ॥ धृ० ॥ काळी ह्मणे गोरीला एक हा मुळाहून वृत्तांत । कांहींच नवतें रात्र काळी अक्षई आदि अंत । शून्यापासून आकाश काळें पाहे घादांत । आकाशापुन वायु त्याचा निळा रंग नित । वायुपासून तेज तांबडें व्यापून आप श्वेत । आकाशापासून पृथ्वी झाली वर्ण तिचा पीत । पांच मिळोन मूस ब्रह्मांड ओतली काळी श्रेष्ठ त्यांत । काळ पुरुष करी उसास गगनीं बसून अहोरात्र । काळमानें आयुष्यास ओळखिलें अभिमान गाळी । एकुणरीला० ॥ १ ॥ गोरी ह्मणे काळीला वाणिशील

तुझच तूं सारें । कांहिच नवतें निर्गुण होतें ज्योतिर्मय गोरें । ह्या ज्योतीची जमली काजळी आकाश निर्धारें । मधें निर्गुण तें सगुण झालें शून्याकारें । श्वासोच्छ्वासाशी चंद्र सूर्य दोन्ही पांगोर । नाभी निघालें अष्टकमलदल पुष्पपत्रभारें । नाभी ब्रह्मा हृदयीं विष्णु मस्तकीं हरिहर । एक स्वरूप हरि त्रिगुण झाले ब्रह्मवणीस न्यारे । तारांगणें नव लक्ष निघालीं रोमरंध्रें सगळीं । एकुणेरीला० ॥ २ ॥ काळी ह्मणे गोरीला लाविशील मोठेपण वाया । काळी बाहुली मी नेत्रां तधीं जनयात्रा पाहाया । काळें काजळ काळ्या पापण्या काळ्या दोन्ही भिवया । काळे केस मस्तकींचे बसशील चौरंगीं न्हाया । काळी आंत गरसुळी आहेवपण जगांत मिरवाया । काळें दांतवण न लाविशील तर शुभ्र दंत लाह्या । काळी शाई काळीं अक्षरें हरीचे गुण गाया । काळी कस्तुरी उंच मोलाची अरोग्य करी काया । काळी मृत्तिका करून पार्थिव पुजी प्रातःकाळीं । एकुणेरीला० ॥ ३ ॥ उलट जाब काळीला गोरी मग सरसाऊन देती । नेत्रीं बाहुल्या कशानें पाहशील आंत गोऱ्या ज्योती । गोरी कांती गोरें सुवर्ण गोरें मोती । गोरें रत्न करून परीक्षा श्रीमंत जन घेती । गौर चांदणें गोरा चंद्र गोरा गभस्ती । उदय होतां यज्ञ याग आणि स्नान दान करिती । गोरें आप्त दुर्लभ सर्वां गोरा ऐरावती । गोरा अग्नी परिपाकामधे ब्रह्म देह पाही । एकुणेरीला० ॥ ४ ॥ काळी गोरीचें

भांडण असें चढावढी होतां । आली सांवळी तिसरी म्हणती कां भ्रमणीं भ्रमतां । काळें गोरें हे एकाचेंच आंगीं अक्षई आदि अंता । रहा आनंद करून येथून निर्वैर होइल आतां । निवृत्ति प्रवृत्ति दोहींची झाली लाघव मूळवार्ता । समाधान चित्तीं वृत्ती नामीं विठ्ठल गीत गातां । कागपिंगळा हंस बगळा भिन्नभाव पाहतां । परशराम म्हणे असार सोडुन सार घेई हातां । भेदा-वांचुन करिती बाहिरी पोटास्तव दुबळीं । एकुणेरीला० ॥ ५ ॥

## लावणी १२ वी.

तुझी लीला तूंच वदविशी । बहु एक नानापरी । कर्ता तूं करविता वेगळा होउनियां श्रीहरी ॥ धृ० ॥ दहा गर्भवास सोशिले । त्वां भक्ताचे संकटीं । शंखासुर मर्दिला । समुद्र मंथिला । धन्य तुझी हतबटी । चौदा रत्नें काढिलीं हरीत्वां । परोपकारांसाठीं । [ चाः— ] धरि कांसवरूप आगळें । पृथ्वी रसातळिं जातां । पाठीवर धरिशी सर्व । तूंच रक्षितां । कां संकट हें तुजला । दाविशी लीला भक्ता । वराह वेष नटलास हरी तूं । पृथ्वीचा कैवारी । रसातळा जातां मग तूं । धरिशी दाढेवरी ॥ तुझी० ॥ १ ॥

नरसिंह रूप । धरिलें तेव्हां । खांबामाधें गुरगुरी । हिरण्य कश्यपु वधुनि प्रल्हादा । राज्य दिलें श्रीहरी । वामन रूप हें । लहान धरिलें । धन्य कळा कुसरीं । अन्नदाता सर्वांचा बळिचें ।

दान घेतसे करीं । [ चाः— ] अर्ध पादभूमि उणी । आली वचनाशीं । बळि ह्मणे शरिर घे । अर्धपादाशीं । वचनिं गोवुनिं । शेवटीं घाली । पाताळाशीं । असा तूं सहाय झाला इंद्रा । त्या समयासीं । फरशू धरिला हातीं । निक्षत्रीय माय कैवारी । नेमाशीं तूं कधिंना टळशी । ह्मणविशि ब्रह्मचारी ॥ तुझी० ॥ २ ॥

राम अवतार । धरिशी तेथें । बहुदाविशी लीला । रावण वधुनी । बिभीषण स्थापिला । प्रताप बहु आगळा । श्रीकृष्ण नटशि । चिमणी मूर्ती । तें जेव्हां गोपाळा । मातापिता कैवारें तोडिल्या । बंदीच्या शृंखला । [ चाः— ] कंसासुर मर्दुनी खेळशी । विलास गोकुळीं । गोपीवश केल्या मनमोहित वन- माळी । करि पराक्रम भारी । पर्वत धरि अंगोळीं । रासक्रीडा बहु केल्या पूतना । कपटी निर्दाळी । अशि नाहींच । झाली लीला । कोणत्याहि अवतारीं । बौद्धरूप झालासि । आतां कोण संकटें वारी । तुझी० ॥ ३ ॥

होणार कलंकी । पुढें शास्त्रीं । भेद असा कथिला । असे अनंत अवतार तुझे हे । शेष वर्णितां शिणला । मी वर्णुं काय एक मुख वैखरीस शीण आला । कळा वेगळा । करुन निराळा । भक्तिगुणें भुलला । [ चाः— ] पुंडलिका पावला राहिला । उभा निट विटीं । जो दुर्लभ देवा संतजना । तो दे भेटी । समचरण साजिरी मूर्ती । शाम गोमटी । नामिं विठ्ठल वरदे ह्मणे परशराम धरि कंठीं । रामकृष्ण गुणि । रामा गातो ।

गायन कोकिळा परी । येसुचा छंद चकाकत जणू । सजवट कोल्हापुरीं । तुझी० ॥ ४ ॥

## लावणी १३ वी.

दहा शिंदळक्या करीन परंतु एक लग्नाचा नको नवरा । माहेरीं माझें चित्तमन रमलें सासरचा नलगे वारा ॥ धृ० ॥ आधींच मी चंचळ पहिल्यापुन मूळ माहेरीं फंद पडला । घर भावाचें बळें निघालें त्याचा माझा संग घडला । रस्तम काठी अक्षई दोन्ही सत्वावर डोळा जडला । त्रिकुट चोहोटा पाल मांडिलें यथार्थ पाहूनया पुढला । दहा दारीं नित गरका घालून प्राणसखा एक निवडला । गणगोताशीं निसंग होऊन नाहीं मानलें मीं वाडिलां । सहा चवघांचे वचनें रिझलें म्हणून जीव झाला सवरा ॥ दहा शिं० ॥१॥ भरज्वानीचा धूर डोळ्यांवर कळों लागली जिनबाजी । आधींच मन मोहिलें तुह्मांस्तव पन लावून केली राजी । कामक्रोध हे सर्व छपाऊन सोदे शिकंदर गडे पाजी । वैराग्य पलंगीं शेज सवारून नामावर पुष्पं ताजीं । पर पुरुषाची चटक लागली त्यावर मर्जी खुष माझी । दीर भावे जावा नणदा प्रपंचांत पडले माजी । सासू सिद्या प्रपंच सासरा ठिकाणींच आपला डवरा । माहेरीं माझें चित्तमन रमलें सासरचा नलगे वारा । दहा शिंदळक्या० ॥२॥ दहाजणी मी बसांत आणिल्या प्रेमाचें पाजुन पाणीं । नवा-

जणींची संगत घडली सोग्याचें काजळ नयनीं । कुटण जगाची जुनाट पक्की तिनें वीर फुंकून कानीं । तेच शब्द मीं हृदयीं धरले इतर पसारा धुळधाणी । चढून घाट अवघड वाट वर वाहे झुळझुळ पाणी । सतरावीपुढें दुसरी तिसरी एकीहून एकचढी शाहाणी । त्रैअवस्था त्रिवेणी संगम घणघणाट घणके भवरा । माहेरीं माझें चित्तमन रमलें सासरचा नलगे वारा । दहा शिंदळक्या० ॥ ३ ॥ परेहून परता त्याहून वरता परपुरुष पाहुनवाई । करुन इतकें पतिव्रता मी मन याला माझें ग्वाही । आर्जवाचें बोलणें साहिलें सासरा ना माहेर कांहीं । फुटलें जातें तुटलें नातें अंतर खुण मनीं समजावी । पतिव्रतेला विचार ऐसा जागे सख्यांनो लवलाही । विठ्ठल वरदी परशराम गुण येसू नामी छंद गाई । चंगावरती निशाण कलगी बांधुन गातों ब्रिदचवरा ॥ माहेरीं माझें चित्तमन रमलें सासरचा नलगे वारा । दहा शिंदळक्या० ॥ ४ ॥

## लावणी १४ वी.

कैवल्य बाल द्रोपदी करी तदीं रुदना । कशि गांजियली द्रोपदी केली छळणा ॥ धृ० ॥ खेळे कपटी दुर्योधन खेळे द्यूत–कर्म । जिंकुनि घेतलें राज्य हरला भोळा धर्म । वनवास बारा वर्षें केला नेम । पुढें वचन दिलें मग सरला पराक्रम ॥ कशि द्रोपदी सभेसी आणिली गोरी । ह्मणे बैस मांडिवर हो ईंगे

जवरी । तो गर्व निधि बैल दुराचारी । मारि बाण शब्दाचा भेदुनि गेला उरीं । पुढें शाप दिला घे करून नार गांधारी ॥ मांडीवर बसेल भीम गदा दुर्योधना । पर नारीसाठीं काय झालें रावणा ॥ काशि० ॥ १ ॥

तों दुर्योधन बोलला क्रोध भरला ॥ तो करी गर्जना सिंधु जसा उचंबळला ॥ काय पहातां नग्न करारे इजला ॥ दीर दुःशासन हात घालि वेणिला ॥ बोल द्रोपदी दीरां दुःशासना ॥ सोड वेणि लचकली माझा मान दुस्माना ॥ वेणि सोडाया विनवी भीमार्जुना ॥ घालिती खालती पांडव पांची माना ॥ घे धांव संकटीं देवकिच्या नंदना ॥ गुंतलासि कवण्या ठाईं धीर धरवेना ॥ सोड गोपांगना घे धांव लक्ष्मीरमणा ॥ काशि० ॥ २ ॥

गरुडासहित आले धांवुनि दिंडे सोडी । पाटाव शालदूशाल घडीवर घडी । खंबायति पितांबर तो मद्रा कडकडी । काळी चंद्रकळा जरा बैंगणिशी चुनडी । बहुमोलाची मुंबइची पातळं जरी । अष्टगोल किनखाप बुट्टेदारी । शाल मैलारचा शिट संगमनेरी । मदनगलोल आणिला जालनापुरी । चोळि महेश्वरी नामगोड किनरी । अष्टिचा धोतरजोडा मोलकर शाहण्या । नारायण पेठ वऱ्हाणपुरचा जुना ॥ काशि० ॥ ३ ॥

उत्तर दक्षिण पूर्व पश्चिम ऐका । वस्त्र खरेदी केलें नवखंड भूमिका । शेट थोर शारंगधर पेठ द्वारका । द्रोपदिची लज्जा

राखिली संकटीं देखा । जसि वस्त्रांवर ती वस्त्र आलि नेसून । जणु पर्वत पडले शिणला दुःशासन । दीनबंधु करि भगिनी बोळवण । नामीं विठ्ठल परशराम गातो गुणा । रामकृष्ण रामाचे छंद भुलविती मना ॥ काशि० ॥ ४ ॥

## लावणी १५ वी.

अंतपार नाहीं हरिचा कळला बोलती शास्त्र श्रुती । शेषाला नाहीं अंत लागला कुंठित झाली मती ॥ धृ० ॥ चार युगें सहस्र वेळां एक ब्रह्मच्याचा दिवस झाला । तितकींच युगें रात्रीं खालीं करून वांटणीं नीट बोला । सवा लक्ष घडी मोठी विळभर आणूं विश्रांती नसे ज्याला ॥ एक्या दिवसांतून चवदा इंद्र दहा अवतार महाविष्णूला । असे दिवस ब्रह्मच्याचे तऱ्हा घडी भरतसे विष्णूला । विष्णु घड्या जंव बारा लक्ष लक्ष पळ येतसे शिवाला । तिन्ही देवांला तीन शंभरा आयुष्याची एकच गणती ॥ हिशोब येइल तर करून पाही दूर कर तुझी लीलावती । अंतपार० ॥ १ ॥ शंभर वर्षें आयुष्य विधिला किती युगें झालीं कर गणना । विष्णु महेशा अंत होय जंव मार्कंडीचा कल्प ह्मणा । महान महा असे आयुष्याचे जावी एकाहूनि एक शहाणा । शेष मुखांतून तोंडाळ बोलका एक निवडून दावीव शहाणा । वद मानवा राजेंद्र शिणला पार नाहीं कळला कवणाला । सद्गुरुवांचून न पडे ठाईं साधुसंत जाणती खुणा । तोंडसटाळे हिशोब पुसतां टोळी मानतो घरीं येईना । लीला-

वतीचे पाहून अढाखे ज्याशीं त्याशीं घाली पैना । ब्रह्मे असंख्य युगें एकसहा होती ॥ अशीं चार सहस्रयुगें त्यावरून गणना होती ॥ अंतपार० ॥ २ ॥ सतरा लक्ष अठावीस हजार कृतयुगाचें प्रमाण । बारा लक्ष शाणव हजार त्रेतायुग ह्मणती जाण । अठरा लक्ष चवसष्ट हजार द्वापाराचें संपूर्ण । चार लक्ष बत्तीस हजार कली चालतो विद्यमान । चवयुगांचा धुरा एकंदर बैस सांगतों कर मनन । लक्ष त्रेपन वीस हजार बेरीज याशीं घे करून । यापरी निर्णय असा युगांचा करून दाखवी भिन्न भिन्न । नामीं विठ्ठल परशराम ह्मणे कळों येईल गुण अवगुण । रामकृष्ण गुणीं रामा गातो फार अक्षरें निवडून रती । वितंडवादी वाद करूनी जातील अधोगती । अंतपार नाहीं हरीचा कळला बोलती शास्त्रश्रुति । शेषाला नाहीं अंत लागला कुंठित झाली मती ॥ ३ ॥

## लावणी १६ वी.

जग जायाचें । जसे तशी ही । क्षणभंगुर काया । हरि भजनिं असावें । सावध होशी । वृथाच मग जाशी वाया ॥ धृ० ॥ चवदा कल्प । आयुष्य ज्याला । तृण शिरिं ज्याचें दिनराती । तेही मानिती । पाहुन तैसे ॥ तुमची आमुची कथा किती । बगदालभ्य । कपील लोमेश । रोम झडे एक कल्पांतीं । महान महान असंख्य ऐसें होउनि गेले नी होती । असे स्वतांला साच मानुनी श्रमिष्ट जर करशिल काया ॥ जग० ॥१॥

'रा' अक्षरीं । अनादि सिद्धी । 'म' कार झाला मग पुढती ॥ दों अक्षरीं । सार निवडुनी । कंठीं वाहे उमापती ॥ विषाचें अमृत नामें प्रल्हादाला प्रचिती । नामें तरला गजेंद्र गणिका । नारद भ्रमती त्रिजगतीं ॥ वेदवाणी कुंठित झाली । श्रवणीं बसली ऐकाया ॥ जग० ॥ २ ॥

परीक्षिती हरिगर्भी असतां नांव ठेविलें परीक्षिती ॥ सातां दिवसां । मोक्ष लाधला । अक्षरं किमया । आली हातीं ॥ उद्धवास साधला साधला । जातां जातां जगत्पती । तोचि नामा । तुकया वाणी । होउनिया नामा गाती ॥ अजामेळ हा । नामें तरला । दीनावर करितो छाया ॥ जग० ॥ ३ ॥

नामें तरले । असंख्य पापी । नामें नटली वसुंधरा ॥ नामें तरलें । दगड सागरीं । नामें तेज शशि दिवाकरा ॥ नामें विठु परशराम ह्मणे । नामाचा महिमा सारा ॥ रामकृष्ण गुणि रामा गातो । भाव धरूनियां मनी पुरा ॥ तुटेल नामें पाश भवाचा येसुगार अशा छंदाया ॥ जग० ॥ ४ ॥

## लावणी १७ वी.

केस थोडे बाई । पुरुष इतके । करूं करू बसले तपी । इतुकें करून पतिव्रता आगळी । घर माझें निजरूपीं ॥ धृ० ॥ त्रिगुण तीवाशाची झोपडी । दहा दरवाजे तिला । कडी कवाडें । असून उघडें । एक महामूर काविला । पांचांचा परिवार । पंच-

बीस घरांत । नित गलबला । सासु अयोध्या । प्रपंच सासरा । नित्य गांजितो मला । कामक्रोध दीर । फारच खंदे । जीव माझा कावला । आशा मनसा । जावा यांनीं । घरचा बाह्-बला नणंद ही कल्पना घडोघडीं । लोटुं पाहे तमकुपीं । इतके करून पतिव्रता आगळी घर माझें निजरुपीं ॥ १ ॥ पति संसार दुःख मज देतो । सुख नाहीं पळघडी । मन आवरून । बळेंच धरिलें । त्याशीं केलें निजगडी । उसीं पायथीं बोध बोला । अनुताप कडकडी । घर भावाचें बळें निघालें । निसंग घातली उडी । मायबाप दोघे । जिवें मारले । झालें जगतीं सडी । गणगोताची आशा सोडली । सहा चवघांच्या रुढी । पुण्याई तीन । एक जुनाटपकी । दीप लाविला दिपीं । इतकें करून पतिव्रता आगळी घर माझें निजरुपीं ॥ २ ॥ वैराग्य पलंगीं । सेज सवारुन । केली म्यां चाटिपटी । ज्ञान अंजन । घालून डोळां । बनली बिर बाहुटी । नाम पुष्पें हार । गजरे गुंफले घेऊन । चंदन उटी । परपुरुषाची । वाट पाहातसे । बसून निरंजन मठीं । रात्रंदिशीं एक तार लाविली । कधीं पाहीन हृटतटीं । निसंग झालें । सवरी नवरी । अक्षदा बळवटी । कुमार-पण नाहीं । अझुन मोडलें । करुं नका अद्यापि । इतकें करून पतिव्रता आगळी । घर माझें निजरुपीं ॥ ३ ॥ एकापासून । अनेक झाले । अगणीत नेणों किती । परपुरुषावीण । नगमें पळभर । म्हणून मी नित सती । नवपण माझें । अझुन सरेना ।

कुंठित झाली मती । ज्यासाठीं भ्रमणीं पडलें । ती वस्तु आली हातीं । जिकडे तिकडे । माझीच मी आनंदली चित्तवृत्ति । नामीं विठ्ठल । परशराम येसु । छानून गाती रती । रामकृष्ण गुणीं । रामा सार अक्षरें वोवुनि गुफी । इतकें करून । पति-व्रता आगळी । घर माझें निजरुपीं ॥ ४ ॥

## लावणी १८ वी.

शुद्ध सत्व ज्याची क्रिया तयाला कांहिंच अवघड नसे । क्रियाहीन जे अमुक प्राणी भूस कणा हीन जसे ॥ धृ० ॥ जन्म पुसाल घटांत झाला नाम अगस्ती तया । मृगासवल्याले वस्त्र नाहीं तंतु जया । भोजपत्र आणि वस्त्रउपवनु ज्याशीं लया । कंदमुळाविण आहार न रुचे मन जळगंगा जया । उदरीं भस्म केलें आतापि वातापि दैत्य पावले लया । इलाविल तिसरा समुद्र लपाला देह आपुला जगवाया । तीन आचमन केले सिंधु सगळा एक दैत्याच्या मिसें । लघवी करून रत्नाकर भरला अद्यापि जळ खारसे । शुद्धसत्व० ॥ १ ॥

कणाचक्र पहा एकच घोडा सूर्याच्या रथीं असे । अरुण सारथी तोही लोला हातपाय त्याशीं नसे । निढळ मार्गीं फिर आकाशीं आधार कांहीं एक नसे । एक कणा मेरुच्या मस्तकीं कळ राहटी फिरतसे । असें रणकंदन करीत असतां चळी जातसे । छपन्नकोटी भवतां फेरा साठ घड्या पुरतसे । सहज नखाग्रीं लागे ज्याला पृथ्वीवर प्रकाशे । शुद्धसत्व० ॥ २ ॥

देहकांती सुकुमार शेषाची दंडदोर ज्या हरी । करश्रवण नाहीं वाटत हरी करी । पोटानें चालला वेटोळें घालून निद्रा करी । सकल सृष्टीचा भार केवढा अखंड वाहे शिरीं । अभक्तांच्या भावें दुःखें ओकित गरळा विषें । जेव्हां तेव्हां फढी सरसावी पृथ्वीकंप होतसे । शुद्धसत्व० ॥ ३ ॥

विजयी लंका अथांग दर्या भौतीं खंदक भरून । तेहेतीसा कोटी देव रावणें बंदीं घातले धरून । अजिंक्य झाला तो सर्वांला तप सामर्थ्यें करून । नवग्रहांच्या करून पायऱ्या नित्य वागे त्यांवरून । एक वचनी एक पत्नी श्रीरामचंद्र अवतरून । निराहार व्रतें सौमित्रें धरिलें चवदावर्षे पुरून । फळाहारी अठरा पद्में क्रियावंत येतसे । म्हणून घेतली लंका विठू परशराम गातसे । शुद्धसत्व ज्याची क्रिया त्याला कांहींच अवघड नसे । क्रियाहीन जे अमुक प्राणी भूसकणाहीन जसे ॥ शु०॥४॥

## लावणी १९ वी.

करमणुक काढा क्षणभरी शिवास ह्मणे पार्वती । शिवशंकर हरहर कर्पूर गौर भोळा चक्रवर्ती ॥ धृ० ॥ धवलागिरी गडपर्वत बांका एकांत स्थळ पाहुनी । सारिपाट मांडिला जयानें बसून व्याघ्रासनीं । परस्परांवर डाव लावितां । खेद वाटतां मनीं । अकस्मात दर्शनास तेथें आले नारदमुनी ॥ [ चाः– ] भावे नमुनी तो शूळपाणी । बसविले सिंहासनी । करि विनात करजोडुनी । तुह्मि खेळ घालुन पणीं । मधुर गायनीं उत्तर करितसें वीणा घेउनि हातीं ॥ शिव० ॥ १ ॥

शंखडमरू और खड्ग त्रिशूळ चौं डावें जिंकिलें । तुंबा आसन गजचर्म कडासन । एकहि ना राहिलें । हातिं रुंडमाळा विभूत गोळा । नंदीसहित हरविलें । दत्तादिगंबर चिन्मय तेथें उठून उभें राहिलें ॥ [ चाः— ] मग नारद उत्तर करी । स्त्री अगोचर ज्याचे घरीं । तयानें जावें देशांतरीं । ही गोष्ट मानिली खरी । रुसुन सदाशिव वनांत गेले भाव धरुनि चित्तीं ॥ कर० ॥ २ ॥

हांसी साठीं फांसी पडले हर मजवर गेले रुसून । उदास लागे कैलास मला कळवळतें माझें मन ॥ [ चाः— ] झाला मजपासून अन्याय । गेले वैतागुन करुं काय । कुणि सांगा मज सदुपाय । कधिं पाहिन त्यांचे पाय । पुत्र पित्याविण तिन्ही बालकें किलवाणें दिसती ॥ करम० ॥ ३ ॥

## लावणी २० वी.

देह गेला तरि जावो परंतु नेम नटळे कधीं । अह्मा स्त्रियांचा । स्वधर्म ऐसा । लक्ष पतीच्या पदीं ॥ धृ० ॥ सकळ तीर्थें । धर्म अवघे । सर्वहि एकीकडे । सद्भावें पतिसेवा कारितां । अवघे तिजला घडे । मी सेवशीं तिष्ठत दासी । करद्वय जोडून पुढें । सत्वशीळ ह्मणुनि । वैभव पाळी । पळभर वरना चढे । जशी कमळणी असतां जळीं–तशी जवळीं मी पतिचरणीं । लक्ष लावि शशिमंडळीं । दृढ भाव

स्वरचित्तीं गाई आर्जविते गुणनिधी। देह गेला तरी जावो० ॥१॥ चोपाळ्यावर। पहुडि पतीला । आपण तांदुळ सडी । सवेंच होता। जागा भ्रतार। पाणी मागे तत्घडी। तशी उठली। घाव न देतां। आधार मुसळ सोडी । मनभंग होईल पतीचा ह्मणून। लगबगीनें तांतडी। होती शेजारीण जवळ। ती पुसे सतीला केवळ। कसें स्थापिलें आधार मुसळ। हें गुह्य सांग मज आधीं। देह गेला तरी०॥ २॥ सती ह्मणे पतिव्रता पण करशील तर तूं होशिल अशी। उत्तर ऐकून घराशीं आली प्राणपतीला पुसे। मी झालें पतिव्रता आजपासून तुह्मीं व्हावें तसें। बसेन सडाया तांदुळ मागा पाणी तृषेच्या मिसें। तुम्ही पती माझे ईश्वर—मी तुमच्या पायाची किंकर। परी त्याशीं वाटेना खरें। काय करील पुढें कळेना संशय चित्तामधीं। देह गेला तरी जावो० ॥ ३ ॥ करी सेवा निर्मळ निश्चळ असा एकमास लोटला। कांहीं तरी पालट पडला असेल म्हणूनि संशय चित्तीं वाटला। आज मागा मजपाशीं पाणी यास्तव जीव आटला। सांगितल्या सारखें करी मग कंठीं प्रेम दाटला। दे पाणी निजहस्तकीं। करी कांडण स्वहस्तकीं। सोडितां मुसळ वरून कीं। येऊन सतीच्या भाळीं पडलें रुधिर वाहे जशि नदी। दे० ॥ ४॥ धनद्रव्य लुटाविलें तुजसाठीं सर्वांशीं नाडिलें। तुजसारख्या बाष्कळ ह्मणुनियां मुसळानें ताडिलें। थर थर कांपे पती स्त्रियाला आजपासून हात जोडिले।

पण निश्चय एक सती । जन सभा चतुर भाविती । नामी विठ्ठल कवीची मती । परशराम येसूचे छंद जशी साखर विघरे दुधीं ॥ दे० ॥ ५ ॥

## लावणी २१ वी.

पुत्र असावा । सुपुत्र ज्याचें । जनलोकीं अवघे गुण घेती । काय कामाचें । दहा विस असुनी । अभिमानांमधिं धूळ माती ॥ धृ० ॥ सूर्यवंशिं श्रीराम जन्मले गेले लंकेवर फक्त सडे । कुंभकर्ण रावण देखा । गर्वदृष्टिनें केले झगडे । मांधारीस अंगद झाले वानर असुनी वय थोडे । सभा मंडप घेराले । कौरव काय होते थोडे । धन्य भाग्य कुंतीचे उदरीं । धर्मभीम अर्जुन गाढे । कुच कामाचे । गांधारीचे । एकोत्तरशें जणुं रेडे ॥ पुत्र० ॥ १ ॥

पतिव्रता अंजनीस झाले । हनूमंत महासायासी ॥ लक्ष्मणाला शक्ति लागतां । आणियलें द्रोणागिरिशीं ॥ भगीरथानें गंगा वळिवलि । उद्धरिलें पूर्वजाशीं ॥ साठ हजार असुनि संग्रामीं । असुन नसुन काय अपेशीं ॥ पांडवांनीं भक्तिसुरांनीं देव केला अपुल्याशीं ॥ एकोत्तरशें किटक मारिले । वोतान्याची मोड जशी ॥ पुत्र० ॥ २ ॥

वसूदेव देवकीस झाले । श्रीकृष्ण एक निधान । छप्पन-कोटी यादव मेले परस्परांचा घेउनि प्राण। वैनतेचा पुत्र गरूड ।

हरिचा झाला वहान ॥ पांच पुत्र भीमकासि होते । रुक्म्यानें धरिला अभिमान । भागवत भारत लिहिलें ज्यांनीं । धन्य व्यासमुत निधान । आधीं पुढलें । भविष्य कथिलें । वाल्मिकानें सप्रमाण ॥ पुत्र० ॥ ३ ॥

पुत्र असावा । शुक्रासारिका । हरिला भजतां दिनरातीं । निस्तुक नसतां वंशबुडतां तसा नसावा कुपात्रीं । विठ्ठल नामीं छंदा गातो । तोंड लावुनी शास्त्री । परशरामाचे अजब तोडगे अशा फुकण्या गणनें किती । रामकृष्ण गुणिरामाची जुटि । जणु बिनमोल लालड मोतीं । बावींगांव चहु दोशीं गाजलें । येसुचा छंद सकळ घेती ॥ पुत्र० ॥ ४ ॥

## लावणी २२ वी.

दुधीं धुतल्या निर्दोष पुरुषमळेना तीळरती । अह्मां स्त्रियांची जात ढाळ मोत्याला असे किती ॥ धृ० ॥ पतिव्रता सती । गौतमकांता । इंद्रानें भोगिली । साठ सहस्र । वर्षें शापें शिळा होऊन डागली । देवयानी । शुक्र कन्या कचयानें भोगिली । ययाति राजा । क्षत्रिय वरला ॥ जुनी कथा मागली । चाल । लुब्धली रामचंद्रा मैरावणाची राणी । पतिमरण सांगितलें दिलें संसारास पाणी । द्वापारीं तीच भामा कृष्ण । तिनें दिला दानीं । तुळशीदळ देऊन सोडविला रुक्मिणीनें श्रीपती । दुधी धुतल्या० ॥ १ ॥

सूर्यमंत्रीं कर्ण जन्मला कुंतीस कुमारपणीं । गुरुपत्नी चंद्रानें भोगिली बुध झाला त्यापासुनी । भारद्वाज रायाचें वीर्य राघु जाउनी आणी । इंद्र झडपतां मार्गीं सांडलें बाळें झालीं तिन्ही । चाल । पाराशर दुर्गंधा, तो द्रोणगुरु तिसरा । त्या पाराशरापासून पुढें ऐका गुण चातुरा । झाले व्यास नारायण त्या दुर्गंधीच्या उदरां । दुर्गंधाची केली सुगंधा शांतुवर तिजप्रती । दुधीं धुतल्या ० ॥ २ ॥

पण भेदून अर्जुनानें परणिली पांचाळी द्रौपदी । दोन महिन्यांवर बारा दिवस आली वांटणी सुधी । कर्ण कुंतीला साह्य असतां म्हणे मूळ पाहूं आधीं । जांभुळफळ लटकेना तेव्हां विदित केलें श्रीहरी तधीं । चाल । मृग कंचुकी इच्छितां नेली सीता रावणानें । सहा महिन्यां सोडविली जीव घेऊन रामानें। याकरितां स्त्रिया आम्हीं नित्य असावें नेमानें । पति ईश्वर मानून आपल्या जगांत सुख आचारती । दुधीं धुतल्या० ॥ ३ ॥

पतिव्रतेची सत्ता महिमा जिचा देवावरी पहा । त्रैलोक्यामधीं श्रेष्ठ निवडली अनसूया एक महा । तिन्ही देव तिनें करून बाळकें पाळण्यांत म्हणे रहा । दत्त दिगंबर कुशिं मज व्हावें सोडून दिलें तेव्हां । चाल । निर्गुण पूरुष म्हणती तीस जी सगुण तीच माया । अहो रूप ना जर नारी भांडती मूर्ख वाया । यास्तव हें वृत चाले नाहीं नावळ कविराया । विठू परशराम म्हणे सुभावण्या दे गायाला मती । दुधीं धुतल्या० ॥४॥

## लावणी २३ वी.

उठ झाला प्रातःकाळ तुझे गोपाळ आले घननिळा । पूर्वदिशे उदयला भानू आला उदयाचळा । प्राणिमात्र पशुपक्षी विश्रांतवृक्षीं आपापल्या स्थळीं । निद्रा सावरून जागृत होती पंचा षट्कर्मादि ऋषि योगी तापसी गुप्त जळीं स्थळीं । सकळ विहंगम काक पिंगळे किजबिजती एकेवेळीं । रावे मयुरे हंस साळया सुस्वर मुखकमळीं । सद्भावे तुज गाती ध्याती स्वमुखें नामावळीं । मंथनास प्रारंभिती गोपी घरोघर त्या गोकुळीं । सडासंमार्जन करून घालिती रंगमाळा गंगोळी । कनकाचे घट शिरीं यमुनातिरीं जाती आणुं जळा । पूर्वदिशे उदयला भानू आला उदयाचळा । उठ झाला प्रातःकाळ तुझे गोपाळ आले घननिळा । पूर्वदिशे० ॥ १ ॥

क्षुधित वासरें सोडून–धार आणि काढून झडकरी । गोपवृंद्र उभे द्वारीं बहाती, मुखमार्जन तूं करी । दुधि दग्ध, नवनीत साय ही मुखीं भरी । घृतामिश्रित शर्करा उभी मी घेऊन आपल्या करीं । मधुसूदना माधवा मुकुंदा नारायणा नरहरी । रामकृष्ण विष्णु सर्वोत्तम आलाशी मम उदरीं । त्रिविक्रमा केशवा जनार्दना माया स्तवी यापरी । उठ कान्हा ताम्हया आळवितां शिणली ही वैखरी । निद्रा तुझी कशी नासरे माझ्या तूं भक्त-

वत्सला । पूर्वदिशे उदयला भानू आला उदयाचळा । उठ झाला प्रातःकाळ तुझे गोपाळ आले घननिळा । पूर्वदिशे० ॥ २ ॥

निज जननीचे बोल प्रेमसुखें डोले आले अंतरी । उठून धरी कटी कवळून माता—लिंबलोण उतरी । काकडआरत्या करून येते हातीं धरून सदनांतरीं । व्रजांगना लक्षावधि आळविती मंजुळ मधुरोत्तरीं । छत्रचामरें ढाळिती हरीवर जातां वनांतरीं । नृत्य करून गातात सवगडे भवते सविस्तरीं । बोळवित निघतां नितंबिनी यमभागिनीच्या तिरीं । नंदयशवदा पाहे नेत्रीं जळ वाहे असूं ढळढळा । पूर्वदिशे उदयला भानू आला उदयाचला । उठ झाला प्रातःकाळ तुझे गोपाळ आले घननिळा । पूर्वदिशे० ॥ ३ ॥

वनक्रीडा हरी करी हर्ष आवरी सकळ निर्जरां । गोधन धन देऊन विधी हरला मग पिता ह्मणे खरा । वनमाळांचे भार-सुमन संभार हार पूजिती मनोहरा । नित्य गुढ्या उभारती पताका परतुन येती घरां । पंचआरत्या घेऊन धांवती गवळणी परस्परा । धन्य धन्य तें वृंदावन गोकुळच्या नारीनरां । नवल न वर्णवे लिला हरीची लिहितां न पुरे धरा । मानव देहें स्तुति किती करावीं भावें भावें स्मरा । नामीं विठ्ठलपद प्रीति परशराम गीति गाई हरीलिला । पूर्वदिशे उदयला भानू आला उदयाचळा । उठ झाला प्रातःकाळ तुझे गोपाळ आले घननिळा । पूर्वादिशे० ॥ ४ ॥

# लावणी २४ वी.

आगडभं भोला सांब सदाशिव बभूत गोला हातालिया। गंगा मुगुटीं अर्धांगी पार्वती व्याघ्रांबर पर आसन किया।। धृ।। जटाजूट बलदार मुगुटमों जल निर्मळ पाया। गंगा भंभं मुखसें संख बजाव निरगुण निरवाणी। गंगा बभुत अंगधुनि भंग छनीबे ग्यान ध्यानमों दिलचंगा। शंख डमरु और खडग् तिरसूल गजासूर पर किया दमा। नीलकंठ गला रुंडमाला है मद्जलाके फूक दिया। गंगा० ।। १ ।।

जद् समंदिर मंथन किया। जद्चौदा रतनमों विस निकला। सप्त पाताल जद् जलन लगे जपीतपीक्या गया अकला। सिवशंकरनें वीस लियानब देवदानोक्या रह्या सीकला। सिसकेंचंदन हरके खातर सफेत चंदनका टिकला। पंचमुखोंसें अग्नी निकला येत नयनमों छुपारह्या। गंगा० ।। २ ।।

सिवकेसंत गण चौसष्ट हजार निर्गुण आपाहिवना। नंदी-केउपार किया सवारी जोग जुगतक्या भयलेना। सडानन विरभदर गणेशपूत सुपुत वो क्या कहना। दक्ष मारके सिर मेंढेका। किसखातर है कहदेना। सिके सिकावे हरको गावें भेद किसीकूं नहि पाया। गंगा० ।। ३ ।।

एकवीस स्वर्गसे उचा मुगुट है। आदिप्रभूकूं खबर नही। सप्त पातालके नीचे चरन ब्रम्हा विष्णुकू अकल गयी। उस

अंदर वोही एकबीस पिंडी न्यारी न्यारी कसोसही । ब्राम्हांड भये सब लिंगाकार है पुज्य । कहो किस्तरे कवी । नामें विठूकी जडण जव्वर है परशरामनें गुण गाया । गंगा० ॥४॥

## लावणी २५ वी.

कोण आला रथवाला यश्वदेच्या घरीं । मात प्रगटली गोकुळिं साऱ्या येति पुसाया ब्रजनारी । आज जातो श्रीरंग मथुरीं चिंतनीं डुबल्याभारी । वियोगे हरिचा सोहे न पळभर आह्मि अपराधी कां तरी । अंगसंग धरिं निःसंग होउनी मुगुट-मणी आनगवंशाच्या । विकळ सकळ तुजविण हरिगोपी मथुरी न जा कंसाच्या । पतित पावना दीन दयाळा कैवारी निजदा-साच्या ॥ धृ० ॥ जधिंपासुन वनमाळि गोकुळी आम्हि मांडिले सुखरान । कुचमर्दुन मुखचुंबन घेसी पतिकुखाळीं सुकरा । निर्दयमन कां निष्ठुर केलें सोडुनि जाशिल निकरानं । भाग्य असतां निज केली न वाटे पर्वत आड क्रोधानं । चंद्रचकोरा जसा पावण्या फिदिंत झाल्या आजि दिवसाच्या । वि० ॥ २ ॥

गोपि म्हणति मन मोहन सजना केलि लिला त्वां बाल-पणीं । घरोघरीं करूं मंथन गोपी चोरी करुनी खासी लोणी । चित्तवृत्तिवेधल्या आम्हुच्या येत न ऐकाया कानीं । मिस पाण्याचे करून येतस प्रपंचांत घालुन पाणी । येति गोपि मग धुतां विसरल्या जलक्रिडा करि दिवसाच्या । विक० ॥ ३ ॥

उभ्याच टाकिति अंग भूमिवर । माति घालिती वदनीं । दृढनिश्चय हा हरि पदिं आम्ही । मरूं परत न जाऊं सदनीं ।

परचक्र आज लोटे आम्हांवर नयनीं जल भरल्या रुदनीं । रुपरावन म्हणुन मिश्रविलें स्वरुप आपुल्या मन सदनीं । नामें विठ्ठल परशराम करि जाडिल येसु आनग वंशाच्या । वि० । ४

## लावणी २६ वी.

पश्चिमवाहिनी गोदा प्रती मूळगंगा । त्रैलोक्यतारणी पंचनाम भवभंगा । हे तृतीय नाम भोगावती पाताळगंगा । पश्चिमवाहिनी गोदा प्रती मुळगंगा ॥ धृ० ॥ वास्तव्य मूळ वैकूंठीं विष्णूचरणीं । तिथें मंदाकिनी म्हणतात ऐका श्रवणीं । हें प्रथम नाम भगीरथा पावली स्मरणीं । बदरिकाश्रमीं शिवमस्तकीं स्वर्गाहुनी । तिथें द्विभाग ओघ भागीरथी संकटहरणी । मूळद्वारीं गेली पाताळीं अगाध करणी । हें तृतीय नाम भोगावती पाताळगंगा । त्रैलोक्य० ॥ १ ॥ चतुर्थनाम गौतमानें गंगा आणिली । त्र्यंबकेश्वरापासून पुढें गोदा झाली । वैतरणा कोंकणामधें पश्चिमस गेली । हीं पंचनामाभिधानें शास्त्री ठेविलीं । पांचात श्रेष्ठ जव आगळी गौतमा झाली । दर्शनें क्लेश नासती मोक्ष पदवल्ली । ऐश्वर्य घेऊनिया पूर्वीच्या सिंधुसंगा । त्रैलोक्य० ॥ २ ॥ रमणिका रमणिका पाहून भविष्यार्था । आचार्य शुक्र दैत्याच्या बाकी न सुख सारथा । आपसवे घेऊन त्या गोदा त्या समर्था । चाललो म्हणून कच कोपर हान्वि यथार्था । तधींपासून कोपरगांव नाम या तीर्था । त्रिदश वाहतसे अद्यापि त्रिपुरुषा । मधें बेट हवाशिर

विष्णूनें चक्रआंगा । त्रैलो० ॥ ३ ॥ गुरु शुक्र कचेश्वर ऋषी गोदातीरवासी । क्षेत्राचा महिमा पाहून पंचक्रोसी । तें अपूर्व स्थळ मानलें राव श्रीमंताशी । मधें महाल बांधिला पुढें द्वारावती जैशी । लाविले रहाट जळें पुष्प बागांशी । अमोल तऱ्हेचे सरू शीतळ छाया ऐसी । महाद्वारीं शिवालय पुढें धांवे अभंगा । त्रैलोक्य० ॥ ४ ॥ गेले परतंत्री साहेब दादा अवतारी । ह्यास्तव हिंगणीशीं जातां सडी स्वारी । त्यापुढे आणिक एक राघेश्वर कुंभारी । वेटाच्या पश्चिमभागींचा हा शिरी । पूर्वेशीं कोकमठाण नाम त्या नगरी । तेथं मुद्गुल स्वामी मूर्तीमंत मदनारी । केलें गंगावर्णनमाहात्म्य या प्रसंगा । त्रैलोक्य० ॥ ५ ॥ राव राजेंद्र सुकाशिला पूर्ण सांब अवतार । शिवनेरी तक्त सातारा पुणें शहर । चौदेशींचे नृप आणून देती करभार । छप्पन देशींचे मनुष्यजन अपार । झालें श्रीमंतांचें दर्शन हें एक सार । विठ्ठ माय करी कृपा भुवन नाहीं तार । म्हणे परशराम येसू असो राज्य अभंगा । त्रैलोक्य० ॥ ६ ॥

## लावणी २७ वी.

रक्षी रक्षीरे करुणाघना । श्रुति निवारणहो ॥ ध्रु० ॥ मच्छरूप धरिलें ज्यानें देवा शंखासुरे । शंखासुरें साधिला दावा ॥ कच्छ वेष धरून कच्छ वेष धरून । केशवा पृष्टिवर सृष्टि । पृष्टिवर सृष्टि माधवा ही वराह रूप तुझें । साधना दंत झाले

हिण । रक्षी रक्षीरे करुणाघन श्रुति निर्वाणहो ।। १ ।। नारासिंह वेषानें क्रूर धारिला भक्तास्तव स्तंभीं । भक्तास्तव स्तंभीं। गुरगुरला हिरण्यकशप हो । हिरण्यकशप दैत्य चिरला । वामनमूर्त लहान। वामन मूर्त लहान बळी हरला । आऊट पाद भूमि । आऊट पाद भूमि मागुनसा केला पण । रक्षी रक्षीरे०।।२।। सहावा परशराम महाक्षेत्रीं । एकवीस वेळा हो। एकवीस वेळा भूमि केली निक्षेत्री। रावण रुपा । रावण रूप राम राज्य एकक्षेत्रीं । कृष्ण नेला हो । कृष्ण नेला कंस पहा रात्रीं । बौध्य पंढरपूर हो । बौध्य पंढरपुर कर कटावरी ठेऊन । रक्षी रक्षी० ।। ३ ।। दहावा कलंकी पुढें होणार। कच्छ वदनीं जाती तेव्हां तों। भूमीवर नाहीं तृण उरणार । नाहीं तृण उरणार गुणी विठु परशराम हो। गुणी विठु परशराम लीन तार हो। रामालीन होऊनी। रामालीन होऊनी गातसे हरीचे गुण। रक्षी रक्षीरे करुणाघन श्रुति निरवाण हो ।।४।।

## लावणी २८ वी.

चला चला गोपिनो । अशा ह्या वदाति गोपदाराई । रथा बसून बळी रामकृष्ण । अक्रूर नेतो मथुराई ।। धृ० ।। कोण आला। रथवाला नकळे। कपटी त्या रुपाचाई । त्वरें चला पुसूं यशवदेला। कुठे तरि हरि आमुचाई । धनुर्याग कंसानें मांडिला । वैरी तो मुळचाई । अक्रूर मनचा निष्ठुर इतका आला स्नेही त्याचाई ।। चाल ।। या सोळा सहस्र गोपिका येऊन विन-

विती । जधीपासुन हरी जन्मला आनंद चित्तीं । यशोदे । ना दृष्टी पडतां आमचे प्राण जाती । यशवदे ।। चाल ।। गोपाळ गोधनें होतील देशोधडी। मंजुळ मुरलीविण भयान यमुना थडी। तो आत्म जिवाचा सखा न आमचा गडी । त्याविना गमेना आम्हांस एक पळघडी ! ।। चाल ।। कसें वढवलें कर्महीन त्या पडल्या विचाराई । तटस्थ अवघें गोकुळ नघेती पशुपक्षी चाराही। चला चला गोपिनों अशा ह्या वदती गोपदाराई । रथीं बसून बळीरामकृष्ण अक्रूर नेतो मथुराई ।। १ ।।

## लावणी २९ वी

परनार पळ्याची धार घात करी जीवा । ब्रह्मादिक चकले काय इतरांचा केवा ।। धृ० ।। भिल्लिणीशीं भुलले शिव विषय-सुखसंगा । पार्वती मागतां भस्मासुर गेला भंगा । क्षयरोगी चंद्र, इंद्राशीं सहस्त्र भगें अंगा । निमाले सुंद उपसुंद स्त्रियेच्या संगा । परनारीस्तव करी वाळी सुग्रीवाशीं दंगा । श्रीरामें त्यासी मारिलें आणून रणरंगा । एकोत्तरशत कीचक गेले यमाच्या गांवा । ब्रह्मादिक चकले० ।। १ ।।

वैभव असून रावणें सीता नेली चोरून । त्याच्या कुळासहित परिवारें गेला तो मरून । द्रौपदी सभेसी आणितां केस धरून। गदाघायें घेतला प्राण भीमानें हरून । नारदें गोपी मागितली देवा विसरून । झाली नारदाची नारदी त्या पापेंकरून । पर-संग असा बहुतांस प्रचित अनुभवा । ब्रह्मादिक० ।। २ ।।

एकपत्नी पुरुष पतिव्रता स्त्रिया घरोघरीं । दोषाचा किंचित लेश नसे तिळभरी । तई पुण्यप रायणराजे पृथ्वीवरी । त्रैलोकी करावें गमन सदा निरधारीं । स्वइच्छा मरावें उजाड यमपुरीं । त्या युगाचें नांव आलंकृत निरधारी । पुढें कृता त्रेता द्वापार कलीची हवा । ब्रह्मादिक० ॥ ३ ॥

परस्त्री परपुरुशाची योगमाया । ब्रह्मांडीं घडामोडी लिला दाखवी पहाया । तें दृष्टी पाहूं नये गुणीराया । जन दृष्टी पाप पाहिलें तें गेलें वाया । पांचांची साक्ष वर नेली आपली जाया । तिशीं भोगावें भीतीनें लाऊन माया । विठ्ठल नामीं परशराम रामकृष्ण मनीं ध्यावा । ब्रह्मादिक चकले काय इतरांचा केवा । परनार पट्याची धार घात करी जीवा । ब्रम्हादिक० ॥ ४ ॥

## लावणी ३० वी.

पार्वती पुसे खूण अंतरीची शिवसांबा । तुम्ही भजन कोणाचें कारितां मज अचंबा ॥ धृ० ॥ भीड अपर्णेची जाणूनी वदे शूळपाणी । मूळ वेदाचें बीज ओंकाराचें म्हणऊनी । दोषाचे पर्वत जसा दग्ध करी वन्ही । तीं रामनाम अक्षरें मी ध्यातों वनीं । विष घेतां शीतळ केलें तीक्ष्ण जंबा । ह्मणूनि स्मशानि ह्रातांत घेऊन तुंबा ॥ पार्वती० ॥ १ ॥

हें उत्तर ऐकून उमा म्हणे धूर्जटी । गुह्यज्ञान सांगितलें हेंच निजधन गांठीं । जो स्त्रीलोभें लागला मृगाचे पाठीं । पाषाण

वृक्ष आलिंगी सितेच्या साठीं । बदिवार तयाचा वर्णून वर वर दंभा । त्याशी इथवर आणिते तरीच मी अंबा ॥ पार्वती० ॥ २ ॥

जो सर्वा भूतीं सर्वोत्तम सर्वसाक्षी । पदनाद मुंगीचा होऊन स्वार परीक्षी । तेथें उमा होऊन गेली सीता तुझी कमलाक्षी । राक्षसी सोडविल्या लक्षुमणा मग लक्षी । ओळखिली तुकाई अगम शुंभनिशुंभा । तुज भस्मांतून आणविलें होऊन रूपभंगा ॥ पार्वती० ॥ ३ ॥

पाषाण वृक्ष ऋषी मंडळी दिसती साचे । पार्वती पाहून मनी कुंटित बोले वाच । जो ब्रह्मसनातन जीवन विश्व जिवाचें आज खरें भासलें निज आचरण शिवाचें । त्रेतायुगापून तुकाई तुळजापुरीं थांबा । विठु परशराम करी कवन हृदय घट-कुंभा ॥ ४ ॥

## लावणी ३१ वी.

श्रमलास फार जगजेठी । बोरे विटेवरी उभा करकटीं ॥ धृ०॥
दधि समुद्र मंथिला जेव्हां । शेषाचा दोर लाविला तेव्हां ॥ दिलें अमृत वांटून जेव्हां । राहु चंद्राचा तधीपुन दावा ॥ दहा गर्भ अंबऋषीसाठीं । घेऊन लावी चक्र दैत्यापाठीं ॥ श्रमलास फार जगजेठी । वारे उभा कर कटीं ॥ १ ॥ नखीं गोवर्धनाशीं धरिलें । गोपींचें जोबन हस्तें चुरलें ॥ गाय दोहोतां दोन्ही कर हरले । पार्थाचे रथ जोडून आवरले ॥

महा जांबुवंत वीर जेठी । सकळां सोडून दिलें वैकुंठी ॥ श्रमलास० ॥ २ ॥ साक्षपे सिते कैवारा । मिळवून दळ पद्म सहा बारा ॥ सोडून बाण जळधारा । त्यानें माहित केलें अवघ्या जगारा ॥ केलें निर्मुळ त्या रावणासुरा । देव बंदी तेहतीस कोटी ॥ सकळां सोडूनी गेला वैकंठीं । श्रमलासी फार जगजेठी०॥३॥ भूवैकुंठ अक्षरें आगळें । एक्या मोक्षांचें माहेर सगळें ॥ ते मार्गी देह जरी उगळे । देतो विठ्ठल म्हणे सार्थक सगळे ॥ आषाढी कार्तिकी दाटी । परशराम येसू महादू ह्मणे वाळवंटी ॥ श्रमलास फार जगजेठी । वारे विटेवरी उभा कर कटीं ॥ ४ ॥ लोहदंड क्षेत्र शशीभागा । युगें आठावीस जुनाट जागा ॥ आले पुंडलिकाच्या भागा । त्यानें माहित केलें अवघ्या जगा ॥ देव भक्त क्षेत्र तिन्ही गोष्टी । धुंडितां न मिळे त्रिभुवन सृष्टी ॥ श्रमलासी फार जगजेठी ॥ ५ ॥

## लावणी ३२ वी.

साक्षांत देव पंढरी दिगांबर मूर्ति । जडमूढां तारितो रोकडा तुर्तातुर्ती ॥ धृ० ॥ जेव्हां नवती चराचर पंढरी होती । भूवैकुंठ हें अविनाश निवडली संतीं । ब्रह्मांड जळून होती रक्षा प्रळया अंतीं । तेव्हां सुदर्शनावर आभंग अक्षयी राहती । चोविसा मूर्तिवेगळी साधूजन म्हणती । झालीं कितीक युगें न कळे कोणाला गणती । ठायीं पुंडलीकानें जगीं वाढविली कीर्ति । जे पंच महापातकी दर्शनें तरती ॥ साक्षांत० ॥ १ ॥ हिरण्याक्ष हिर-

ण्यकश्यप दैत्या पोटीं । ते वधले वराह नृसिंह होऊन त्यासाठीं । त्यांनीं वैर धरून अवतरले लंका बेटीं । देव बंदीं घातले आणून तेहतीस कोटी । म्हणून रामचंद्र अवतार दशरथा पोटीं । शेष वानरदळ मिळूनिया उठाउठी । केलें रावणाचें निर्मूळ शर्ताशर्ती । पुढें रामकृष्ण अवतार गोकुळाप्रती ॥ साक्षांत० ॥ २ ॥ लंकेवर मारिले असुर तेच द्वापारीं । रावण कुंभकर्णाची मंडळी सारी । भूभार झाला पृथ्वीला गांजली भारी । म्हणून गोकुळीं अवतरले पूतनारी । जे वानर दळ ते गोपाळ झाले निर्धारीं । निवटिले असुर पांडव होऊन सहकारी । गवळणी त्याच प्रत्यक्ष वेदाच्या श्रुति । पहावया सगुण सावळा सदां चित्तवृत्ति ॥ साक्षांत० ॥ ३ ॥ द्वापारीं तेच मर्दिले होऊत कलयुगीं । हीन म्लेंच्छ राजे होती जागोजागीं । धर्माचा केला अधर्म कराया लागीं । जेवितील अठरा पगडे एका जागीं । जडमूढा दीनास्तव उभा दिगांबर योगीं । कलीमधीं रुपें धरियेली दोन योगायोगीं । जाले वारकरी जे गोपाळ कीर्तन करिती । इतरांशीं तारुन आपण उभयतां तरती ॥ साक्षांत ०॥४॥ जो ज्ञानेश्वर तो विठल मूर्तिमंत । बोलाविले वेद रेड्यामुखीं चालाविली भिंत । बारा वर्षे वाहिले पाणी नाथा घरीं तंत । स्वर्गीचे आणिले पितर करुन जीवंत । उठविली गाय नामयाची धादांत । देऊळ फिरविले अझून आहे साक्षांत । तुक्याच्या तारिल्या वह्या करूनियां प्रीति । वैकुंठीं लाविल्या ध्वजा अजून

जैन झुरती । साक्षांत० ॥ ५ ॥ बोधल्याचें पिकाविलें धनधाटाचे शेत । दामाजीची भरली रसीद पटाविलें पोतें । गोऱ्याचे उठविले बाळ फुटले हात । विष मिराबाईशीं देतां केलें अमृत । ज्यानें जैसें घ्यावें तैसी प्रचित । खळकुटाळाशीं सहसा नसे स्वप्नांत । गाती विठ्ठल नामें परशराम येसू ध्यानीं । रामकृष्ण अज्ञान भावें गीत गाती । साक्षांत० ॥ ६ ॥

## लावणी ३३ वी.

दोघी सवती भांडती पति भंगड भुंगा । आपसांत वर्म बोलती गौरी आणि गंगा ॥ ध्रु० ॥ पार्वती ह्मणे गंगेला तूं पाट करणीं । होशील अभंडी विष्णूच्या चरणीं । भुलविला शिव तूं कशी केलीस करणी । राहिली मस्तकीं मजला चोरूनी ॥ चाल ॥ दूर होय अमंगळ सवती । नाहीं मूळ कुळ तुजला याती । नरनारी तुजमध्यें न्हाती । मी आदिमाया आदिशक्ति अर्धांगा । घर समुद्राचे निघालीस निःसंगा ॥ दोघी० ॥ १ ॥ मग गंगा ह्मणे गवरीला दूर परती । जाणतें मूळापासून मी तुझ्या कीर्ति । कशी अगोचरे रुसलीस शिवावरती । भिल्लीणीचें स्वरूप तूं धरलेंस अपकीर्ति ॥ चाल ॥ टाकिली उडी होमांत । केला दक्ष पित्याचा घात । काय जाणसी उत्तम जात । भ्रमांत बैस तूं ना येशी पासंगा । मी जळ निर्मळ नित पातक जाती

भंगा ॥ दोघी० ॥ २ ॥ मग गवरी म्हणे गंगेला तूं ऐक आतां ॥ शांतनूसारखा भ्रतार तुज होता । तो सोडून आलीस शिव भ्रमणीं भ्रमतां । मारलें सप्त पुत्रांस पोटीं होतां ॥ चाल ॥ हीन मानसीं दुःख व्यथा । जनांत उघडा माथा । तूं दगा दिला भागिरथा । मी तुजहून आगळी प्रिय हर शिवलिंगा ॥ दोघी० ॥ ३ ॥ समतोल दोहींचे बोल निज कानीं । ऐकून मसणवटी शिव बसले ध्यानीं । थोरांची दशा काय इतरांची कहाणी । मग दोघी बायका नाकरती कोणी ॥ चाल ॥ आडल्यावर करणें लागे । असें होतच आले मागें । करी विचार अपुलें जागे ॥ चाल ॥ नामीं विठ्ठल सांगे ब्रिद लावून चंगा । गुणी परशराम येसूचे अभंगा ॥ ४ ॥

## लावणी ३४ वी.

करी जिजाबाई प्रार्थना धाव विठाई । द्रव पावला वस्त्र दिलें कोणेगे ठाई ॥ धृ० ॥ धड भक्ति तुझी करुनि तुका केवळ । हरी जन्मोजन्मींचा दास ह्मणती सकळ । अहोरात्र तुझा निजध्यास लागला चळ । मी त्याची स्त्री अन्याई तुझी लाडिवाळ । एक जीर्णवस्त्र होतें मला मी न्हातें वेळ । नाहीं आज ह्मणतां होऊन बसला काळ । त्याविरहित चिंधी घरांत सहसा न मिळे । अशी अडचण पाहून कमी साधली वेळ । लग्नास न्यावया आले सोयरे मूळ । निरउपाय करूं मी काय

होऊन दुर्बळ । तुजविणा प्रार्थू कोणास आतां काबाई । दासीची लाज जाईल मग काय राहिल मोठाई ।। करी० ।।१।। तूं दिनानाथ दीनबंधु भक्तकैवारी । तुज उष्ण दुध पाजिलें सख्या श्रीहरी । दासास तुझ्या म्यांछळिलें राग तो नधरी । अन्याई तुझी मी अगदींच मागें सारी । गरुडावर येतां उशीर होईल भारी । पवनाहून येऊन लवकर संकट वारी । असा जिजाबाईचा धांवा श्रवण द्वारीं । पंढरिस ऐकला देव उभे गरुडपारीं । गरुडास जातों म्हणून नाहीं पुसाया वारी । म्हणून वेगें धांवला दासाचा सहकारी । आलें देहूगांवीं विठ्ठल अतिनिकटाई । आपलाच पितांबर आपलें स्वकरानें लपटाई ।। करी० ।। २ ।। देदीप्यमान पिवळा पितांबर हरिचा । तो जिजाबाई नेसली पदर भरजारिचा । अवघेच वऱ्हाडी दिपले पितांबर नवलपारिचा । ठाऊकच नांदणूक म्हणती असेल खुलवरचा । काय झालें तुकोबाला कुबेर आहे घरचा । घ्या मेजवानीचा लाभ आज आहेराचा । वरमाईला पितांबर मोतीचुर जरीकाठाचा । एक ह्मणती आहेर घेऊं व्याह्याबराबरीचा । अशा करून टवाळ्या थिजले ठाई ठाई । बरहुकुम करवा याद नाहीं कमताई ।।करी०।। ।।३।। श्रीदास बोल लागेल भक्तासाठीं । विठूशेट गुमास्ता तद्घडी झाला चाटी । व्याह्याला पुसले कळेल त्या मनसाठी । रुक्मिणी हातें स्वसंपाक करी जगजेठी । अनुक्रमें दिले विडे भोजनापाठीं । चौदेशींचें कापड आणविले नारायणपेठी । मग सोडून दिंडे

सारी सर्वांला वांटी। अशी अमोलिक वस्त्रें पाहून हर्षले चित्तीं। जशी ज्याशी त्यास कामास आली खोटाई। संताचा महिमा संताला एकेठाई। करी० ॥ ४ ॥ भांडारी डोंगर त्यास्थळीं एकांत स्थानीं। तेथें भजन करी सप्रेम तुकोबा वाणी। पाठविली मुलें पाह्याला जिजाबाईनीं। घरीं वर्तमान वर्तलें सुचविलें त्यानीं। आले उठून तुकोबा समक्ष पाहतां नयनीं। ओळखिला पितांबर नेत्रीं आलें पाणी। श्रमलास तूं देवा त्वां मजला केलें ऋणी। नवसाची साडीचोळी दिलेली उदम्यानी। ते वऱ्हाडी गेल्यावरती नेसवली आणुनी। असें संतचरित्र ऐका कानीं। करि विठ्ठल नामीं नामाची भाटाई। ह्मणे परशराम मन होईल परलोकीं मोठाई। करी० ॥ ५ ॥

## लावणी ३५ वी.

अहो शिव सांबा वेडें कसें झालें मन गंगेवर वळलें। तिजपाशीं अक्षई राहतां तुमच्या वचना कंटाळले ॥ धृ० ॥ म्हणे पार्वती ऐक गंगे तूं माझे सवती। कसें भुलविलें शिव सांबाला धिक् तुझी नवती। जटेंमधें लपून राहिलीस जसें जंगल गवती। वेड्याभोळ्या चक्रवर्तीची मी आहे पुरती। अष्टवसु शांतनूसारखा भ्रतार तुज भवलीस मजभोंवती। मजला अचुक पर्णिली रात्रंदिस वाहती ॥ चाल ॥ नाहीं शुद्ध मूळ तुज गडे। शोध मनीं। शोधितां एकांतीं गांठून बिन

घडे । शिव वनीं । हें दूषण तुह्मांला जडे । मुख जनीं । न दाखऊन मस्तकीं राहिली कसें नाहीं कळलें । ऐकून क्रोधावली पार्वती वृत्त माझें चळलें ॥ अहो० ॥ १ ॥ ऐक शेषकन्यके किती स्तुति आपुली करितें । तिन्ही लोकचें पातक माझें स्नानानें हरतें । विषकंठानें धरून मस्तकीं दाह केला दूरते । शुद्ध धरून कांहीं बोलणें साजणी आले आंगीं भरतें । असें अगोचरपणें सांब गेले रागें तुजवरते । भिल्लिणी तपा ढळविलें शोध मनीं पुरतें ॥ चाल ॥ बाडिवार काय मिरविशी । बोल आधीं । कांहीं विचार करी अंतरीं । म्हण सुधी । संभापण मधुरोत्तरीं । नाहीं कधीं । अदावतानें खास्त लाविते मन अगदीं चळलें । आतां तुझे हातीं काय मुक्त तें हंसानें गिळलें ॥ अहो० ॥ २ ॥ उघडा माथा करून बोलते गंगे तूं मजला । मजला चोरून कशी राहिली काय ह्मणूं तुजला । सिंधु संगम कशास झाली तिथें कां जीव रिझला । शिवसांबासारखा भ्रतार गंगे तूं त्यजिला । प्रश्न तुझे हे व्यर्थ वाटती दिड तांदुळ शिजला । चल दूर पलिकडे नको बोलु जगीं दिल बहु खिजला ॥ चाल ॥ मागून केली मजवर । तुज कशी । भिड धरली मी अजवर । तुज अशी । गवन देतां तुजवर । शिव खुषी । नाहीं ऐकिलें क्रोधें जटेचे भारा मोकळले । तें जिणें परतून मला दाविते मन नाहीं कंटाळले ॥ अहो० ॥ ३ ॥ चढोवढीनें गंगा बोले गौरी तूं पाही । पंचलोक मी तारक झालें भगीरथा साह्य ।

कमंडलू तो ब्रह्मदेवाचा त्यामध्यें सुख वाही । स्वर्ग मृत्यु पाताळा महिमा झाली दिशा दाही । सर्व ठाऊकें हिमनगजे कां विचार मनीं नाहीं । मला अपादुन हेका आपला नानापरी कांहीं ॥ चाल ॥ नागभुषण माझा पती । आहे खरा । नाहीं उण्या दोन्ही । तिळरती शंकरा । ही गोष्ट उभयतां रीति । शिव हरा । मुळ कुळ पाहतां लांब दोहींचें एका जंत्री मिळले । व्यासांची मति शिणली वर्णितां तुलनीं ना तुळले ॥अहो०॥४॥ वृत्तांत ऐकून दोघी स्त्रियांचा शिव त्यांवर रुसले । आयुधें टाकून फक्त निरंजनीं स्मशानांत बसले । वाद नित्य प्रतिवाद ऐकून प्रभुचे मन त्रासलें । यासाठीं पुरवलें आम्हां कैलास भुवन नसलें । काय कथा मानव जन्माची शिव देखील फसले । आश्चर्य सर्वांसी वाटलें जन गद्‌गद् हसले ॥ चाल ॥ नामी विठ्ठल ह्मणे दोघी स्त्रिया । महापीडा । मोकलून शिवानें दिया । मूळबुडा । परशराम यमूची क्रिया । बिनधडा । केल्यावर मग ज्यांचें त्याजला दुःख जाईल कळलें । रामकृष्ण गुणी रामा गातो शिवचरणां जुळलें ॥ अहो० ॥ ५ ॥

## लावणी ३६ वी.

घर दूर पिउकां कबी पोंचुंगी सखी । नहि जहान भरनमों मेरे सारिखी दुखी ॥ धृ० ॥ तीन लाल सुनेरी महेल पिवका बना । नव दरवाजे पर काम किया रंग मीना ॥ ओ बिकट

वाटबडी । एकचढ नेका जिना क्या खासी बैठक उपर डेरा ताना । पिवक्या रसके रिगुल परि लपट रहे मखी । नही ॥१॥

कोही सखी साथ जलदीसे बरी जाऊं । पोषाख जरीका सफेत करके लाऊं । मै लेऊंगी फेरी आलमकी एक सिवलकू । क्या करना इस दौलतकूं सब जल जाऊं होनेकी होगयी जो भालो मेलिखी । नही जहान ॥ २ ॥

खैरात करोंगी मेरे अंगपरका सब महिना । गोरे तनकूं खाट लगाऊं अबीक्या राहिना खिसमतसे मिळूंगी क्या अंबरस काहिना । लगे तार पिहूं सेरों रोंग योनैना रख इमानकी तजबीर मनमो लिखी । नाहिनजा० ॥ ३ ॥

बडा कसा करोखोज्या दिळभर सहिली । अकेला यहूं चंद· नासे चंदनी खुली । रहे लपटके गलेसे गला चैन सहिली । नामे विठू कवीका आवाज सुनकर चली । गाती परशराम येसू महादू आलम दुनिया झुकी । नही जा० ॥ ४ ॥

## लावणी ३७ वी.

चलतीमुळें कां भलतेंच कारिशी अझून तरी सावध लंडी । गर्वाचें घर खालीं यासी साक्ष ऋषी मार्कंडी । चवदा चवकडे राज्य ज्याला । योजनें लांबी रुंदी तिरकुट लंका आधीं ऐती । परीघ खंदक चार हजार शाहाणव आगळे हुडे म्हणती । खंदक परी पांचवा भवताला अजिंक्य जो सुरवरापती । ज्ञानाचा जो

सागर केवढा वेद केला ज्यानें त्रिखंडी । चलतीमुळें० ॥ १ ॥ शहरपन्यामधीं वस्ती घरें पहा किती गणनावळ केली । रत्नखचित सुंदर मंदिरें पांच लक्ष आलीं । सातकोटी सोन्याची लखलखीत प्रभा ज्यांची गगनीं गेली । सात लक्ष निर्दम चांदीचीं उंच उंच तीं चौताली । तीन कोटी तांब्याचीं संगीन सुढाळ ज्यावरती केली । सव्वा लक्ष विटबंदी जेथें छोटखानी एकताली । साठ हजार काचाचीं झळकती ज्याचीं त्याला सवतालीं । नवकोटीं रत्नांचीं शिवालयें पूजा अर्चा करी त्रिकाळीं । रुद्राचे अभिषेक होती नित्य लाखोल्या हार रुंढी ॥ २ ॥ चौऱ्याशी योजनें सभामंडप बैठकीला । नवग्रहांच्या त्याशीं पायऱ्या बाकी लंका गडकिल्ला । सुरवर नर जैसे ज्याचें तपसामर्थ्य हर एकला । आत्मलिंग पार्वती दिधली मंदोदरीवर तो झकला । ऐशीं हजार ज्याशी बायका लक्षपुत्र पोटीं पिकला । सव्वालक्ष झाले नातू ऐसा मागें पुढें नाहीं एकला । अंतकाळीं जीव प्राण सोडितां जवळ नाहीं कोणी एकला । यावरतीं एकमुखीं घालाया सोन्याचा नमिळे सकला । मग नरदेहाची कोण अवस्था ती मेल्यावरती हाले मुंर्डी ॥ ३ ॥ रती अनुकूळ दिलीच ती हरीनें सर्व भूतीं राम भजावा । योगासारखी कर्मरहाटी करून पाहे जोडावा । साठ घड्यांचा मळ अमंगळ एक घडी तरी झाडावा । नामस्मरणीं लाऊन प्राण्या एक दुशनो पाडावा । कर्ता धुरंदर ह्मणती यास संशय मनाचा फेडावा ।

क्षण भंगुर नरदेह उत्तम वेळ तुशी जो वेढावा । नामीं विठ्ठल परशराम ह्मणे चवऱ्याशीला भुरसंडी । ग० ॥ ४ ॥

## लावणी ३८ वी.

काशि सोन्याची लंका झाली ऐका । देवाची मूळ वार्ता । जुनाट कथनें पाहून केली वालिमकानें कविता ॥ध्रु०॥ पुण्यशीळ एक राजा त्याचें नांव इंद्रद्युम्न । स्नान संध्या करीत होता नेत्र लावून । आला अगस्ती सहज नाहीं केला सन्मान । हजार वर्षें गजेंद्र होशी दिला श्राप त्यानें । दुसरी कथनी पुढें लागली ऐका सज्ञान । गंधर्वाशी शाप दिधला त्याच अगस्तीनें । नक्र होऊन भांडशी गजेंद्रा जाशी उद्धरून । नक्र गजेंद्र देवें उद्धरिले एक पुष्प वाहतां । गजेंद्र मोक्ष या परी झाला साक्ष शास्त्र गीता ॥ क० ॥ १॥ क्षुधेनें पिडला गरुड विनंती विष्णुसीं करी । आहारासी द्या कांहीं मागतां दया आली अंतरीं । नक्र गजेंद्राचीं प्रेतें होतीं सरोवरातिरीं । भूमीपासून चार योजनें शरीरांची थोरी । आज्ञा होतां घेऊन उडाला मेरूच्या शिखरीं । भार साहेसा वृक्ष पाहिला शाखा त्याला चौफेरी । एक एक शाखा शंभर योजनें लांब बरोबरी । साठ हजार ब्रह्मच्याचे सुत होते एके शाखेवरी । जांबूळ वृक्ष नांव तयाचें शोध करून घ्या अर्था । हातीं एवढें जांबूळ फळ तें सुवर्ण होय आतां ॥ क० ॥ २ ॥ कडाडली ना फांदी बैसतां चोंचीमध्यें धरली।

संकटीं पडला गरूड तयाची बळ शक्ती सरली । पिता कश्यपावर छाया धरली मनीं बुद्ध संचरली । कळवळा करून ऋषी उतरविले खालीं मग चिंता हरली । बसून पर्वतीं आहार केला उदर कोटी भरली । पदभारें झाला त्रिकूटाचळ तो चीर नखें चिरलीं तीथ राहिली शाखामनसुखी थोडक्यांत आटली । त्यावर वसविली लंका विधिनें अजिंक कशी ठरली । माल्य सुमाल्य सुमाळी तिसरा पराक्रमा होता । त्यानें घेतली लंका खंदक दर्यासभोंवता ॥ क० ॥ ३ ॥ माल्यसुमाल्य येउनी विष्णूनें वधिले स्वहस्तें । सुमाळी राक्षस तिसरा जगला होउनीया गुप्त । ब्रह्म सुत पौलस्ती त्याचा इपुश्रवासूत । इपुश्रवाचा कुबेर आवडता होता शिव भक्त । तयाशीं दिधली लंका ठेविली नवनिधा संपत । वंश ऋषीचा धरून सुमाळी करावया घात । त्याची कन्या कैकया इपुश्रवास नवती श्रुत । बळें आणून पदरी बांधली करून दिली दुाहेता । भोग तयातें मागूं लागली अग्निहोत्र देतां । क० ॥ ४ ॥ राक्षसकन्या म्हणून तयाला दिलें श्रापदान । राक्षस तुजला पुत्र होतील रावण कुंभकर्ण । धांवून लागली चरणीं एक तरी द्या भक्तजन । तिसरा पुत्र साधु जन्मल. भक्त बिभीषण । कुबेराचे ते सापत्न बंधु सख तिघेजण । मागून घेतली लंका तयांनीं पित्यापासून । त्रिकोण लंका शहर वसविलें तिनशें योजन । लंका निकुंभळा सुवेळा हाच एक त्रिकूटाचळ जाण । एकवीस द्वारें आहेत तयाला एक कविसूता ।

चार हजार शाण्णव आधळे हुडच्याची गणता । क० ॥ ५ ॥ तिन हिसे लंका जाळली वीर हनुमंतानें । तळीं शाखा होती म्हणून झालें बावनकस सोनें । मक्का द्वारका लंका तिही देवानें केल्या तीन । चौथी हेमपुरी निर्माण केली ईश्वरमायेनें । कल्पा-वांचून घरें कशीं होतील बारीक करा ध्यान । वावी गांव घन-बटांत अड्डा परशराम येसू करी कवन । रामकृष्ण गुणी रामा गाती कां पडली भ्रांता । शेषाला नाहीं अंत लागला सोडून द्या अहंता । क० ॥ ६ ॥

## लावणी ३९ वी.

रंगरागिणी गायन कीर्तन ज्या स्थळीं नसे नारदा । असून वस्ती स्मशान स्थळीं त्या न राहे लक्ष्मी कदा ॥ धृ० ॥ गायनाचें घर कोठुन निघाले मुळीं वार्ता मुळीपासून । पंच-मुखीं जो ब्रह्मा होता ऐका क्षणभर बसून । दर्दुरमुखीं ऋग्वेद निघाला पंडिताशीं घ्या पुसून । यर्जुवेद हा अश्वमुखांतून अर्थ काढिला निसूत । श्वानमुखीं सामवेद तिसरा झालें गायन त्यापासून । जंबुकमुखीं अथर्वण चवथा चतुर्वेद पहे करून । गांधर्वमुख पांचवें हासलें पार्वतीस एकदां । म्हणुनी शिवानें क्रोधें छेदिलें होणार न कदा ॥ रंगरागिणी० ॥ १ ॥ गांधर्व मुखीं बिहाराग निघाले आणि छत्तीस रागिणी । तेचि गायन कारिती अप्सरा इंद्रसभा मोहनी । गणगंधर्व नारद तुंबर ते ध्याती निशिदिनीं । तेचि हरीला प्रिय प्राणाहुनि गमन त्रिभु-

वनीं । गायन ऐकून जागृत झाला कुंभकर्ण आला रणीं । शृंग-ऋषी गायन मोहिला लिहिलें रामायणीं । रंगराग बीज फाला वेणु गीत वृंदावनीं करी सदा । यमुना स्थिर जाली गोपी मोहिल्या गायन ऐकून फिदा । रंगरागि० ॥ २ ॥ शिरा काढून तारा केल्या रावण गायन करी । आत्मलिंग आणि देऊन पार्वती हात ठेविला शिरीं । भस्मासुर गायनीं मोहिला मोहिनी वेष हरी धरी । नागस्वराजें सर्प भुलूनी येता आंगावरी । अष्टपद्या गाउनी उठविली जे श्रीधरी । मम कीर्ति जेथें गाती नारदा उभा मी त्याच्या द्वारीं । वेद पांचवा गायन म्हणती शास्त्रपुराणीं मुद्दा । निंदाद्वेषी कसेही गाऊन रात्रंदिवस धरी हुदा ॥ ३ ॥ दिपकल्याणी दीप लागता मल्हाराची कळा । गायन ऐकुनी विणा ऋतुविण मेघ वर्षती जळा । ऋषीमुखींचें गायन ऐकुन पाणी झाल्या शिळा । तेच टीका जन वरकड गाती रोकड येती फळा । कथालावणी गोंधळ भराड गीत गाती अबला । आधार पाहुनी आम्ही गातों वर्णूं हरीची लिला । नामीं विठ्ठल परशराम ह्मणे येसू गेला निजपदा । रामकृष्ण गुणीं रामा गातो कविचें गावर ब्रिदा । रंगरागिणी गायन कीर्तन ज्या स्थळीं नसे नारदा । असून वस्ती स्मशान जैसें न राहे लक्ष्मी कदां ॥ ४ ॥

## लावणी ४० वी.

नयन चोर इसतनमों जी लागी । बैठे जी होना लठ

वैरागी । ऐसी जादू बुरी दिवानी टुक दर्शन देती जागीं । इंद्र चंद्र किया जन्मका रोगी ॥धृ०॥ किसे सोल सिनगार गलेमें गज मोतनके हार लटके । सफेत आंगीया उपरी बुटे जरीके गंगन ग्यानें सारे झुटके ॥ लोंबालो कीं गौर गालपर चालि नागन काली बनके । हुसेन देख तेरा भुला अलम एकही मारे फिरते भटके चाल॥ जब किया नैनोंनें छबिली जहां बिजलि आज तुटपडे । चंद्र सुरजदो बाजु उजाले करन फुल कानोंमें जडे । नाजुक पतली कंबर तेरी जोबन जैसे गेंद चढे । खडी मेहल पर मुख म्लान तेरे देखन खातर रह्या अडे ॥ चाल ॥ हिंदवानी तुरकानी दोभासे सवालकर कुच मिठे जुंवासे । इषक लगा तेरे पिरतके प्यासे ऐसी जादू ॥ २ ॥ तेर बिजबनका झनकार बलि जामीं रहदेना लोलन बनके । मारी आदाके तीर सनासन टुक टुक होरहा तनके खोल घुंगट पर जरा दिवानी मिठ्या मिठ्या बाता चुनके । दूर देसके पंच मुशाफर आये तेरी तारिफ सुनके ॥ चाल ॥ जानकी कुरबान तेरे पर । काटलिया है सांस हातपर । दिस कबीला रह्या दूर तर । लागिन लगा है तेरी दिवानी टुक दरसन देती जागी ॥ ३ ॥ जीके जिगर पिया तुम बिगर मुने चैन पडेना जरा । मेरे खातर हाल तुमारे साच बचनका साच हिरा । लेगया महेल अंदर रंकिम ओदिलका दिलभर प्यारा । सारी रात सुख लिया चैन नही ज्या बादल बरसे गेन्हा । चाल ॥ नामें विठू वरता दजबरे । घट देखके

जलते मुरारे। परशराम गुणि येसू सुमरे। आलम देखनकूं जुकी दिवानी टुक दरशन दती जागीं ॥ ऐसी० ॥ ४ ॥ नयन चोर इसतनमों जी लागी। बैठे जी होना लठ बैरागी ॥ इंद्रचंद्र कीया जलमका रोगी

## लावणी ४१ वी.

भजा राम लक्ष्मण जानकीस्वामी रघुवीर पंचवटी। जप तप साधन। ऋषि मुनी करिती। अनुष्टान गंगेतटीं ॥ धृ० ॥ धन्य भाग्य दशरथाचें सूर्यवंशीं श्रीराम। गुण गाती कौसल्या हलवी पालखीत मेघशाम। कोटी सूर्यचंद्र लोपले स्वरूप ज्यांचे परब्रह्म। एक वचन एक पत्नी एक बाण तयाचा नेम। शिळा सागरीं सेतु बांधिला काम करुनी नळा हातीं। अठरा पद्मे वानर उभे कां न करतिल उठाउठी। भजा ॥ १ ॥ अयो-ध्यानाथ भगवान् तारं सर्वत्रांचा दाशरथी। पतीतपावन दीन-दयाळ सीतापती त्याला म्हणती। असुर वधाया धरला अव-तार धनुष्यबाण घेऊनि हातीं। कुंभकर्ण रावण मर्दिले जाऊ-निया लंकेप्रती। बिभीषणासी राज्यीं स्थापिलें आगे जाऊनि जगजेठी। त्रैलोक्यांत आनंद झाला देव सुटले तेहतीस कोटी। भजा ॥ २ ॥ चरणापासून गंगा वाहती अवघे ध्याती पद-कमळा। दृढभाव जो असेल ज्ञानी तोचि भक्तिचा जिव्हाळा। साठ सहस्र वर्षे आहिल्या होऊन पडली होति शिळा। रघुना-थाचें पद लागतां दिव्यरूप झाली अबला। वाल्हा कोळी।

वाल्मिक झाला । रामनामास धरितां कंठीं । पुढें होणार । आधिच कथिलें । रामायण शतकोटि । भजा ॥ ३ ॥ पंचवटी मधिं । राम जानकी । तेथील लोक दैवाचे । रामकुंडाचें स्नान करिती । पातक हारिती जन्माचें । घडोघडीं चौघडा वाजतो । भय नाहीं काळिकाळाचें । टाळ विणा मृदुंग घेऊन । गुण गातां श्रीरामाचें । परात्पर परमेश्वर तो तर भरून उरला सर्वांघटीं । नामें विठल अखंड गाती परशराम येसुची जुटी । भजा ॥ ४ ॥

## लावणी ४२ वी.

जन्मनिरुपण समूळ वार्ता मुळीहून ऐका कवी । रुद्र अकरावा मारुती वज्र चिरंजीव आक्षयी ॥ धृ० ॥ रावणानें करून आराधन प्रसन्न केला शिव । आत्मलिंग आणि देऊनी पार्वती भक्तीस्तव गौरव । दहा शिरें वीस भुजा दिल्या त्या भोळ्या कृपानव । अमर कुपी पोटांत घालुनी अमर केला जीव । चार कल्प जाऊन एक युग हा चतुराला अनुभव । चहु युगांची एक चौकडी प्रमाण करी लाघव । अशा चौदा चौकड्या राज्य दिलें आणि लंकेचें वैभव । वीस वानरा हातीं मृत्यु तुज वधतील वीर मानवी । असा दिला वर सदाशिवानें थरथर कांपे मही । ज० ॥ १ ॥ अणुरेणु लहान जो कां ब्रह्मांडाहून थोर । तयास कळली वार्ता दिला रावणाला वर । आत्मलिंग पार्वती सोडली ।

पृथक सांगतो सार । मग कन्या मंदोदरी घेऊन गेला लंकेश्वर । याच्या वधास्तव सूत दशरथ । सूर्यवंशीं नृपवर । शृंगऋषी करिं । त्रिपींड केले । तिघी भार्या प्रियकर । आधीं पिंड न दिला म्हणून । कैकयीं लाविना कर । ब्रह्मशापा देवांगनाही । होऊन फिरतसे घार । तिनें झडपुनी एक पिंड नेला । पुढें कथा लाघवी । प्रभंजनीं अंजनीकरी तो । पडिला शिववरदायी । ज० ॥ २ ॥ एक्या पिंडाचा मारुती । दो पिंडाचे चौघेजण । शेषशाई अवतार कसा । अवतरला एका खूण । चक्राचा अवतार भरत शखाचा तो शत्रुघ्न । शेष तो सौमित्र शेषशाई तो रघुनंदन । रविसुत सुग्रीव अमरपती गुरुबृहस्पती सुषेण । तेहतीस कोटी देव अवतरलें होऊन वानरगण । त्यांचीं नांवें सांग शाहिरा कशास मिरवितोस पण । बिनअपराधी वाळी वधिला होता पूर्वी कोण । प्रल्हादाचा अंगद ऐशी निवड करून दाखवी । हिंगाजिन्यावर घालुन पसारा घरोघर जाले कवी । ज० ॥ ३ ॥ देह चिन्ह मारुतीचें पुसलें प्रश्न सांगतो बसा । पिता केशरी अंजनी माता पतिव्रतेचा ठसा । वानरवेशें शिवरेत द्रवला विष्णु मुख्य धरी रसा । अंजनीं श्रवणीं बीज फुंकलें वायुनंदन तसा । उपजत सूर्या गेला गिळाया मुखीं आला काळसा । इंद्रवज्र हनुवटीस हाणिले । हनुमंत ह्मणे असा । म्हणून पुच्छ वज्राचे केलें कडसूत रामदासा । अंजनीं पयें धार छेदिली । कर्णकाविला पुसा ।

भरतबाणी पायवाडा द्रोणागिरी समर्थी । पार्थाचा शरसेतु मोडिला धनुष्य उत्कट होई ॥ ४ ॥ अपूर्ण

## लावणी ४३ वी.

नकळतां पडली चुकी इच्छिली मृगकंचुकी । म्हणून अंतरलें जनलोकीं रघुवीरपायां । मुद्रिके ॥ धृ० ॥ तें पंचवटी गोद्तटीं स्थळ पवित्र । सुखवासी राम वनवासी आणि सौमित्र । कामितां काळ फळ आहार करून अहोरात्र । एके दिवशीं आली मज इवशी कशी अपवित्र । श्रीरामाचें निजअंकीं । बैसले पर मला ठाऊकी । नकळतां० ॥ १ ॥ शरचाप घेऊनिया करीं वनांतरीं गेले । संन्यास वेष दशमुखें कपट मनीं धरिलें । बाहुनिया स्कंधीं स्मशान लंके आणिलें । मज मागें सांग वेगें कैसें झालें ॥ चाल ॥ वाल्मिकें कथुनि भविष्यार्थ । एक कपि येईल समर्थ जाळील लंका पुरुषार्थ । ममशुद्धी नेईल यथार्थ । आज कथिलें अवघें व्यर्थच गेलें वाया ॥ मुद्रिके ॥ २ ॥ नाकळून साधूंना छळून वनीं पाठविलें । यावरी रेसवा हरी सेवा पद ठेविलें । त्या फळास्तव या स्थळीं दुःख आठवलें । मुद्रिके सखे त्वां रघुवीर नाम ठेविलें । चैतन्य निजधाम । जो विश्वाचा विश्राम । ते सुखी आहेत कीं राम । असा निश्चय केला नेम सद्गद झाली सप्रेमें प्राण त्यागाया । मुद्रिके ॥ ३ ॥ रघुपती अयोध्येंप्रती गेले माघारी । कॉवनांत झाला घात सांग

निर्धारी । तूं सदा सर्वदा निजकरीचा अधिकारी । तुज आणिलें पक्षी किंवा गिध अंतरीं ॥ चाल ॥ वर्तले सांग प्रमाण । नाहीं तरी त्यजिन हा प्राण । मज श्रीरामाची आण । ऐसा निश्चय केला नेम । कपीचरणी मन ठेऊन धन्य आदिमाया । मुद्रिके ॥ ४ ॥ जाऊनिया प्राण तूं आदिमाया आदिशक्ति । क्षमरूप राम सौमित्र कसे हे प्राप्तीं । तुजसाठीं होतसे कष्टी स्वपनांतरीं प्रीति । तेव्हां सीता ह्मणे हनुमंता लहानकी मूर्ति ॥ चाल ॥ मग होऊनिया भीमरूपी असे अठरा पद्म कपी । मन लाघव सकळ दिपती । नामीं विठ्ठल वरदे मती । परशराम केवळ गाया । तराया भव पंकीं मुद्रिके ॥ ५ ॥

## लावणी ४४ वी.

रमारंगे श्री रंगे अभंगे तारि तारी मज दिना ॥ धृ० ॥ रघुवीर सम वीर वानर थोर थोर महाप्रतापी । सभेस बसले श्रीरामचंद्र अठरा पद्म घेऊनी कपी । नळनीळ सुग्रीव सबळ बळी पहा मारुती वानर रुद्ररुपी । प्रेमसुगड कोणी चतुर शहाणा आणा एखादा वीर पाहुनी कपी ॥ चाल ॥ लीनपणें कपी सुकील ह्मणे होती कार्ये ज्याणें । कळा सर्व जाणे । दश-मुखातुनीं तू ज्याचे शब्द जाणे । तो अंगद वाळीसुत त्याचे परा-क्रम अद्भुत । तो स्वामी आपला दूत । घ्या पाचारूनी त्वरित ॥ चाल ॥ लवूनी बेहूनी क्षणशब्द राहून रामस्वरूप पाहून करी

चंदन लागे चरणा । जा लंकेप्रती म्हणे रघुपती बरे रीतीनें सांगा लंकापती रावणा ।। १ ।। सार सार केलें फार निरुपण सुज्ञ अंगदा जाय त्वरें । श्री रामाची आज्ञा वंदुनी कंदूक जैसा गगनीं फिरे । आकाशपंथें लक्षिती लंका ऐका पक्का कोट शिरे । चार लक्ष आणि शाण्णव हजार हुडे पाहतांना नजर पुरें ।। चाल ।। लंके आंत कपी त्वरेनें जात । लंकेची मात । दृष्टीनें पहात । रघुपतीशी ध्यात । देखिले देव बंधांत । अति क्रोध आला चित्तांत । पहावयासी लंकानाथ । पातला सभेच्या आंत । असूर चित्तीं ह्मणती मारुती आला मागुती भयें भ्रांती । असे सकळ जनां । रावणापरी उंच बैसला घालुनी पुच्छासना । जा लंकेप्रती० ।। २ ।। क्रोध अंगदा ह्मणे दश-कंधा ये मतिमंदा कुतर्क ना विचारी । नांव गांव ना पुसाल कोणी मूर्ख सभा उन्मत्त सारी । ह्मणे रावण तूं वनचर वानर धीट मर्कटा पालाहारी । तुज ऐसा एक पूर्वीं आला गेला जाळूनी लंका सारी ।। चाल ।। आलास तूं कां नसे ठाऊका । बोल मशका । अंगद ऐकून बहू बोलका लंका नायका । उत्तर करी प्रमाण । जेणें कक्षेमधीं तुझी मान धरून केलें । समुद्रीं स्नान । पालखा बांधिली जाण । तंव घडलें मूत्रपान । वाळी-सुत मी दूत रामाचा अंकित त्याचा न जाणसी जरी खुणा । शूर्पनखा तुझी बहिण विटंबिली पंचवटीच्या वना ।। ३ ।। सीता सती पतिव्रता पतिता सोड सोड तूं दशशिरा स्वजपें राज्य हें

करी का आपलें नाहीं तरी जाशील यमपुरा । नेम करून श्री राम आले मज काम सोंपिलें सीतेचे संग्राम करा । उत्तर सत्वर करी दशकंदा बहुत बोले पामरा ॥ चाल ॥ एक वानरा वाळीकुमरा य व्यभिचारा । सुग्रीव द्वारा । आजेणी दारा । तूं अजतां कुशीं । मारिलें ज्यानें वाळिसी । बडिवार त्याचा वानसी । निर्लज्य जिणें मिरविशी । पितृ शत्रु दास तें काम तूं करशील कपी मतिहीना । साह्य नसल्या आमची पाठ निघ । रघुपती आणू आज रणा ॥ ४ ॥ रसातळामधीं जाईल वाहील एक वेळ उलटी गंगा । पूर्वेचा पश्चिमेस उगवेल परी सीता न मिळे सांगा । नटवट करशी वृथा किमर्था । राम समर्था त्याची आहे मज अनगा । आज्ञा नाहीं नाहीं तर दहा तुझीं शिरें नेतों भंगा ॥ चाल ॥ क्रोध हा अस्परावरा जीवेंची मारा अंगद वीरा केली त्वरा । हृदयीं मारली लात मंढपाशी देऊन हात । उडाला अकस्मात् शिष्टाई जाली समस्त विठ्ठलपदीं कवी नवी नित धरणी । हरिपदीं चरणी रामकृष्ण गुणीजना । वावी गांव तेथें परशराम येसू वर्णी हरीच्या गुणा ॥ ५ ॥

## लावणी ४५ वी.

जरीना देशील सीता, बुडविशील राक्षसकुळ वाया । रावणासी करी बोध बिभीषण म्हणे बंधुराया ॥ जरी ना देशील सीता० ॥ धृ० ॥ सोळा सहस्त्र कामिनी भोगून जो ब्रह्मचारी ।

अनादि सिद्ध कीर्ति ज्याची गाती वेद चारी । तपसामर्थ्यें वर तुज देतां वदला शूळपाणी । रीस वानर तुज मानव वधतील असत्य नहो वाणी । शेषशाई अवतार उभयतां हेच चापपाणी । आदिमाया जानकी सती हें सत्य वचन मानी । सकल निर्जरांसहित अमरपती अवतरला अवनी । रामाआधीं रामायण कथिलें ऋषी वाल्मीकांनीं । परद्वारा परधन हरितां होय सुकृताची हानी । केलीं वेदाची खंडें मी शाहाणा तुजहूनी । चवदा चवकडे राज्य भोगी हे मंदोदरी जाया ॥ जरी० ॥ १ ॥ राक्षस वंशी जन्मुनी वदसी धिक् लाजिरवाणें । मानवाची सांगसी प्रशंसा तूं मरणाभ्यानें । रीस वानरें देखोनी भ्यावें काय मानवानें । सकळ देव मीं बंदीं घातले आणून रावणानें । स्वतां प्रतापबळें हलविलें कैलास मर्दानें । त्रैलोकीं मी अजिंक्य आहें श्रीशिव वरदानें । कल्पवरी जरी आयुष्य असलें मरती आयुर्दानें । नाशिवंत देह आशा धरावी रणीं नामर्दानें । कीर्ति किंवा अपकीर्त दोहींतून एक उरेल गाया ॥ जरी ना० ॥ २ ॥ श्रीरामाशीं मानव म्हणशी तूं एक शतमूर्खा । पदरजस्पर्शे गौतमकांता उद्धरली देखा । खर दूषण ताटिका मारली एक्या शर निरखा । तुझें तूंचि वाणशी जल्पशी नसतेच कुतर्का । पडतां उरावर धनुष्य, घेतला लज्जेचा बुरखा । तें रामानें सहज मोडिलें नसता वीर पुरखा । नुलंघवे तुज सौमित्राचे रेखा । भीक मागून जानकी आणिली मानसीं सुद हरखा । जननी

आज्ञेस्तव आलों तुजला शिकवाया ॥ जरी० ॥ ३ ॥ त्रिविक्रम बळी द्वारी उभा मम धाकें भ्याला । क्षीरसागरीं तो जातां मार्ग शोधितां बळी गेला । संकट पडतां त्याशीं कृतिम विचार योजिला । कळ साहून उंच सहस्र गावें क्षीरसागर केला । बदली आकाशवाणी दे जयपत्र रावणाला । असा पराक्रमी असून आतां काय भिऊं मानवाला । महान महान वीर युद्धीं कांपे थर थर मही ज्याला । तो सन्मुख तिवृती थाट करी कडीकोट भोंवताला । भय वाटतसे तुला बिभीषणा वांचाव जीवकाया ॥ जरी ० ॥ ४ ॥ सहस्त्र अर्जुनें बांधून नेलें स्मरण कसें नाहीं । पौलस्तीनें तुज सोडाविलें तें आठवे कांहीं । आणखी वाळी बुडवीत होतां महासमुद्र डोहीं । अंगदाचे पालखीं बांधिलें तुझें मन तुझ ग्वाही । स्थूळ शरीरीं ऐरावती पुढें सिंहा पुढें गाई । तसा राम रघुवीर प्रकाशल भरेल दिशा दाही । एक्या कपींद्रें घेऊन लंका क्षणांत केली लाही । इंद्रजित विवरांत कोंडिला रडे उभ्या धाई । अठरा पद्म दळ येईल तेव्हां मोकशील धाया ॥ जरी नादेशील सीता ०—॥ ५॥ क्रोध आला रावणा त्यावर शस्त्र उगारिलें । राजबंधु म्हणूनि सभाजन चतुरानें धरलें । लत्ताप्रहर एक त्याशीं लागतां सकल यत्न हरले । स्वहित सांगतां अनहित वाटे आयुष्य तुझें सरलें । शरण जातों रामास पांचजण गगनपथीं भरले । भक्त बिभीषण अभक्त रावण समसमान ठरले । एक चिरंजीव एक कितीनें त्रिभु-

वन भरलें । तें गीत गातां ध्यातां जडमूढ सकळही जन तरले । विठ्ठल वरदी परशराम सुत रामकृष्ण पाया । सखारामाची जोड नूतन नीत तोड सर्व गाया ॥ जरी नादेशील ० ॥ ६ ॥

## लावणी ४६ वी.

माय बापाची लेक लाडकी बसली आढी धरून । इजला भ्रतार द्यावा करून ॥ धृ० ॥ बापा आधीं लेक जन्मली नारी आधी पितां । पोरीला ठाउक नव्हती माता । ब्रह्मा विष्णू महेष आदि शिवाची कांता । तिचा अंत न कळे सर्वथा । दहा द्वारीं होति सुंदरा बसलि आढी धरून ॥ इज ० ॥ १ ॥ स्वर्ग एकविस वेणि नारिची नवळ सांगू कां । सप्तपाताळी जीचें पायीं । मंदर मेरू जिनें पोटिं खोविला नवल झालें राया । सप्तसमुद्राचे पाणी जिला प्यासा । अग्नीचे जिनें केले कुंकू ल्याली कपाळ भरून ॥ इजला ० ॥ २ ॥ सप्त धातुची नथ नाकां मधिं नव खंडाच्या माळा । घालुनि बसली स्वत्वें गळां । निरहंकार हंकार दोन्हीं दंडातिल वेळा । नेसली चिन्मय चंद्रकळा । चव शुन्याचें केलें कंकण । ल्याली हात भरून ॥ इज ० ॥ ३ ॥ जिने रवीची केलि राखाडी नक्षत्रांची बाळी । बिजवरा चंद्राचा भाळीं । अकाश धरित्री दोन्ही यानें वर ल्याली सुवर्ण कां चोळी । बैसली आदि माय वेल्हाळी । पायिं विरोद्या जोडवे खणाणी जाति फांकडी दुरुन॥इजला०॥४॥ शेषाचा जिनें केला शिणगार बैसली डोइ सोडुनी । मेरूची

खूण द्या सांगुनी । नामें विठ्ठल परशराम म्हणे नारिचे लगिन द्यावे लावून । शाहिराचे गायन ऐकून । शुन्या कारीं होति सुंदरा । बसली आढी धरून ॥ इजला ॥ ५ ॥

## लावणी ४७ वी.

रावणाप्रती विनविता सती पतिव्रता । निर्दोष यश घ्या पदरीं नेवोनी द्या सीता ॥ धृ ॥ पूर्वापार राजे अपार झाले क्षिती । परि तुह्मा सारखी कोणा घरीं ना संपत्ती । स्वर्गींचे अमर पुढें सुरवर नर राबती । गड आजिंक लंका सुवर्णमय शोभती । ऐशी हजार ललना देवांगना प्रती । पातिव्रता सीता हाकलाक आणिली सती ॥ चाल ॥ पूर्वीं शिव केला प्रसन्न तुह्मीं तप करून । ज्याकाळीं दिल्हा जो वर अथवा जिवीं धरून । ज्यानामीं तरल्या शिळा समुद्रावरून । वानरनरा हातीं मरण गेलां विसरून । हे शेषशाई अवतार अवतरुनी आतां । भविष्यार्थ वाल्मीकें आधींच कथिली कथा ॥ १ ॥ सांगसी खरे प्रिय सखे एक चित्त देऊन । ब्रह्माक्षरें निढळीं लिहलीं न चुके भेदून । देव आले तेहतीस कोटी माकडे होऊन । राक्षसी आहार मानसी मासी काय वेहून ॥ चाल ॥ कोण अमरपटा घेऊन आला सखे । गेले मरुनी भृशुंडी बगदाल-भ्यासारखे । नाहीं आकार पावती विकार आपती दुखें । जयाविजय अथवा हानि होऊंदे सुखें । ही दुपारची सावली

शरीर संपता । राक्षसी धर्म न सोडूं सर्वथा ॥ २ ॥ श्री रामचंद्र तुह्मीं मानवी ह्मणतां कसे । भ्रांतीनें भुललांत देहीं विषयाचें पिसें । एक वानर येऊनी सीताशुद्धीचे मिसें । त्यानें लंका जाळिली क्षणामधीं तिन हिसे । चौभवतें दरिया रिघ मुंगिला नसे । आलें दळ उतरुनिया पायवाटेनें जसें ॥ चाल ॥ हें समजुनिया अशांत व्हाल जगा । द्या सीता नेउनी गौरवुनी आपुले करीं । आले मुळाहुनी पहा चालुनी आपले घरीं । साक्षात विष्णु हा भाव धरुनि अंतरीं । द्या सीता नेऊनी अपेश कशाला घेतां । मग नाहीं भय वंशपरंपरा नांदतां ॥ ३ मी प्रतापी रावण दहशत देवादिकां । वेदाचीं खंडें करूनी उघड केली टीका । देऊं सीता नेउनी घेऊं अपकीर्तीचा थुंका । वंशाशी बोल लागेल पाहे केवढी चुका ॥ चाल ॥ रघुवीर नंदन मी युद्ध करून हरीन । राक्षसी कुळ हें समूळ रामरूप करीन । तूं जन्मोजन्मीं पट्टराणी तुला मी वरीन । विठू परशराम येसू लाघव करि कविता । रामकृष्ण रामा ह्मणे भावें घ्यावे स्वहिता । रावणाप्रती० ॥ ४ ॥

## भाग १ ला समाप्त.

# परशरामी लावण्या.

## भाग २ रा.

### लावणी ४८ वी.

दुरकर पसा खोटा चलनी कर्मी पुढती काय करी। कर्म साह्य जाहल्यास तेथें नित्य लक्ष्मि पाणी भरी ॥धृ०॥ नव्याणव यज्ञ बाळिने केले कर्मी नव्हते इंद्रपद। कपीनें पाताळिं घातला पृथ्वी केली त्रैपाद। निष्फळ विद्या पुस्तकिची। नकळे कर्माचा भेद। कर्म साह्य जाधि झाले तेव्हां ध्रुवा मिळाले अढळ पद। सुवर्णलंका दशाननाची केला कर्मे शिरच्छेद। नारदाची झालि नारदी कर्म लिखीते आगाध। अष्टवसू प्रसवलि गंगा। कर्मानें शंतनु घरीं। श्रीकृष्णाचा सखा मेहुणा कर्मे झाला धनवैरी ॥ कर्म० ॥ १ ॥ गरुड नंदी प्रतापि एसा कर्मा पुढें न चले गोरा। अर्जुनाचे ध्वजीं मारुती कर्माचा सारादोरा। भस्मासुर धाके सुरनर कर्मेकेला संहारा। अरूण केला सूर्य मेरुला कर्म करितो फेरा। अर्थारथीं कर्मे डुबले। हरिश्चंद्र राणीतारा। कौरव यादव गेले मेले। करुनि अपापसीं वैरा। श्रीकृष्णाला डाग लाविला देखा कर्मे द्वापारीं। इंद्राचंद्रा कर्में टागिले त्यजुन पळाले अमरपुरीं ॥कर्म ॥२ शेषाद्री हेमाद्री सह्याद्री कर्में निजाविले गिरी। कर्मावांचुन खारट जीवन कोण सागरींचे करीं। गयासूर पालथा घालिला कर्मानें बघ मही-

वरीं । जमदाग्नीची वधिलि रेणुका । कर्मानें भार्गवाकरीं । वज्र-अक्षयीं तेहि भंगले । नकळे कर्माची थोरी । शेष वराह कूर्म केले कर्में धरा देउन शिरीं । न घडे कर्माविण तपसाधन । धर्मा धर्म दयाकरी ॥कर्म०॥३॥ संतत संपत जोडाघोडा कवण कर्माविण देई । सुरापान गौ ब्रह्महत्त्या कर्मच करवीं बसुन देही । मूर्तिमंत प्रभु मायबाप सेवा कर्मच घडवी पाही । लक्ष कोटि जर रुपये खर्चिल जीव जनाला ना राही । कर्मधर्म तो हरीच अवघा विठ्ठ ह्मणला-गापायीं । गुरुवीण कृपा कोण दाखवी । परशराम अज्ञान कवी निशिदिनिं ध्यातों हरिगुण गातों । दया कृपा तो कां न करी । वृत्ती साधी छब गाण्याची कासार गुणी तो गुण लहरी ॥कर्म०॥४॥

## लावणी ४९ वी.

दशमुख लंकेशाची स्नुषा सुलोचना एक सती । भुज पाहूनी करी अकांत पाडिले इंद्रजित रणीं पती ॥ ध्रु० ॥ रवि कुळ भूषण श्रीराम जो कां राजा अयोध्यापती । सितेस्तव वानरदळ घेऊनी आले सुवेळा प्रती । दुश्चिन्हें जाणवती सतीला गेले संग्रामा पती । वदनेंदु कोमेला कळाहीन वाटे सुखसंपती । मोक्ष-सदन पावला इंद्रजित सौमित्राचे हातीं । कंदुकवत् शिर नेलें वानरे उभें धड रणाक्षितीं । सव्यभुज आली उडून उलंघुनी लंका निकुंभळेप्रती । आंगणीं पडतां नाद ऐकिला चिंतातूर झाली सती [ चाल ] पहागे सख्यानो कशाची ध्वनी । प्राणे-

श्वर रणीं सुखाचा अस्तू । तंव त्या धांवत आल्या सेवक जणी । प्रभा आंगणीं लागली दिसू । म्हणती आला तुटून विराचा पाणी । पाहूनी भुज नयनीं आलें अश्रू । उठली गजबजून डचकली मनीं । विघ्न पतिरायावर झणी नसू ॥ चाल ॥ देखिला सुशोभितहो । कर रुधिरानें भरला । पेटी भुज हार कंकण । चमके नीळ मुदिवरला । ओळखिला सतीनें तो । सप्रेमें हृदयीं धरला । सौभाग्यमणी माझा । चमूसागरीं विघरला ॥ चाल ॥ घाली उभ्या आंग धरणीवर केश कुरळी । माखली धुळी । विखुरली पोत झळझळी । आहळली जशी करदळी । कीं शोकानळीं । सुमनकळी । नग विगलित भूमंडळीं । आग लावागे सदनांत । होऊंद्या होळी । जीव तळमळी । मूर्छित पडे त्या वेळीं ॥चाल॥ तेंव्हां सखयांनीं सावरून । केलें सावध पदरीं धरून । संकल्प मनाचा करून । स्वधर्म आपला स्मरून ॥ चाल ॥ भोजपत्र आणविले तत्क्षणीं । दउत कलम दिलें हातीं । पतिव्रता जरी मी असेन लिहून द्या जाली कैसी गती ॥ दशमुख० ॥ १ ॥ वर्तमान वर्तला लिहितसे भुज देता लेखणी । सकळ स्त्रिया चौभातीं पहा हातीं पत्र लक्ष राखुनी । ऐक शेषकन्यके सर्वसंपन्न चतुर देखणी । अजय आले आम्हासही तंव पूर्वींची आंखणी । अश्व रथ देतां अग्नी केलें हवन नेत्र झांकुनी । आराध्यदैवत क्षोभाविलें वानरें शिळा झोकोनी । केला पराक्रम उदंड परी तो जयपारिखा निरखुनी । उदार मन आम्हीं केलें संग्रामीं

वीर मानवी देखुनी ॥ चाल ॥ चवदा वर्षे तप निराहार केलें । आम्हांस्तव वीर त्या लक्षुमणें । ती मज आली दया दान शिर दिलें । आपुल्या स्वकाया वाचा मनें । श्रीरामपदीं निजसुख मनीं लाधलें । अर्पून धड सुफळीत केलें जिणें । म्हणून भुज-मूळ तुज पाठविलें । उतरूनी भवदुस्तर सत्वर येणें ॥ चाल ॥ तव प्रीतींत जीव रिझला । मी उभा तुझेसाठीं । होईल दर्शीर मजला । दे येऊन मिषे भेटी । असें पत्र लिहून भिजला । भुज दावीत हातवरी । देह कागदभर झिजला । झाली भयाभीत पोटीं ॥ चाल ॥ चुकली मृगाशी हरण दुःख वाटलें । बल पेटलें । वाटे गगन जणूं फाटलें । भणभुंगुर जाउनी दुःख मायीक लोटलें । वदन उटलें । रोमांच अंगीं उठले । आलें स्फुरण सतीचें आंगीं प्रेम दाटलें । आश्रु आटलें । चित्त प्रपंचांत विटलें ॥ चाल ॥ झाली उतावेळ तद्धडी । करी शय्या दान आवडी । पतिव्रतापणाची आढी । त्रैलोकीं उभवीन गुढी ॥ चाल ॥ स्वार होऊनी अश्विनीवर घेऊनी भुज शिबिकेमधीं प्रीती । रावणाशीं आली विदित कराया रूपगुणी जन वर्णिती ॥ दशमुख० ॥ २ ॥ नख दृष्टी नपडे जिचें ती निर्भिड आली एकली । सुने निढळ निकुंकुम येतां रावणानें देखिली । शिबिकेंतून भुजस भेशीं आणितां होती वस्त्रें झांकिली । उघडुनी पाहतां नयनीं सकळीं रुधिरानें मांखली । हाहाकार झाला एकाचि लंकाधीश धाय मोकली । धैर्यमेरू आज खचला शोके मंदोदरी शोकली । शक्र

जिंकिला समरी कीर्ति त्रैलोकीं फांकली । तव सामर्थ्यें निर्जर बंदी आज ही दशा ठाकली ।। चाल ।। पुत्राचा प्रताप आठवूनी मनीं । दाही वदनीं घाली मृत्तिका । तंव ते विनवितसे शुभ-लोचनी । शय्यादानी मला चित्तवृत्तिका । लिहिलें जें आहे मजला स्वामिनी । पहा वाचुनी हेच पत्रिका । द्यावें तुम्हीं सत्वर शिर आणूनी । आले म्हणुनी हेच अर्थीका ।। चाल ।। नाहींतरी मीच जातें न कार्य तुम्हा तोले । करकरा दशन रग-डुनी । वीस नेत्र लाल केले । दळ सकळ सिद्ध व्हारे शिर आणून देईन वहिलें । जयराम वधीन आज मी सुतपंथीं जाइल बोले ।। चाल ।। करी उत्तर मंदोदरी । चतुरा सुंदरा । दशकंधरा । आणिलें विघ्न तुम्ही घरा श्रीरामचंद्रा गौरवा बहुत आदरा । व्हा विजयी धुरंधरा । वंशाशी दीपक लावा निजमंदिरा । लावुनी इंदिरा । सांगते गोष्ट जिवीं धरा ।। चाल ।। ऐकणें नसेल अंतरीं । जाऊंद्या तिजला तरी । लंकापति उत्तर करी । आणिली सीता आहे घरीं ।। चाल ।। वर्म धरूनी अभिलाषील तिजला कैसी करावी गती । परद्वारीं कोण जय पावला पहा विचारूनी चित्तीं ।। दश० ।। २ ।। साह्य बिभीषण दयाब्धि-नायक राजा रघुवीर आहे । मंदोदरी म्हणे जाय मायगे तुम्ही तूंच निर्भयें । अर्धसहस्त्र सवेंदासी निघाल्या न धरितां संशय । येतां निकट वानरें देखिली अंतरीं आनंदमय । दिली सीता सोडूनी रावणें धरूनी प्रभूचें भय । श्रीरामाशी येऊन सांगती

आली जनकजा माय । न पडे दृष्टी तुमच्या जावत रावण जिवंत आहे । युद्धावीण तो कदा न सहसा सोडी कालत्रय ॥ चाल ॥ रत्नमणीमय पायीं पादुका । दूर तोचि उतरूनी अश्विनीखालीं । शुक्लपक्षींचा लघु इंदु का । सेना सर्वही पाहूं लागली । श्रीराम सौमित्र कृपासिंधु का । पाहूनी सान्निध नेत्रकमळीं ॥ चाल ॥ पहा ही शक्रारीची कांता । सुकुमार धुळें भरिली । ठेवितां भाळ चरणीं राघवें हृदयीं धरली । तूं धन्य धन्य माते तव नामें दुरितें हरिलीं । श्रमलीस एथवरी कां उत्तर करूं अनुसरली ॥ चाल ॥ तूं मच्छ कच्छ वराह नारसिंहरूपा । रविकुळदीपा । तूं धैर्य ध्यान चिद्रूपा । वामना तूंचि भार्गवा आचरसी तपा क्षात्रिणी क्षपा । गोब्राह्मण आणिले रूपा । शिवाचें निज बीज आचरूनी जपा । दाविजे रूपा । मजवरी करावी कृपा ॥ चाल ॥ राघवा तनु कोमळा । तव नामीं तरल्या शिळा । चरित्र दाविशी लिळा । स्तुति करूनी उभी अबळा ॥ चाल ॥ उशीर होतसे मला । आणूनि द्या पतिशिर सत्वरगति । कुशळ बोल ऐकूनी तोषली सकळ सभा जीत पती ॥ दशमुख० ॥ ४ ॥ रघुवीर म्हणे आम्हीं शिर आणिलें हें तुजला कळलें कसें । लिहून दिलें दाखवी पत्र हे भूज पुढें ठेवितसे । आश्चर्य सर्वांशीं निर्जिव कर लिहितां न दिसे । बरें असो शिर हासवील तर हें खरें आम्हाला ठसे । रामचंद्र म्हणे पतिव्रता हें अगाध तिजला नसे । केश धरूनी आणाविलें रुंड तें वृषभा द्वारें जगदिशें । सव्य नेत्र

झांकिला वाम नेत्र तो उघडा असे । उत्तरीं वस्त्रावर मग ठेवी सकळ सभा पाहतसे ।। चाल ।। आठऊनी मग निजसुख हृदयांतरीं । कर्माची गती गहन ईश्वरा । निष्ठा पदीं असेल तुमच्या जरी । एक वेळ हासावें प्राणेश्वरा । राहील ही कीर्ति दिगांतरीं । सीमा सौभाग्याच्या ऐश्वरा । आणखी ही सभा मानवेल सारी । होईल सांगाया सुरा असुरा ।। चाल ।। उभयतां तुम्हीं आम्हीं मनीं इच्छा नाहीं पुरली । झुंजतां रणभूमीं कीं धनुर्विद्या सरली । नाहीं आलें समरंगणीं मी म्हणुनी आढी धरली । राहिलें चित्त कार्मी कल्पना मनींच मुरली ।। चाल ।। मग विनोद प्रारंभूनी काय बोलती । सुलोचना सती खिजवूनिया आपुला पती । त्रिटंबिली शूर्पनखा तुमची आर्ती । पंचवटी प्रती । निर्नासिक आली रीति । वीर कुंभकर्ण पावला रणीं विपत्ती । वानरा हातीं तो राग आलाअसेल चित्तीं ।। चाल ।। बोले सुलोचना गहिंवरून । अभिमान दासीचा धरून । हांसावे कृपा करून । मुखचंद्र गेला उतरून ।। चाल ।। एक चुकलें पिता शेष न साह्य आणिला पती । हें उत्तर ऐकूनि शिर हांसलें उघडूनि नेत्र पाहती ।। दशमुख० ।। ५ ।। पिता शेष न साह्य आणिला ऐकूनिया उत्तरा । शेष हाच सौमित्र म्हणूनि आले हास्य सतीच्या वरा । ज्ञानदृष्टीनें खूण दाविली शिर हालवूनी थरथरा । मम कन्या जाणूनी कळवळला लक्ष्मण अंतरा । सजीव करा इंद्राजित ऐकूनी हींव आलें वानरा । भीड उलंघूनी ।।

मारुती बोले न्याय नीतीनें करा । पिता सुत गुरू बंधु समरीं दोष नाहीं रणशूरा ॥ चाल ॥ द्यावें शिर परत ठरलें सर्वा-मुखीं । चित्ता निराशा बहु वाटली । तंव तें शिर घालूनी पालखीं । पाह्या मंडपीं सभा दाटली । रामा तूं विजयी होशील सुखी । आज्ञा घेऊन चरणीं लोटली । आवरी हें वानरदळ मज-विशीं । युद्ध न करी म्हणूनी उठली ॥ चाल ॥ मग लंकेसमीप येऊन । सकळांशीं श्रुत केलें । बरी स्मशानभूमी पाहुन । परि-वार सकळ आले । विधियुक्त पूजा वाहून । विस्तीर्ण कुंड केलें । पत्रींपत्रीं लिहून। वर्तमान दान दिलें ॥ चाल ॥ करी धर्मशा-ळेची पूजा उभी राहूनी । स्तब्ध होऊनी । पतिरूप आणिलें मनीं । निघाली मुखांतूनी । अंतरज्योति झणीं । ताठ ध्वनी । मी दासी म्हणवुनी । अग्नीमध्यें पडिला देह प्रेत होऊनी । सुरवरगणीं । वर्षाव केला सुमनीं । ॥ चाल ॥ या नांव म्हणावें सती । जीत जगती नाहीं त्या गती । केली जडना साधून राती । नामें विठ्ठल वर दे मती । वावी गांव सर्व जाणती । परशराम करी कवन जगीं इच्छून साधुसंगाति । तारी तारी करी कृपा । येसू म्हणे श्रीराम सीतापती ॥ दशमुख० ॥ ६ ॥

## लावणी ५० वी.

सौमित्र चाप चढवून । शर ओढून । भुज तोडून । जरजर केला । दशकंधर सुत भार्या हें कळलें तिजला । कोसळला मुगुट

गिरीकडा । भंगला चुडा । कुरळया लडा । पदर तळीं आला । अशुभ चिन्ह विचित्र लागला भाला । कीं अजय झाले रणीं सखे साजणी । आहेवमणी । तुटून पडला । चिंतातुर झाले राजे होईन या चपल । कडकडलें नभोमंडळ । तेज अढळ । हस्त कोमळ । रक्त भरियेला । पडतांच आंगणीं श्रवणीं नाद ऐकिला ॥ चाल ॥ तेव्हां घाबरली सुंदरी । शोक अति करी । भुजेशीं पाहतां । ओळखिल्या मुद्रिका करीं । तेव्हां क्षितीवरी पडे वीरकांता । अगे अगे सखे तू भुजे । तुला मी दुजें कसें धरूं आतां । सप्तदश वेळां इंद्र तुम्हीं राजेंद्र जिंकला होता । लाविले बाण सौमित्रा । आणिक इतरा । नवती गणिता । दुर्बळा द्रव्य सांपडे । साध्य ना घडे पूर्व फळ वाहतां ॥ चाल ॥ त्यारिती हो मजशीं । लाधिले तुम्हीं स्वामी । जडलें मी पदीं या । अहो कर्म निष्कामी । तुम्ही अजिंक्य होता । कसे निजला संग्रामीं ॥ चाल ॥ इंद्रा रे इंद्रा प्रत्यक्ष चंद्रा भार्या मी तुमची विराजिता । शुभ साधन पूर्व साधना प्रियकर मी तुमची वनिता ॥चाल॥ वर्तलें नवल हें खरें । मुंगानें सिंधु शोषिला । मर्कटें वारि वानरें धेनूनें व्याघ्र मारिला । अंतरी शोधितां वरे । निश्चय तिनें धरिला । दिलें दऊत कलम भुजेपाशीं । मारिलें तुशी लिहून दाव मशी । सांग करार । पतिव्रता असेल तर लिहून दावी अक्षरें । इंद्रजीत समरंगणांत । देहे भंगणांत । भुज आंगणांत । पडे महिवर । महाधैर्यवंत पतिव्रता सुलोचना चतुर ॥ ९ ॥ भुज कलमें धरी तेवेळीं । लिहून दावी

वळ। सर्व समुल । लिहिला वृतांत । क्षीसागरींचें निधान राम साक्षात । जरी पुसशील लक्ष्मण मारीलें ज्यानें । विजयी होऊन । देव भगवंत । न टळे दैव विचित्र पुरला अंत । म्यां उदंड तपसाधन । केलें हवन विवर पाहून । स्थळ एकांत । तेथें बसलों न कळों दिलें कोणा किंचित। हवनांतून विजय रथ वारू साहित सर्व साहित्य। दिले उमाकांतें । रथ अर्धा निघतां केला दुष्टांनीं घात ॥ चाल ॥ हनुमत आणिक वानरें टाकिती वर शिळा आणूनि । हवना परी विध्वंसिलें निर्फल गेले झाली हानी । परी न टळला सुद्धार्शी । नागफाशीं । तया लागूनि । निरउपाय झाली गोष्टी । पावलों कष्टी समरांगणी। भुजेनें ऐसें लिहून । कलम ठेऊन पडे निर्जीव होऊन । मग मूर्च्छागत झाली तेव्हां सखया सावरती । सरिता नेत्रीं वळली हरपलें बाई मोती । नाहीं करुणा आली कैसी तुजला बा श्रीपती ॥ चाल ॥ चक्रचाळका भक्तरक्षका परात्परा परमेश्वरा। बिन अपराधी धेनु नाडली चुडाभंग केला ईश्वरा । भुजकर पल्लवीं धरिली ह्मणे हो राजेश्वरी । पाडसा हरण चुकली। तीं मजला झाली परी । दश दिशा पालटल्या । दिसे भयाण लंका सारी । दशमुक सभामंडपी । महावीर तपी देउनि निज-रूपी तप अपार । तेथें गेली सुलोचना जसा दिसे भास्कर। इंद्रजीत समरांगणांत देह भगणांत भुज आंगणांत॥ २॥ ज्या सभेमधीं रावण तेथें जाऊन वर्तमान। सांगे कांताचा। मुद्रिका कर दाविला

इंद्राजिताचा । मुद्रिका कर ओळखिला । तेव्हां कळवळला । देह पाजळला अग्न समतेचा । भद्रासन तळ पडियला भूप लंकेचा । ऐकूनी मंदोदरी आली बाहेरी । दुःख अंतरीं खेद पुत्राचा । काष्ठानें अग्नी गिळला न्याय हो कैचा । वय लहान तूं युद्धाशी । कां गेलाशी । हरपलाशी हिरा दुबळीचा । शिव हरा कसा विघाड धेनु वत्साचा । धेनुसम आक्रंदता शोक करिती । मंदोदरी । मग बोध करी रावणा मनीं कांहीं आणा । पहा दुरवरी । वर्जितां आणली सीता सोडून द्या आतां । गोष्ट नाहीं बरी । आखयासारखा सुत । इंद्रजित वधिले वीर भारी । निर्वंश तुह्मी कराल । राज्य हराल लंका सारी । ज्याचे नामें-करून । गेल्या तरून । शिळा सागरीं । तो ह्मणावा कसा । शरण राजसा । जा हो लवकरी । रघुवीर प्रतापी । ना जिणवे तुह्माशी तो अगाध रूपी । करा सख्यत्व त्याशीं । ज्याची सेना कपी । आणिवलें द्रोणागिरीशीं ॥ चाल ॥ सोडा सीता पतिव्रता अनंता ख्याती सार्थक जन्माचें । राज्य करा तुह्मी धुरंधरा आतां चरण धरा श्रीरामाचे । हा पाराशर बोधिला । ज्याचे मदोन्मत्त इभ्रता । जरी दुधी कां न्हाणिला । परी न होय शुभ्रता । जरी गर्दभ शृंगारिला । न शोभे अश्व आश्रिता । झाले दोहींचें बोलणें । सुलोचना ह्मणे । पतिसंगें जाणें हाच निर्धार । शय्यादान करणें मला आणून द्या शिर । इंद्रजीत समरंगणांत देहे भंग० ॥ ३ ॥ पतिव्रता बत्तीस लक्षणा ।

करी प्रार्थना अहो दशवदना । अर्जी ऐकावी । साहित्य करा द्या शीर आणून या समर्यी । मग बोले दशकंधर । प्रतापि आह्मी थोर । तुच्छ रघुवीर । काय बढाई । एके क्षणीं राम जिर्कान होऊन विजयी । ते कशांत काय मर्कटें । धरूनि झपटें । करूनि एकवटे बहु भंडाई । सागरीं नेऊन बुडवीन एके घाई । तेव्हां अबला ह्मणे तुह्मी तराल । युद्ध कराल । रघुवीर हराल कोणे समर्यी । नाहीं तर मी जातें मजला आज्ञा द्यावी ॥ चाल ॥ दशवक्र उत्तर करी । ऐक सुंदरी । सांगतों तुजशीं । नको शरण जाऊं रामाशी । तया दुष्टाशी । उणें वंशाशी । निर्वाणी युद्ध करीन । शिर मी आणीन । स्थिर जरी होशी । गर्वाचा शब्द ऐकून मंदोदरी ह्मणे लंकेशासी । पुरें आंता क्षय आणला । जाऊं द्या इला रामापाशीं । यावरी बोले रावण । दिसे दुश्चिन्ह । सत्य मानसीं । आणली सीता आपण । वरून ती खूण । हेत अभिलाशीं ॥ चाल ॥ हें कळो वर्म । कसें निष्ठुर बोलतां । एकपत्नी राम । सीतेवांण जगपीता । हा माझा नेम जातें मी बसा आतां । निष्कपट बहु मनीं निकट आवडी भेटी घ्यावी श्रीरंगाची । सभा बसली निर्वीर झाली चिंतातुर दशवदनाची ॥ चाल ॥ सुलोचना तेव्हां त्या वेळीं । चालली सभा सोडूनी । लंकेची प्रजा तरमळी । शोक करी अति पाहुनी । शशी कपी असतां चळीं । तशी गेली

लंकेतूनी । पावली रामाचें दळ । प्रताप सबळ । कपिमंडळ । थोरथोर । पुढें वाट करी सुग्रीव पाहती वानर । इंद्रजीत समरांगणांत ॥ ४ ॥ ( अपूर्ण. )

---

## लावणी ५१ वी.

ठावे पडावे पांडव यास्तव द्रुपद रावें पण केला । मच्छ यंत्र वीर भेदील जो कोणी मग द्रौपदी देईन त्याला ॥ ध्रु० ॥ द्रोणप्रतिज्ञा खरी करी अर्जुन द्रुपद बांधुन रथीं आणिला । अपमानाची वीरश्री अंगीं लज्जित होऊन मनीं शिणला । द्रोण वधीन रणीं तरी मी द्रुपद विचार पाहून करी चुकला । धृष्टद्युम्न द्रौपदी शिखंडी तीन बाळें यज्ञीं जनला । कौरवास जड पडलें पांडव प्रताप त्यांच्या जिवीं भिनला । धृतराष्ट्रापुढें रडे दुर्योधन सभारंग दिसे भणभणला । चार पावलें दूर टवा पांडव कपट पनसुबा पट विणला । लाक्षागृहीं जाळावे पांडव कर्ण शकुनी गुणगुणला । विदुर भक्त जो त्रिकाळ ज्ञानी समजून बमांला । बरबर भाषा बोलून श्रुत करी समूळ वार्ता धमांला । ठावे० ॥ १ ॥ पुरंची नामें यवन कुशळ तो दुर्योधनाचा स्नेही होता । लाक्षागृह त्याहातें करविलें वारुणावर्तास नकळता ।

सन्मानें बोलाविलें पांडव सर्व कुंती माता । धर्म म्हणे बंधूशीं असावें पुढें येथून सावध आतां । साह्य सखा श्रीहरी कैवारी भवदुस्तरीं संकटीं त्राता । आधींच कोरलें विवर निघाया मार्ग करून ठेविला ऐता । हरिजागर नित करून राहती आठऊन रुक्मिणीकांता । घात कराया जप येवोन तो रात्रंदिवस भवतां भवतां । तेच दिनीं कापडी पांचजण सहज आले रहायाला । अग्न लावितांक्षणीं धर्म भीम जागृत होते पहायला । ठाव०॥२॥ अग्नि पेटला जेव्हां धडाधडी विवरद्वारीं पांडव गेले । प्रबळ ज्वाळा पाठी लागतां खांडव वन देऊं केलें । जगीं वार्ता अशी फुटली लाक्षागृहीं पांडव मेले । सकळ कौरव हर्ष अंतरीं उप- रोधिक पाहूं आले । सहाजणांच्या अस्थी पाहून दुर्योधनाचें मन धालें । क्षोभ ईश्वरी न कोणाला कर्माचे अघटित घाले । इकडे निर्भय सुखी सहाजण सूर्य जसे धुळीं भिनले । राक्षस वन तें महा भयंकर गिरीं कंदरीं वन उल्लंघलें । हेडंब मारून वरली हेडंबा गर्भी घटोत्कच समावला । एक संवत्सर तेथें राहिले पुढें बकासुर निमाला । ठावे० ॥ ३ ॥ हेडंब बक दोन्ही असुर मारिले कोण पराक्रमी वीर असा । एक्या पांडवाविण हें कार्य इतरांशीं न घडे सहसा । परस्परें बोलती असें जन कळो येईल महिन्या चव सा । शाण्णव कुळींचे राजे मिळाले द्रौपदी स्वयंवरी अनायासा । दुर्धर पण उभाविला कळीच्या काठ्यांवर

फिरता मासा । कढईत पाहून यंत्र भेदील जो धनुर्वदी निपुण लईसा । तीन बाणांचे प्रमाण चुकल्या कढईत टाका त्या पुरुषा । रावरंक कोणीहि असूंद्या नांवगांव सहसा न पुसा । त्यांत मुख्य श्रीहरी सिंहासनीं विश्वंभर विश्वाचि ज्याला । पांडवास आज वरील द्रौपदी नेम करून ऐता ठेविला । ठाव० ॥ ४ ॥ होऊन कापडी आले तेथें पांडव हरीविण कळलें नाहीं कोणा । याचक येऊन सभेशी बसले आंगावर भगवा बाणा । पण भेदावया उठला कर्ण धरून मनीं अभिमाना । धनुष्य उचलतां झाला कासाविस दुर्योधन आवरी कर्णा । निर्वीर झाली सभा बोलती इच्छ्या कोणाचा पुढें होईना । असें म्हणतां उठले कापडी भिर-भिर पाही सारी सेना । पार्थबाणे यंत्र भेदिलें माळ घातली अर्जुना । द्रौपदी–स्वयंवर यापरी झालें कौरवाचें दळ केलें राना । नामीं विठ्ठल परशराम म्हणे भावें सखा श्रीहरी ज्याला । रामकृष्ण गुणी रामा गातो ताजव्यांत अक्षरें तोला । ठाव० ॥ ५ ॥

## लावणी ५२ वी.

दुर्योधन दुर्बुद्धी पुसे नित्य करून भिमाची रळी । द्रौप-दीचे मंदिरीं खरें सांग आज कोणाची पाळी ॥ धृ० ॥ अटोकाट एकोत्तरशे कौरव करूनी बसले सभा । सभेशीं येतां

भीम दुर्योधन उठूनी राहे उभा । सन्मानें शेजारीं बसवून म्हणे माझ्या दुर्लभा । खरेंच सांग आज द्रौपदी आहे कोणाची वल्लभा । शब्दशस्त्र शत्रूचे लागती जशा अहीच्या जिभा । क्रोध आवरून भीम ना बोले न चाले मनसुभा । सूक्ष्म झालें शरीर असूनिया प्रताप अंगीं बळी । द्रौप० ॥ १ ॥ निजदासाचा सखा हरी तो गुज भीमाला पुसे । सूक्ष्म झालें शरीर उतरला चंद्र तुझा कां दिसे । वृकोदर म्हणे तूं कैवारी असतां न्यूना नसे । कै काळा शिक्षा लावीन इतर काय माणसें । बस्त मस्त हे कौरव उतले एक एक मनीं येतसे । रक्तपान वाटतें करावें तुझीच आण वाहातसे । सभेशीं नेतां दुष्ट दुरात्मा हृदयीं बाण लावितसे । द्रौपदीसेजीं पाळी कोणाची नित्य दुर्योधन पुसे । असें वर्म सांगता श्रीहरी । तप्त होऊनी बोले वनमाळी । तुझे हातानें अवघे संहारीन करीन रणरांगोळी ॥ २ ॥ पतिव्रता सती भानुमती आहे दुर्योधनाची राणी । प्रीत पतीची बसावी कुडें कपट धरीं मनीं । दुर्वासापुन तल भारियेलें ठेवियेलें निज भुवनीं । लाव मस्तकीं वश होईल हरुषली बहु मनीं । तेल लावितां महिवर पडतां अपाय होईल हानी । आम्हीं केलें तें न मोडी ब्रह्मा संकट पडशी क्षणीं । तेल लावितां भूमीवर पडलें गेलें पाताळ भुवनीं । शेषाचे मस्तकीं लागतां भुलला तत्क्षणीं । नित्य ठेऊनी दुर्योधनाला बांधून पलंगास्थळीं ।

भानुमतीला भोगून जातो दुष्ट मनीं तळमळी ॥ ३ ॥ असें वर्म सांगून श्रीहरीनें उगविलें सांकडे । आज कोणाची पाळी म्हणतां करी उत्तर रोकडे । आज शेषाची पाळी ह्मणतां लवण जळामधीं पडे । जसे अभाळ गगनीं विराले गंधर्वांचे हुडे । शेष जातो भानुमतीसी हें श्रुत झालें चहुकडे । पृथ्वी कशावर ठेवीत होता सांगून बोला पुढें । नामीं विठ्ठल परशराम ह्मणे मूळ शास्त्राचे धडे । रामकृष्ण गुणी रामा गातो सर्वांचें गणित झडे । शिकून सींकोंरे गाती नाचती चुली भाणोशीवळी । आहिरामधीं एक सरेना नाच्याची मंडळीं ॥ ४ ॥

## लावणी ५३ वी.

जुने डोळे नव तमाशे आम्हीं पाहिले फार । सखेगे दे सोडुनि वेडेचार ॥ धृ० ॥ करूं नये ते भलतेंच करिती नव्या नवतिच्या बळें । उतार वयांत पदरीं पडतील फळें । जंवर मुखांवर लाली तोंवर पुसतील हेंडगोळे । चल नको भाजुं घरांवर हुळे । धन दौलत जरि पदरीं असली । पाण्या वाणी पळे । मेळवितां सायासी ना मिळे । सुकृत सरल्या कोण पुसेल मग होसिल हिंसा गार । सखेगे दे० ॥ १ ॥ मुंगी होऊनि साखर खाशिल । अवघ्यासी लाडिवाळ । लहानपण

असो चिरकाळ । रुपवंती देखणी परंतु शिंदळ नीच चट्टाटळ ॥ वरपांगी फिरवी माळ । मोठेपणाची घमेंड खोटी दुःख फार हृदयाला । हात्ति होउन फोडु नको काष्टाला । पातिव्रतेचे वृत जर धराशिल । होसिल भव सिंधू पार । सखे ॥ २ ॥ विषय हाच बचनाग प्रथम खातां लागे गोड । अंगीं भिनल्या मोडितसे खोड । दहा जगांच्या नादीं भराया । आधि ह्याचा संग सोड । घे करून सहा चौघा जोड । फांदो फांदीना भट-कत फिरतील । धरून रहा एक खोड । मनोरथ पुरतिल जिविचें कोड । सांगितल्याचा राग न धरी कामक्रोध करि ठार सखेगे० ॥ ३ ॥ असंगासी संग जर करशील । आम्ही ह्मणूं फांकडी । इतर काय कोट्यावधि घुबडी । लाखो खंडच्या माप मोजिती परी माप लांकडी । तर्क धर नको पडूं सांकडी । लाल सुरांवर ख्याल नवे नित शाहिरीची अक्कड । लाभले विठ्ठल वरदे फक्कड । परशराम गुणि येसू गातो जन रुढी जन आचार । सखेगे० ॥ ४ ॥

## लावणी ५४ वी.

कर्णास ह्मणे शाबास देव श्रीहरी । ऐकून अचबा मनांत अर्जुन करी ॥ धृ० ॥ शत्रुशीं वाणीशी कृपाळुवा श्रीपती । मजपुढें काय कर्णाचें युद्ध किती । जेव्हां बाण लावितां तेव्हां

थरारी क्षिती । सात पांड कर्णाचा रथ सरे मागवती । हें दृष्टी पाहून न बोलसी कंसारी । आंट पांड सारिला काय त्याची थोरी । कर्णास ह्मणे० ॥ १ ॥ तेव्हां उत्तर करी श्रीहरी अर्जुना । तुझ्या ध्वजस्तंभीं मारुती अचळ वीर जुना । यावर मी सारथी त्रैलोक्याचा राणा । जें न घडे तें मी घडवीन गुंतुन भक्ती ऋणा । मूर्तिमंत हे वेद अश्व रथाला चारी । त्रिकांडी मग दिव्य दिव्य करी । कर्णास० ॥ २ ॥ क्षत्रियांत पहा कर्ण एक महा बळी । युद्धसमयीं रथ चक्र मही गिळी । इतकें सावरून करी रणामधीं रणफळी । मी नसतां तुज बुडविता समुद्रजळीं । शल्य सारथी बळ एक क्षीणक्षीण करी । दानशूर रणशूर कधीं टळेना परी । कर्णास ह्म० ॥ ३ ॥ अर्जुन उमजला धरी श्रीहरींचे चरण । तारिशी मारिशी तूं जिंकविशी करण । तुझी धन्य धन्य देवा तुझ्या नामें तरण । कवी विठ्ठल नामीं संत जनांला शरण । वावीग्राम तिथें परशराम करी कवीश्वरी । येसूच्या जडना जशा मोत्याच्या हारी । कर्णास ह्मणे शाबास देव श्रीहरी ॥ ४ ॥

## लावणी ५५ वी.

जयद्रथाला राणिं आजि मारीन तरीच अर्जुन खरा । पण चुकल्या अग्नी प्रवेशीन तुझीच आण श्रीधरा ॥ धृ० ॥ द्रोण

कर्ण दुर्योधन यांनीं सेना केली दो फळी । समसप्तकास गेलें युद्ध कराया अर्जुन आणि वनमाळी । मागें बंदोबस्त ठेविला राखण सेनापती भीम बळी । चक्रव्यूह द्रोणानें रचला ऐका कौरवदळीं । व्यूह भेदिल असा वीर दिसेना धर्म मनीं तळमळी । प्रती अर्जुन अभिमन्यु दुसरा उभा येऊन त्या वेळीं । चक्रव्यूह भेदीन आज मी देईन धर्मा धीरा । गर्भी ऐकिली कथा निरूपण समूळ युधिष्ठिरा । जयद्रथाला० ॥ १ ॥ वय लहान सुकुमार बाळ अभिमन्यु रथीं मग चढून । जर्जर केली सेना बाणें गेले कौरव हडबडून । द्रोण डोलवी मान जेव्हां का आला व्यूह दोन तीन फोडून । मागें परतून निघतां येईना अवघेच पडले घडून । पांचांनीं अभिमन्यु मारिला क्षत्रिय स्वधर्म सोडून । महीवर पडतां जयद्रथानें लत्ताप्रहारें ताडून । म्हणून धरला कंठीं प्राण मनीं आठऊन रुक्मिणीवरा । अर्जुनासी विदित करावें दृढ निश्चय अंतरां । जयद्रथाला० ॥ २ ॥ युद्ध करून परतले पार्थ मग येऊन शिबिराप्रती । रणीं पडला अभिमन्यु ऐकून अंग टाकिलें क्षितीं । देव द्रौपदी पांची पांडव बहु दुखें आक्रंदती । वंशरत्न आज धुळींत हरपलें कैशी झाली गती । रणभूमी शोधित चालले अर्जुन आणि श्रीपती । तेव्हां तो महीवर स्फुंदत पडला मधुरध्वनी ऐकती । असंख्य दळ पाडिलें पाहिलें महान महावीरा । दीपिका होती हातामध्यें ओळखिलें अपुल्या कुमरा । जयद्रथाला० ॥ ३ ॥ वदन धुळीनें

भरलें पालवें पुसूनिया निजकरीं । काय झालें पाडसा विचारी घेऊन अंकावरी । जयद्रथानें लाथ मारली हेंच दुःख अंतरीं । उदईक मारीन तुझीच आण साह्य मज श्रीहरी । उत्तर ऐकुनि प्राण सोडिला विष्णुपदाग्रीं । धनंजय तो विशाप मोहें बुडवुन शोकसागरीं । पण केला ही वार्ता कळली कौरवदळीं आंवेरी । अवघे मिळून रक्षा जयद्रथ मग यशाचा तुरा । जयद्रथाला० ॥ ४ ॥ तीन प्रहर केलें निक्षुनि युद्ध गगनीं न माई धुळी । अस्त उदय कोणास कळेना उर्वी डळमळी । कोटी भानूंचें तेज असें तें सुदर्शन झळझळी । तें सूर्याआड धरितां दिसती नक्षत्राच्या वळी । पण चुकला ह्मणून अग्निप्रवेशा प्रदीप्त केली होळी । दुरून तमाशा पाहती निर्भय दुर्जन खळमंडळी । अग्नीभौता फेरे घाली चाप लाऊन शरा । गवाक्षद्वारीं पाही जयद्रथ ध्यानीं आणून बरा । जयद्रथाला० ॥ ५ ॥ अडून काढितां सुदर्शन मग प्रकटला दिनमणी । हा सूर्य तो जयद्रथ पहा चारी होता गुणी । तद्ग्रहीं उडविलें शिर जयद्रथाचें रणीं । जयवाद्यें वाजती ऐकतां कौरव भ्याले मनीं । सुदर्शनाचें तेज हरपलें कैसें त्या दिनीं । नवाशिकाला काय पुसावें शहाणा पचेल अडचणीं । विठ्ठल नामीं परशराम कविची नित्य अशि तऱ्हा । तुझी आई कलंगी निंदा करशील तुझा बाप तो तुरा । जयद्रथाला० ॥ ६ ॥

## लावणी ५६ वी.

सगुण निर्गुण शोधुन पाहतां कमजास्ती नाहीं भिन्न भेद ।
कलगी तुऱ्याशीं निंदून गाईल तो मांगाची अवलाद ॥ धृ० ॥
निर्गुण ज्योति सगुणमाया दोहींपासून जीव वाचा । विश्वची माया विश्वाचि व्याली तूं काय वेगळा सुसरीचा । नर नारी तिथें नांवच नाहीं तुरा नांव म्हणशील लुचा । परा नामें ही कलगी पराची एक लेका । शिंदळीच्या । शेषाला नाहीं अंत लागला मुके झाले चारी वेद । आंड दिला तर उंबर म्हणशिल तुला तरी काय कळला भेद । कलगी तुऱ्याशीं निंदून गाईल तो मांगाची अवलाद । सगुण० ॥ १ ॥ जसें झाडाला बिज बिजापुन झाडाला होणें जाणें । लहान मोठा नंग गाठिला आदि अंतीं एकच सोनें । सगुण निर्गुण एकच वस्तु आगळी अक्षरानें । अभेदाशीं भेद लावशील जाणत असे गाशिल गाणें तुझी आई कलगी बाप तुझा तुरा कां करशील लटका वाद । सगुण० ॥ २ ॥ पंचमुख षण्मुख चतुर्मुख सहस्त्र मुखाचा मालवला । याहून आगळा कोण असेल तर सभेमधें निवडून बोला । जपी तपी संन्यासी या युगामधीं मायबापाविण कोण झाला । घर बारी होऊन निंदिती डाग लावला वंशाला । भेद कळेना जाणतो साला निर्गुण गाऊन करती वाद । सगुणावांचून निर्गुण न लागे दास पितऱ्या मतिमंद । सगुण० ॥ ३ ॥

लोहार सुतार कुंभार परीट बाराकारू आडकले । यांना आडून कज्जा जिंकून बिन संधीनें कोण आले । नवशिक्याला काय पुसावें हजारो टालेटोले । नामीं विठ्ठल लीन सद्भावें परशराम वावीवाले । छंद शिरे सवाई वळ नामावर बुनाद । मूर्खाला ही छक्कड भासे शाहाण्यासी खासा बोध । कलगी तुऱ्यासी निंदून गाईल तो मांगाची अवलाद । सगुण० ॥ ४ ॥

## लावणी ५७ वी.

जमुनाके नीर तिर धेनु चरावे । नट चालक गिरधारी ॥१॥ सुनो राधा प्यारी किने बजावी मुरली । राधाकिने बजायी मुरली ॥धृ०॥ वृंदावनको श्याम कन्हैया । धुंडकी गोकुल नगरी । किने बजायी मुरली ॥ २ ॥ विठ्ठ परशराम हरिगुण गावे, यशवंत छंद ललकारी । किने बजायी मुरली ॥ ३ ॥

## लावणी ५८ वी.

कळा अचळ करतार धन्यता तार तार हरी । कौरवें गांजिलें हें दुःख अंतरीं ॥ धृ० ॥ कल्पवरी जे ऋषीजन ध्याती नकळे तुझा पार । खगरूपी तूं येऊन मजला तार । गदा घेऊन अनंता हो गरुडावरती स्वार । घन शत्रु वर्षती हे दुर्जन मार । नमस्कार मी करितें मजला तुझा आधार । चंचल केलें पांडव

न धरती कोणी आधार । छप्पन्न कोटी यादवबंधु न मिळे तुज-
वीण थार । जगव्यापक तूं जगर्जीवन साधार । झडकरी झाव-
नही सभा हासेल सारी । कौरवें० ॥ १ ॥ एक विचार करून
सुयोधन, आज्ञा करी सुता । टपकन द्रौपदी नग्न करा आतां ।
ठक पडलें अवघ्यांस म्हणतां हें ईश्वरसत्ता । डगडगली द्रौपदी
धांव अनंता । ढळढळ नेत्रीं अश्रु वाहती सभेसी विज दिसता ।
नरहरी पावले गरुडा साहिता । तत्क्षण द्रौपदीस कळलें नाहीं
भयचिंता । थरथरारले पांडव हरीशी पाहतां । दयावंत भगवंत
तेथें दुर्जन काय करी । कौरवें० ॥ २ ॥ धन्य धन्य श्रीरंग
अनंता होय श्रीरंगे । न नेसवी वस्त्रें हरी अंगे । पर्वत वस्त्रांचे
पडले शत्रु झाले दंग । फळ पूर्वी झाकले अंधऋषी । बळे नाहीं
श्रीहरीचे अखंड अभंग । भाक्त पार केला अपंग । मथुरेची
साडी आणली जरी पिवळा रंग । येवेल नक्षीची चोळी बरी
भिंग । रक्षी रक्षी श्रीधरा म्हणे पतिव्रता सुंदरी । कौरवें०
॥ ३ ॥ लक्षाचे लक्षा आणलीं प्रावर्ण । वैकुंठनाथ करी भगि-
नीस्तव प्रयत्न । सप्तपुऱ्यांचीं वस्त्रें आणलीं तयानें पूर्ण । खरें
भासलें बुडालें गर्वानें । शेला नेसविला शंख चक्र बरी गदा
पद्म खूण । हरी देखतां आले क्रोध मन । लवलवीत जिव्हा
उग्र सिंह ज्याचा जसा पीतवर्ण । क्षय जाळीन शेवटीं कौर-
वांशी जाण । ज्ञ नामीं विठ्ठल परशराम येसू गातो गाण्यापरी ।
कौरवें० ॥ ४ ॥

# लावणी ५९ वी.

सोनार शिक्का नवा निघाला पंचरा आणे जरी बट्टा ॥ धृ ॥ वडाची साल पिंपळाला लावितां कशी लागेल पहा शोधून । हेल्यावर जरी दिली अंबारी मटकन बसेल भारान । पखाल आपण वाहूं विसरला घरोघरच असेल गाणं । हिजडे जर तरवार मारते शिपायाशीं पुसतें कोण । उद्दंड झाला ताजा गधडा याला शोभल काय वर जीण । कोल्हे कुत्रे भुंकु लागले हत्ती पळेल काय भिऊन । भीक मागून पित्र घालशी तर स्वर्गीं कैसा वाजेल घंटा । सोनार शिक्का नवा निघाला सोनार० ॥ १ ॥ कसे मुंगीला पर फुटले घेऊं म्हणती गगन । गरुडाची सर याला टिटवी गेली गर्वान । हनुमंतापुढें उडी माराया पण केला काल्ह्यान । उडी मारितां धरणीशीं पडला झालं बावन गेलें अवसान । श्रावणमासा शिद्द यातले न्नेषाघरीं नेऊं लग्न । चैत्र वैशाखांत या ह्मणून ह्मटलें तिकडेच गेले मरून । ताड ह्मणतो मी मेरूहून उंच कैलासाशीं लावीन फाटा । सोनार० ॥ २ ॥ राजहंसाच्या पंक्ती बसाया गर्वे गेला कावळा । जातां खेपे टोचून पाहे जड लागे माणिक गोळा । बेडुक ह्मणे मी वेद पढतों डबकामधीं खरडी गाळा । मैना सारख्या रडूं लागल्या नित्य रडती वटवाघुळा । कोणी कोणाचा गुरु ना चेला घरोघरचे झाले गोळा । शिलंगणाचें सोनें आणूं आठ रुपयांचा

ह्मणे तोळा । जसे शिमग्याचे वीर घुमती फौजाचा करिती सपाटा । सोनार० ॥ ३ ॥ तळ हातानें चंद्र झांकिना उजेड त्याचा बहु जागा । मोत्याच्या लडींत सरजा दमडीचा तो माल फुगा । गुरु गुरकावी चेला टरकावी मात्रागमनी असेल वगा ॥ परस्परें जग देत ग्वाही अपकीर्ति माहित जगा । कथा भागवत शास्त्र पुराण हरीचे गुण कोणी गागा । नामें विट्ठलचे असे धडके ऐकून मूर्वा होय जागा । येसू परशराम ह्मणे अशिलाचा पोकळ ताठा । साऱ्या गांवाचे ओहोळ मिळून गंगेची करिती थट्टा । सोनार० ॥ ४ ॥

## लावणी ६० वी.

हारिस आणिला पति दोघींनीं केला सळो का पळो । सवतीचा प्रतिवाद नित्य विवाद लागला कळों । हारी० ॥ धृ० ॥ ह्मणे थोरली मी लग्नाची देवीधर्मी रुजु । कोरा नवरा आधीं म्यां वरला येती मला जन पुजूं । जेठी ह्मून मी वडील घरामधीं जशी ढगामधीं विजू । भय कोणाचें समया लावून आम्ही उभयतां निजूं । मी थोराची लेंक नको सवती मज पाहून खिजूं । सासु सासऱ्यानें मज आणिलें इला कशाला भजूं ॥ चाल ॥ माझें सयंवर झालें जेव्हां । फार गजर । रथ गाडे घोडे तेव्हां । दिली नजर । मजपुढें तुझा काय केवा । कर गुजर । अर्मीमर्जीमधं जरा न राहशी पुढेंच येईल कळो । हारीस० ॥ १ ॥ ह्मणे धाकटी

चडीलपणाचा नको लावूं तोरा । खुष मर्जी पतीची असली तुझा काय जोरा । कानीं कवाडीं येऊन लागशील अवघा वेळ सारा । दिड तांदुळ शिजऊन सांगशी गोष्टी तीन तेरा । वय नूतन गाझ्या भरजानीचा जणूं गगनीं तारा । म्हणून भाळलें पति रूपाला तुज सोडून गारा ॥ चाल ॥ हत्तीवर अंबारी जशी । भरजरी । शिवमस्तकीं गंगा जशी । आहे शिरीं । ही चुनी मुदीवर कशी । पहा खरी । पोट पिकेना म्हणून मज केलें धिक् जिणें तुझें जळो । हारीस० ॥ २ ॥ सरसाऊन मग ह्मणे थोरली उपमा देशील बरी । पार्वतीच्या धाकानें लपविली शिवानें गंगा शिरीं । मखमाली पैजार चांगली उदंड झाली जरी । पायाची पायामधीं शोभेल, कोणी बांधली शिरीं । अर्धांगीं निजअंकीं बसन मी, माझी करशील सरी । आजपासून चार पाउलें तुला मी ठेवीन दुरी ॥ चाल ॥ येऊं दे पतीला घरीं । उभी आडून । कां केली मजवरी । गळा पडून । लोण्याची सवत नाहीं बरी । कडकडून । असेंच सांगेन निक्षून पतीला तुझी क्रिया तुज फळो । हारीस० ॥ ३ ॥ रंगरस त्वां आधीं घेतला तपीं बसलीस करककरून । खोटेपणा मोठाई लावशील मजभोंवतीं फिरफिरून । आजवर म्यां सोसिले आतां राहे भरमाभरमी दुरून । बरोबरीचा दावा घेशील लगदा लगदी करून । अति निकट असें भांडण होता पति आले बाहेरून । दोघीजणींची समजूत केली राहा आनंदें करून

॥ चाल ॥ समतोल दोहींला ठेऊन । करी मजा । मर्जीत वागती बहुत । हितगुजा । नामी विठ्ठल करी छंद पाहून । करी हुजा । परशराम येसु म्हणे ऐसा ज्याचा तो न ढळे । हारीस० ॥ ४ ॥

## लावणी ६१ वी.

सवती ग सवती नित्य भांडती नाहीं कोणाचा कमजोरा । पती पांगळा करून बसाविला अभंड नारी शिरजोरा ॥ धृ० ॥ वडीलपणाचा मान मजकडे निस्तुक झाला पति बैल । आधींच बसविलें दांईवर याणें मग ती मजला कशी भिईल । जर का म्हणतं हाणीन मारीन याच्या डोळ्या असूं येईल । बोलाबोलींने विचार कारितां ही काय याला स्वर्गी नेईल ॥ चाल ॥ तुम्ही ऐका देऊन चित । ही वडीलपणाची रीत । मजपाशीं असावा नित । चोरी छपीनें इजपाशीं जावा इचा नसावा लई तोरा । माझ्या हातून म्यां करून आणली गोष्टी करील काय तीनतेरा ॥ सवती ग०॥१॥ म्हणे धाकटी कट्टी ज्वानी नको आंगावर येऊं बसून । आधींच मेंढा करून बशीवला किती बोलशील पती आ-सून । निजाय बसायचे दिवस माझे त्वां पायतीं राहावें पडून । जर कां माझा हेवा करशील चवघांमधीं नेईन वढून ॥ चाल ॥ कां मजला आणिलें करून । पहिल्या उमतीचें तारुण्य । भर रसा आलें रस भरून । रात्रंदिवसा करीन मौजा । मायबापानें

दिलें बिजवरा । पोट पिकावें हेंचि इच्छितें—पुढें होईल म्हातारा । सवतीग० ॥ २ ॥ घरच्या घरामधीं दोघी समजल्या हकिकत ऐका पुढें सारी । शरीर घेतलें पतीचें वांटून दोघी निजल्या शेजारीं । झोंपेमध्यें दिली कलथी पतीनें इचा पाय गेला तिच्या वरी । रागें रागें उठली थोरली घेऊन वरंटा काय करी ॥चाल॥ उठ सवती जागी राहाय । तुझ्या वांटणीचा पाय । मजकडे आला हा पाहाय । पायावरती हणला वरंटा पती कांपतो थरथरा । रागें रागें उठली धाकटी तिनें मोडला तो दुसरा ॥ सवती० ॥ ३ ॥ आपल्या हातानें घर बुडविलें दोघी बसल्या दोहींकडे । केला चहूकुन चवरंग पतीचा घरामधीं पडले खाडे । जोंवर वांचला तोंवर घरांतील अवघी जोडे । स्त्रिया अघोचर अवघे म्हणती देवा दिकांमधीं गोष्ट घडे ॥ चाल ॥ कवि नामीं विठ्ठलचें तोंड । बिसणीची मोडली खोड । केला कैक बेळां मोड । परशरामाचे छंद सवाई आकडबाज येसू झुरा । मार्गी चालतां निंदा करशील कशी गोष्ट जाईल थरा । सवती ग० ॥ ४ ॥

## लावणी ६२ वी.

क्षणभंगूर बाजार घडीचा काया पुरवस्ती ॥ नाम किराणा अमोल वस्तू भरा महाग सस्ती ॥ ध्रु० ॥ वर्म चुकल्या पडेल फेरा किती भटकत फिरशी ॥ वृक्षा मधिंवास । लक्ष यौवनीं ।

उन वारा झोके खाशी । पक्षांमधिं दहा लक्ष योनिगिरि कंदरि चारा चरशी । अक्रा लक्ष कीटक योनी । नव लक्ष जळचर होशी । तीस लक्ष पशु मातिंत संख्या चौलक्ष मानवि अस्ती॥ नाम किराणा० ॥ १ ॥ वृक्षयोनि वीस लक्ष हिंडतां । किति वर्षे जाती ॥ पाप पुण्य हें तुल्य न तुळतां । पुन्हा फेरे कोटि ॥ पुढती मागें । मागें पुढती । जीव फिरे जन्म किती ॥ अवचित उलटी बसली जरतर । अन्य योनि मिळती ॥ तेथ सुखाचा लेशकशाचा । करूं नको मस्ती ॥ नाम किराणा० ॥ २ पाक्षि-योनि तशि कीटक योनी । जळचर योनी फिरतां ॥ किती मानवा असातिल जीवा । हाल पूस चित्तां ॥ सुकर्म योगें हातीं लागे पुण्याई बहु होतां ॥ महा प्रयासी । मिळे जिवासी । मानव देह अवचिता ॥ लक्ष चौऱ्यांशीं योनि गिरीशिख । मानव योनी वस्ती ॥ नाम किराणा० ॥ ३ ॥ लक्ष चौऱ्याशिं । योनि हिंडता । पापसांचल सईम चिरा ॥ त्याशि तुळाया घडी लाविशी पुण्याचाच तुरा चतुरा ॥ पापपुण्य समसमना होतां । दर योनि कोटि फेरा ॥ अवचित झटका कसा पडे मग । नर-देहीचा वारा ॥ त्यांतहि उत्तम कनिष्ठ मध्यम । समाजीची गस्ती ॥ नाम किराणा० ॥ ४ ॥ सायासी हा जन्म शेवटिल । आला सेल कां वांटा ॥ सर्वांभूतिं भगवान भाउनी । नरा होय न धरि ताठा ॥ दिस आहे तों । कर झटपट सवदा । मग न सहसा तुज तोटा ॥ पारवतीं कम जास्ति न साहे । जणु धारवाडि

कांटा ॥ मधिंच दीस मावळला म्हणजे । कठिण पुढें याहुन तस्ती ॥ नाम किराणा० ॥ ५ ॥ एक नाम वर लिहितां तरलें अद्यापि व्रत पाषाण जळीं ॥ ही खुण ऐकून बाहिरा होशी । तशांत चवघे उकळी ॥ अभेद भावें ॥ नाम वदावें । हातिं वाजवुन टाळी ॥ अनंता जन्माची पापें । अर्धनिमिषा मधि होळी ॥ विठ्ठल नामें । परशराम म्हणे । कलिकाळाशी घ्या कुस्ती ॥ नाम किराणा० ॥ ६ ॥

## लावणी ६३ वी.

पतीनें मजवर वरचढ केला नित्य जळे सगडी । करून आणली दुसरी खर्चून सोन्याच्या लगडीं ॥ धृ० ॥ मी काय होतें कुरूप रुपानें विचार मनीं पुर्ती । अधीं दासी पाटाची बायको ह्मणे चतुर सुर्ती । न्हाण आल्याला आडीच वर्षे तंत आले भरती । घरीं दारीं शेजेवर तांत्रिक मनच्या मनीं झुरतीं । बाहेर खवढ्या सदां चित्त तुझें परनारीवरती । आंसिलाचें लेकरूं बळेंच जीव मुठीमधें धरती । मी वनी एकली हरण । फिराफिरून । आतां सहा चव महिन्या मरन । झुरझुरून । पाहा जळतां माझें सरण । डोळे भरून । दुःख सवतीचें मला साहिना पंख्यावर मुगडी । करून आणली दुसरी खर्चुन सोन्याच्या लगडी । पतीनें० ॥१॥ ह्मणे धाकटी उभवट माझी नवी तरणी मोती । सदा साट मीं पाहून केला दवलतीचा हत्ती । अशी

रांड चौडाळ गळ्यांमधिं लग्नाची होती । कशास केल्या दोघी रडाया उशा न पायती । तुम्ही तुला लाडकी वेगळी ठेव नेऊन सवती । तिची माझी एक नजर नसावी जीव गेल्या कल्पांती । ( चाल ) हळदीचा डाग एक मशीं । लाविला । इतक्यानें दासी झाली कशी । पुस तिला । जन ऐकून बाहेर होशी । सांग मला । जिची तिला गोष्ट सांगावी स्पष्ट करून उघडी । पतीनें० ॥ २ ॥ दो सवतीचा झगडा त्यामधें आणीक राख तिसरी । माझी करावी वाट तुह्मामधें अजात मी दुसरी । घाकुटपणाचा खेळ शिकविला मीच कळाकुसरीं । हशी खुशीनें विद्या मागतें पुढें पदर पसरी । एक झाला गलका भरली घर आंगण ओसरी । रोग नये हा भोग लागला देह वाळून उसरी । ॥ चाल ॥ अन्याई कोणी तरी लावा । चार जणे । तिघी जागीं तिघिजणी ठेवा । आर्तीनें । ही किरकिर विल्हेस लावा । मर्जीनें चवघे ह्मणती कुठे तरी भवाल गर्जीनें । नित्य घरामध्ये कळो माजला करूं पाहती फुगडी । पतीनें० ॥३॥ आडचा सवतीचा झगडा ग निवडून सुगडाई केली । जिची तिची वेगळी नेमणूक जुदी जुदी खाली । एक एकीला चवदा दिवस माहिन्यांतून बोली । दोन दिवस राहिले राखीचे आवस पुणव खालीं । पांचांनीं पंचाइत केली लढवून या किली । सरळ चालला प्रपंच गेल्या आपा-पल्या महालीं ॥ चाल ॥ नामी विठ्ठल छंद असे । रंगरशीं । जडणीमधें अंतर नसे । जन खुशी । जो आडमार्गामधीं धसे ।

त्याची इशी । परशराम गुण येस्लू गाती लाखांमधें सुगडी । करून आणली दुसरी खर्चून सोन्याची लगडी । पतीनें ॥ ४ ॥

## लावणी ६४ वी.

खर्चून पैका दोघी बायका केल्या सुखासाठीं । सुख नाहीं पर दुःख लागलें नित्य आमच्या पाठीं ॥ धृ० ॥ मूळ लग्नाची आमची बायको जन्माची वंडा । बारा वर्षें न्हाती होईना अझून करकंडा । इणेंच करविली बळेंच दुसरी घालुनया गंडा । केलें पदरानें खोरें आह्मांला सुकऊनया भेंडा । मूळ खांद्यावर घेऊन घरोघर नाचवशील झेंडा । केली तशी कडे लाव उरावर ठेव वाळीव धोंडा ॥ चाल ॥ केली तुझी त्यांचि खटपट । एकचिर्चीं वागा नीट । भलतुसें पिकूंदे पोट । कां करून घेशील वीट । डोळे असून आढांत पडशील हातीं घेऊन दिवटी । होती एकटी खाऊं पडकली तुप साखर रोटी । खर्चून पैका० ॥ १ ॥ ह्मणे पाटाची होतें सुखाची रांडपण घालून । गाडी बैल जुंपून आली घरीं माझ्या चालून । कसा घातला फासा सवती गोड गोड बोलून । अर्धा गांव केला पुढाईत हात पाय जोडून । घरदार संसार तुझाच नवरा जिवांत जीव घालून । आऊत सोडून राऊत झाला पाहतो मर्शी तोलून ॥ चाल ॥ शरिरानें बनली घऊस । तुला निजा वसायाची हौस । किती सवती लावशील वऊस । रक्ताचा

पाडान पाऊस । करीन वावडी नेईन चावडी मग पडशील खोटी । होती एकटी खाऊ पडकली तुप साखर रोटी ।। खर्चून पैका० ।। २ ।। सांज सकाळीं नित्य धुमाळी दोघी सघतोली । बेजार केला नवरा ठेविला करूनघा बिल्ली । घरच्या घरामधीं चवघाजणांनीं मन समजुत केली । वडील ठेवली खालीं धाकटी माडीवर ठेवली । पाटाशीं पती चोरून जातां पाळत लावली । आर्धी शिडी चढतां धावली पायांस कव घाली ।। चाल ।। धाकटी जपून वर होती । तिच्या शेंडी लागली हातीं । तिनें ताणून धरला पती । दोघीजणी पडल्या जीति । जसा दोडका लोंबूं लागला झाला हिरमुष्टी । दिवस उगवल्या सोडून दिल्हा जीव उरला कंठीं । खर्चून० ।। ३ ।। झुजून भोपळा झाला भवला दोहींचा झगडा । शेक सगडच्या करूं लागल्या चंचळ नारी दुधडा । आंगीं वायु भरला घातला वैद्यानें पगडा । धन दवलत सारी वाटे लावली मग झाला उघडा । दोघी बायका मूळ पापाच्या असून चतुर सुगडा । नामीं विठ्ठल परशराम झणे शेंदुर दगडा ।। चाल ।। एक जाया असावी सती । मूळ दुर्योधन दुर्मीति । नेला अहंभाव अधोगती । काय असून नसून संपाति । रामकृष्ण गुणी राया कपुत बुडविल कुळ पोटीं । मायबाप कोणी घेऊन गेले सांगा वैकुंठीं । खर्चून पैका ।। ४ ।।

# लावणी ६५ वी.

जर मतलब करणें असला तर कर अर्जव राहें बोलुन नरम । अर्जवशक्ती कामा येइल शीतल होइल लोह गरम ॥ ॥ धृ० ॥ दुष्टाला तर श्रेष्ठ ह्मणावे बहुत भला परउपकारी । कृपणास कर्णाची उपमा देउन अपुले कार्य करी । नामर्दाला मर्द ह्मणावे तो लाखांमध्यें धारकरी । भाटा ह्मणावे भदे जाणतां सूद ह्मणावा भिकारी । दुघडाला तर सुघड ह्मणावें । त्यासी मतलब पडेल जरी । चिपडीला ह्मण सुंदर नादर तुझ्यापुढें काय झाटपरी । हममाला धनिसाहेब ह्मणावें रयतगिरींचे हेंच वरम । अर्जव० ॥ १ ॥ घरबाऱ्यासी महंत ह्मणावें नांवगांव हटकुन पुसेल । अंधाला तर डोळस ह्मणावें घर राखित अंगाणिं बसेल । नीचाला तर उंच ह्मणावें खानदान खाणिच्या असेल । कुणब्याला पाटील ह्मणावें । गगन ठेंगणें तया दिसेल । सराफासि नाइक ह्मणावें अणिव्राणीच्या कसनी कसेल । वाणि वटावा शेट ह्मणावें लोभ धरून अपुल्याशीं हंसेल । जमादार प्याद्यासि ह्मणावें दों डोळ्या पडेल शरम । अर्जव० ॥ २ ॥ वेश्येला पतिव्रता ह्मणावें गरत ह्मणावें शिंदळीला । प्रभू गांवचा मायबाप तो जाणिल आपुल्या कदरीला । निर्धनाला कुबेर ह्मणावें उंच बसवावें सदरीला । दिवाळखोरा सालस ह्मणावें काय कमी धन बद-

रीला । दर्या ह्मणावें ओह्योळाला परि ह्मणावें मदारिला। बलुत्यासी म्हेतर ह्मणावे । चालेल आपुल्या गुजरीला। बायकोस घरधनीन ह्मणावें संसाराचा ठेविल भरम । अर्जव० ॥ ३ ॥ लीनपणा धर मउ मेणाहुन अर्जव शक्ति युक्त शिरा । इचिला वड पिंपळ खाणें प्रपंचांत परमार्थ करा । मतलबासही मसलत पक्की नामें विठु वस्ताद पुरा। परशराम बेस्तू महादुचा। छंद जसा चौकोनि चिरा । ज्या रंगांवर नेऊन बसवाल । तसा होतसें पहा हिरा । चतुराला चतुराइ ठसेल । कली-युगाचा असा धरम । अर्जव० ॥ ४ ॥

## लावणी ६६ वी.

जीव गेला तो जाऊंदे नारी केला नेम ना कधीं ढगन। बायकोस आवडवी दादला तूं मरशील मी सता निघन ॥ ॥ धृ० ॥ चाहील ती घरीं द्या हरीची लागेल तें पुरवीन बसल्या । चट्टी पट्टी कर धुंद फुंद राव कर मौजा आवडेल तसल्या । तूं क्षणभर ना दृष्टी पडशील मी आंधळा डोळा असल्या । उन वारा जरी तुजला लागेल तूं आमचा गडे अर्ध महान । जीव गेला ॥ १ ॥ वेळा ग लवंगा चिकण सुपारी पानें गंगेरी खाई विडे । नागमोडी बांगड्या हाता-वर्षी घाल करकरीत कुलपी चुडे । अस्सल पुण्याची तप-कीर आणवीन तुजसाठीं बांधून पुडे । रंगीत चौपट तुझी

खळाया पट देई छान गडे । तुज भवतालीं भरून कचेरी मला ठेंगणें दिसेल गगन । जीव गेला ॥ २ ॥ तऱ्हेबाज ती आधींच खिलाडु नवऱ्याच्या गोष्टी ऐकून । मिष दुखण्याचें करून निजली पडदे लावले मग चहूकून । अर्धे रात्रीं लटकेच मेली पांची प्राण धरले रोहोकुन । वरपंगी आल्हाद दाटे मग शरीर सुटे धरलें चहूकून । अशी वस्तुका आज भोगून घ्यावी दिवस उगवल्या लाऊं अगीन । जीव गेला तो० ॥ ३ ॥ खरंच निघल काय सता पाह्यला थेट घेतली मेतकळा । तव्हां तो तिजला झोंबूं लागला नार उघडून पाहे डोळा । बरा फिरे वचनाचा खंबीर भोगून घेशील सुखसोहळा । नामें विठ्ठल परशराम ह्मणे रिघा सारी सदर नित्य काळा । राम-कृष्ण गुणी रामा कासार शाहिरकीमधीं सदा मगन । जीव गेला० ॥ ४ ॥

## लावणी ६७ वी.

कल्पतरूच्या झाडांखालीं कर्महीन येऊन बसला । कल्पु नये तें भलतेंच कल्पी आपण आपला सहज फसला ॥धृ०॥ चैत्रमास कर ऐन उन्हाळा चारकोस मिळेना वस्ती । कर्म हीन त्या मार्गें निघाला तृषाक्रांत साहु न तस्ती । अडमार्गीं एक वृक्ष पाहिला । शीतळ छाया बहु नुस्ती । कल्पतरूतळीं निसूर बसला । श्रमे लागली तंव सुस्ती । अशा स्थळी जर

एक बावडी पाणि पिण्याला अस्ती । कल्पितांच तांधिं हौद जलाचे गहिरे सुंदर दिस्ती । असा अचंबा दृष्टिस पाहुन हर्षयुक्त होऊन बसला । कल्पुनये तें ॥ १ ॥ पाणी प्याया । आहे परंतु । भोजनास अस्ते कांहीं । तोंच पंचपक्वान्नाचे पात्र । आले बसल्या ठायीं । इच्छा भोजन करुन ह्मणतसे । नरम बिछाना नाहीं । अकस्मात तिथं छपरी पलंग । येऊन पडे लवलाहीं । अशा पलंगीं स्त्रीभोगाया रुपरंभे परि लाभावी । जे जे इच्छित । त्याहुन दुप्पट । तीच वस्तु त्यां भेटावी । कवळी कळि मदनाची पुतळी । भर ज्वानीचा मुसमुसला । कल्पुनये तें ॥ २ ॥ मनां सारिखें । दिलें हरीनें । भाराजिनी झाली जागा । रक्षपाळ जरि । भवतीं असतें । सरंजाम मजबुत पागा । मग मी निद्रा । निर्भय करितो । नार जोडा चित्तां जोगा । ह्मणत असें तों । फौज देखिली । हुकूम अह्मां कांहिं सांगा । जिकडे तिकडे रथ अंबाऱ्या । धन्य दैव आलें वोघा । कूच करुन जाऊं स्वदेशासी । सुखसंपत अक्षै भोगा । कर्मानें भ्रांतीस पाडिलें । अणिक पुढें सल्ला सुचला ॥ कल्पुनये तें० ॥ ३ ॥ असा अचंबा । पाहुन ह्मणाला । भुतचेष्टा गमती मजला । तांधिं अवघे तों । भूतें झाली । पाहुन मनीं बहु गजबजला । खातिल ह्मणतां । खाउन घेतले यम दरबारीं नवाजला । कल्पतरुंकडे । दोष मुळींना । भ्रांति भ्रमाच्या भ्रमिं रिझला । विठु परशरामी अर्थि दाखले । पर-

शराम पदवि दिलि त्याला । रामकृष्ण गुणि गातो रामा ।
छंद करून गाती मजला । येसुचे चित्तिं । सदैव श्रीपति ।
स्रवत माणिक मुक्ताला । कल्पुनसे तं० ॥ ४ ॥

## लावणी ६८ वी.

लष्करचें काय सुख सांगू गे तुज नारी । तुझे प्रीतिस्तव तें सोडून राहिलों घरीं ॥ धृ० ॥ आम्ही बाळ सराईत आधींच घोडे स्वार । जातांच लागला लष्करांत रोजगार । दिला बसाया सभल घोडा धन्याचा प्यार । पंगतीचें ताट दिलें मशाल खिजमतगार उमतीचा तवर केली झड घालुन तलवार । बक्षिसा मिळविल्या चवंरीन अबदागीर । दौलत मिळविली भर उंट दोन चार । मग आली तुझी सय जीव करतो हुरहुर । धन्याची रजा चौमहिन्याचा करार कुच मुक्काम आलों कसार बारी । केली गर्दी भिलानें दौलत नेली सारी ॥ लष्करचें० ॥ १ ॥ दोन चार पांघरुणें आला आंगावर लेऊन । नारीचे दिपले डोळे दिमाख पाहून । करी गोड गोड जेवाया समया लाऊन । करी खुशामत अर्जीनें पुढें उभी राहून । आज लाख मिळविले हरि बिसरला देऊन । बरे आले हेतशीर घरीं आपले जीव घेऊन । बाडिलांची अर्धी भाकर खाऊं धुऊन । आहेवपण भोगीन कपाळीं कुंकू लाऊन । गेली महालामधें दिला पलंग बिछाऊन । शेजारीं निजले । दोघे लई प्रीत लाऊन । भोगिला विलासें

समया लाऊन चारी । मज रुपासारखा जोडा असा बेवहारी । लष्करचें ॥ २ ॥ गेली रात्र उगवला दिनमान दुसऱ्या दिवशीं । लगबगून उठलीं होतीं चतुर नार हावशी । वांटिती साकरा जन नारीला पुसी । चुडदान दिलें अंबिका पावली नवशी । आंघोळीस पाणी ठेवून ऊन ऊन सरशी । लावा उटणें चौरंगावर होऊन सरशी । माथ्याला टकर कशाचें हो गुणराशी । दोन्ही खांद्याला दोन्ही घट्ट बांधल्या गरशी । वाकडा हात खुळा देह झाली झांजरशी । टांचांच्या गेल्या भेगा असून सुखवासी । रात्रंदिस होती घोडयावरती स्वारी । रांगडा मुलुख तिथें लढाई केली भारी ॥ लष्करचें० ॥ ३ ॥ पाठीशीं ढाल खांद्यावर बंदुक आमच्या । कंबरेला साज परदाळे सुऱ्या निमच्या । आम्हीं केली लढाई पाछायाशीं रुमच्या । करकरा निरपल्या जेव्हां चमाचम चमच्या । गोळयांचा वरसतो पाऊस अती सुमसुमच्या । रक्ताचे वाहती पूर नद्या रुमधूमच्या । लढणार असाम्या निवडक जाण आमच्या । तिथें पाणी मिळेना रुप्याचा एक चमचा । निसंग केली लढाई पेटलों भरी । सोन्याचे मंदिल तुरे दिले जरतारी । लष्करचें० ॥ ४ ॥ इतकें ऐकून नार हर्षली चित्ता । लष्करचा गडी एक याला जामीन होता । त्यानें मुळापासून सांगितली अवघी वार्ता । माथ्याला टक्कल पडलें मोळी वाहता । खांद्याला पडले वट्टे बादले वहता बादल्याची मोडली काठी याचे हाता । याला सकाळीच उठून मारती लाता ।

जेव्हां झाली लढाई बुणग्यांमधीं हा होता । पोषाक पळाला घेऊन येतां येतां । हेलपाटा पडला इथवर याच्याकरतां । नारीचें झिझलें कपाळ पायां पडतां । बाण्याची उचापत देऊं कशानें मी आतां । विठू परशरामाचे छंद असेग बेवहारी । भगलीच्या उडाल्या भगल भणभण सारी । लष्करचें० ॥ ५ ॥

## लावणी ६९ वी.

घरीं कळा खाऊ अवळा नसावी अशी । अवघा वेळ रागामधीं नागीण धुसधुसी ॥ धृ० ॥ घरीं खाया पियाला दया हरीची असून । किलवाणें हिंडावें जगांत चिंध्या नेसून । सदां केंस मोकळे वेणी घालिना बसून । लग्नाचा नवरा कांहीं बोले बसवसून । माहेरीं पळावें दोन चार महिन्यांनीं रुसून । ही वेडी कां शहाणी ह्मणावी तिशीं । अवघा वेळ ॥ १ ॥ देखण्यांत विद्री काळे दांत प्रतिमा । खांद्यावर टाकून पदर बोले बेतमा । दोघी चवघी सारख्या बसून करी नित जमा । आंगणांत चावडी घर केलें तीन शिमा । लग्नाचा नवरा त्याशीं बोले बेतमा । धांव दवडी वाहती पाणी वेडी धुमधुमा । गवळ्यास्तव नंदा घरीं दुधाळ्या म्हशी । अवघा वेळ रागामधीं जाशि नागीण धुसधुशी ॥ २ ॥ सोयरे स्नेही येतांच मनीं तरफडी । मायबाप भावास्तव करीतां कुळवाडी । घर स्वयंपाक म्हणतां मारी कपाळीं आढी । जेवाया पुरेना तिशीं ताटभर वाढी । मिष केलें

इिवाचें घेऊन निजे गोदडी । कर काम ह्मणे मी लेकुरवाळी नाहीं सडी । अवघा वेळ रागामधीं जाशि नागिण धुसधुशी ॥ ३ ॥ मूळ वर्ण शंभर अष्टल्या वरि । दिवस पालटल्यावर मग अत्यंत अर्जवकरी । जारिणी जारस सहित पुरुष मिळाले घरोघरीं । याकरितां योगी बसले गिरिकंदरीं । नामें विठ्ठलाचे कवि सुख पाहे शाहिरी । ह्मणे परशराम होय सावध पडशील फशी । येसूचे छंद कशी उचलपुच्याला ठुशी । अवघा वेळ रागामधें जाशि नागीण धुसधुशी ॥ ४ ॥

## बालेघाटी लावणी ७० वी.

मी लग्नाची बाईल याची हा तरी नवरा कसा । पांच तुह्मी परमेश्वर पारीं बसून याला पुसा ॥ धृ० ॥ फक्त हाळदीचा डाग लाविला केल्या दिवसापासून । लुगडें काय घेऊन शिणला खरें खोटें घ्या पुसून । सांड गांवामधीं फिरतो भांड रिकामटा असून । इकडील काडी इकडे करीना घर कसें चालेल बसून । हातात भाला ह्मणे जेऊं घाला उलटाच मजवर रुसून । तीन तुकड्यांचें एक मुंडासें तिनदां बांधी कसून । डावे कानावर ठेऊन पागोटें वर तीन पान खोसून ॥ चाल ॥ राहिना घरीं कधीं गोर गोंविली मज गाईची । पाहिना बरें मला, काय चोरी केली याची । धड माहेरच्यानीं अब्रु राखिली मेल्याची । तिनदां ग तिनदां जाईन ह्मणतो जीव झाला वेडापिसा । राहा-

याचा किती थडमाटा पदरीं असा । मी लग्नाची० ॥ १ ॥ ही काय ह्मणती भडवे पाटील हिचें कांहीं ऐकूं नका । खाया पियाला घरीं काय तोटा महामुर पैसा टका । तीन समले काज नित बांधुनि उडे दिल्लीचा शिक्का । जन्मा जुगाला जाईल आमच्या ह्या आधुर्लीला धक्का । दिनें देवडे चोळी लुगडें तिळभर नाहीं चुका । घर नंदाचें गोकुळ नांदे जणुं दुसरी द्वारका । खरें खोटें आधीं येऊन पहा मग तोंडावर थुका । दिल चाहिल त्या करूं आह्मी मौजा पाहून जळतील हिका ॥ चाल ॥ लागलें वेड हिला चळ भरला माहेरचा । लाविला वाहात झरा खेळ मांडिला संसाराचा । धड इचें येथें, तेथें जीव अवघा अंतरचा । काय बापाचें भूषण सांगती तिथें खडबडती पिसा । तोंड धुतां धड येईना चिपडें दोगा-लांतून एक वासा । मी लग्नाची० ॥ २ ॥ अग हा सटक्या बटक्या लटक्याच गोष्टी करां । भात भुनाया धड खापर मिळेना पहा तयाच्या घरीं । याची माय माझी सखी मावळण मायबापाच्या घरीं । तिच्या पोटीं हा ढंग जन्मला काय आठवावें तरी । गाडे घोडे गाई म्हैशी बैल आंदण चुरी । करतुकीचा कांदा तिनदां येतो आंगावरी ॥ चाल ॥ साहिना दुःख म्हणून मी आलें पारावरी । [illegible] मी तुमची धर्माची काय अन्याय घाला पदरीं । चुलीपाशीं हा बहादर होऊनी मजवरी बसवी ठसा । एक तिथें दहा का व [illegible], माझी दुर्दशा । मी

लग्नाची० ॥ ३ ॥ अगे चौपिढ्याची दौलत आमची आहे एकुणएक । इचा बाप तो आमचा मामा मागत होता भीक । बळेंच आणून यानें पदरीं घातली लेक । जन्मवांझुटी होईना पोटीं इच्या एक बाळक । आह्मावर भरत घर पोरानें अवघें बुडाविलें पीक । इजवर करितो दुसरी तिसरी स्पष्ट सांगतों ठीक ॥ चाल ॥ कसा तरीजोडा लग्नाचा, शेवटीं जाणून ही कदर । बालेघाटी उतली रंग रसा विठ्ठल नामें परशराम ह्मणे लावली कसा ॥ मी लग्नाची० ॥ ४ ॥

## लावणी ७१ वी.

धट्टा कट्टा तरणा ताठा कांहीं करीना चाकरी । कुटुंबघातकी तीन शेरांच्या नित उडवी भाकरी ॥ धृ० ॥ गांवाबाहेर आंत कोसावर गोसाव्याची अडी । जन्म आखाडा आक्षई कला नित ओढितो गुरगुडी । लाल डोळे करि हिरवे पिवळे घरीं येऊन बडबडी । खायापुरता गोड बोलतो भजभवतीं लुडबुडी । पोटीं सोन्याचें नाणें झाऊं तें उघडी पाघडी । नाहीं देव्हारीं देव राहिले कर्मांच्या परवडी । नग डागिने मोडून चारिले मानेमणी बुगडी । अवघे माहेराकडून, दिवस आबळीचे किती घालूं । आहाळण्या किती सोसूं याच्या । सुकून देह झाली माझी भालू । मी अबरूची ह्मणून गम खातें आपल्या घरच्या घरीं । दुसरी एखादी असती ओढून नेती पारावरी ॥ धट्टा कट्टा० ॥१॥ एका

पाटील सालस सबलस होऊन बोलती कशी । बिन दिवसाहून केली बायको रतिब लाविला इशीं । खासा पिया काय घरीं तोटा ठेविली फुला जशी । नग डागिने असून लेईना फुन नागीण धुसधुसी । दूध दुभतें घरीं खिल्लारें कळप गाई ह्मशी । चार पिढ्यांचा रोजगार आहे आमचा मोंगलापाशीं । काय घरीं संपत्तीला तोटारी । आह्मांला पैसा जणूं कवडी । घडविले नग दुहिरी इजलारी । आटविल्या सोन्याच्या लगडी । उठली दैवावर आमच्यारीं । रांड बेढंगी फार दुवडी । दुणे देवडी लेणें लुगडीं भरगच्चीचें जरी । दाटून चिंध्या ढुंगणीं लावून घागर घेते शिरीं । धट्टा कट्टा० ॥ २ ॥ घर सोडून नाहीं बाहेर गेला भगली विसनी जरा । शिराळशेटी गोष्टी सांगतो खरी पंचाईत करा । एक अंगावर झांजर शेला तो जातो चुरचुरा । चापून चोपून पगडी बांधितो जतन केली जरा । त्यावर फुळजी होऊन बसला शिपाई ह्मणे मी शुरा । तराळकीचा वयधा नाहीं पाटिलकीचा तोरा । बरव घरामधें ढेकुण पिसा कुठवर देऊं मी धिरा । इरीक झालासल मायबापाला पोटीं जन्मला हिरा । सांगशील दवलत वडिलांची । दाव मज पुरून कुठें ठेविली । असून तरी कां मजला अबदारी । गाय कशी गाळामंधें गोविली । आटोप वरदार तुझेंरी । भलाई माझी मज भोवली । सतीला नाहीं बत्ती हत्ती आहे शिंदळीच्या घरीं । लबाड जेवी तिनदां वाजवी तीन तीन फाके मारी । धट्टा कट्टा० ॥ ३ ॥ रांड भांड ही

सवरी झाला गवरी धुर्पे सदा । नित्य पारावर कुरकुर ऐकून जन हासती गदगदा । उठून चावडी धावून येते अवघा बेळ हा हुद्दा । नांव गाव वाडलांचा लौकिक उंच अबरूच्या पदा । बळें चौघांनीं पदरी बांधली नेऊन पहा एकदा । कोणीं पाहिला परी ओळखावा अकलेने हा खुदा । करून राहूं दुसरी, इचें नांव घेऊं न कदा । दर महिना देऊं चंदी मोजून इचा आमचा हा मुद्दा । चुकेना लग्नाचा जोडा पाई खोडा जज्य बोले । असा स्त्री पुरुषाचा झगडारी । वर्तणूक पाहून कवन केलें समजलें ते दोघे उभयतारी । धरून मणगटी घरीं नेलें । नामी विठ्ठलचे तोंड सवाई धौशा ठेऊन शिरीं । परशराम म्हणे टूम उतरली बालेघाटावरी । धट्टा कट्टा० ॥ ४ ॥

## लावणी ७२ वी.

सुइदोऱ्याला हयात असोंद्या तोचि इनाम मोकासा । निजकर्मीं रतनर झाल्यावर काय उणा मग त्या पैसा ॥ धृ० ॥ निजकर्मी रत होऊनि गणिका लोकिं तरोनिया गेली । सद्धर्मीरत होऊनि रामें जुनाट शीळा तारियली । नरनारी नामें धरित्री कायारुपें जधिसजली । वस्त्राभरणें तनु झांकाया सुइ सुमती आली । निजकर्म धागा नंढी तिचिया पहा वसला विवेकसा ॥ निज० ॥१ ॥ पोट भराया ऊभारिला ना तमाशाचा धंदा । महालमोकासे जहरी वळसे करितील आपुला बंदा । रुची

मनाची गायन करुनी आळवावे गोविंदा । चैनी खातर आम्ही राया पडलो नाहीं या फंदा । कर्म आमुचे हरिगुण गावें नाम न विकरीं परिसा ॥ निजक० ॥ २ ॥ विठू सारखा दाता अमुचा त्या कर्णाचाही बाप । दिधले त्यानें अचाट देणें कवण करिल त्याचें माप । चौसुट इनाम सहा गांवचा मोकासा बिनताप । पटवाऱ्याची सत्रागांवें सनद ताम्रपट छाप । अठरा गांवा हक्क जाशांचा दिधला आम्हा खासा ॥ निज० ॥ ३ ॥ गाण्या विरहित सुइ दोऱ्यावर नित्य मिळवुनिया पैसा । खातो पीता चैनी करितो घेउनि विठलाचा दिलासा । परशराम केवळ नामधारी नामाच्या करिघोषा । रामकृष्ण गुणी रामा गातो खुप सुरेल गायकसा । येसुचा छंद यशोदानंद धरिंकानीं कुंडलसा । निजकर्मी रत० ॥ ४ ॥

## लावणी ७३ वी.

धष्टपुष्ट हा लठ्ठ सुभाना घर सोडून कोठें जाईना । दिवसा रात्रीं कुरबुर करितो बऱ्या दृष्टीनें पाहिना ॥ धृ० ॥ आजवर होतें लहान मजला कळूं लागलें आतां । कोठवर सोसूं तस्ती मी याशीं न ऐके, वर्जिता । खाया पियाचे दिवस माझे आले कमळन मी हता । अवघा वेळ हा संसार न राहे घडीभर रीता । अस्तूर खाउन निसुर बसतो कांहीं काळजी ठाविना । एक ज्ञातामध्यें आंगठी घालुनी तिजवर कोठें माईना । धष्ट पुष्ट० ॥ १ ॥

संसाराची राळ मांडिली फिरे नित भगला भवता । गोड घासा-
वर नजर याची न पाही पुढल्या हिता । ही काय सांगे लुतरी
कुत्री वसवस करती सदां । बहुता परी सांगतों परंतु आमचें
ऐकेना कदां । महिन्यांतून जाती पळून तिनदां दुसरा न सुच
धंदा । माहेरचा इला ओढा लागला पुरता पुसून घ्या मुद्दा ।
इजवर करूं आम्ही दुसरी बायको मोजून शेर देऊं जुदा । पडून
राहावें उगीच इणें करूं नये अमर्यादा । रांड भांड ही सवरी
झाली कांहीं अक्कल घेईना । धन दवलत घरीं महामूर असतां
लेणें लुगडे लेईना । धष्ट पुष्ट० ॥ २ ॥ हा काय सांगे तुटका
लटका दवलत कोठें तरी आहे ? । पाणी पियाला तांब्या न
मिळे खोटा बसून राहे । नग डागिने अगदीं मोडले अजून धरीना
सोय । एक कानावर पगडी ठेऊन दर्पणीं मुखडा पाहे । जन्मा-
पासून आइतखाऊ कवडी जोडतां नये । मज भोवती जें रत्न
जन्मले झाले निहाय माय । हा पूर्वींचा वैरी बाहेरी पळभर
सुख देईना । जीव घेईल तरी घे एकदाचा दुःख मला साहीना
धष्ट पुष्ट० ॥ ३ ॥ स्त्री पुरुषाचें भांडण होतां आप आपले
घरीं । दृढ निश्चय पतीचें चरणीं ठेऊन राहे दुरी । कल्पना मनां-
तून निघून गेल्या बहु झाली हावभरी । आधींच देखणी त्यावर
गाहिना घालून नानापरी । एकचित्त उभयता होऊनी नांदूं
लागले घरीं । नामीं विठ्ठल परशराम गातो कवन कुसरी ।
सखारामाची तोड ऐकतां आल्यामाति होईना । दिल कुल बसले

जिकडील तिकडे सन्मुख एकही येईना । घष्ट पुष्ट० ॥ ४ ॥

## लावणी ७४ वी.

दुघड नार नवऱ्याला शिकवी म्हणे वेगळे निघा । जहामर्दी संसार दाविते करून तुम्हाला बघा ॥ ध्रु० ॥ जसा भाड्याचा बैल राबतो देह अगदीं झिजली । तुमच्या जिवावर एवढी द्वारका केलें घरदार दोमजली । आवस पहाट नित्य उठूनया शेजभाज त्यजिली । रूपासारखा जोडा तुझ्या मी आहे नाजुक बिजली । इतकें करून नाहीं सत्ता कां अक्कल थिजली । तुम्ही चाकर मी बटीक फुकाची दैवदशा निजली ॥ चाल ॥ कारभारी तुमचा भाऊ कुलकुला घरांत जाऊं । तिजपुढें काय मी माऊ । अशी तस्ता कुठवर साहूं । केली खुलवर शेवटीं मुक्रर देतील दगा । कर्जाचे डोंगर दावितील करून वर त्या बगा । दुघड नार०॥१॥ पाहिल्यापासून केली कमाई कवडी कवडी पुसा । तोडा सुतळीचा वांटून घ्या तुम्ही बरोबरीचा हिस्सा । नग डागिने घडवा मजला रोकड हुंडी पुसा । माझ्या माहेरीं जाऊन राहूं बिन घोरानें असा । परगणे पाटिल तुमचा सासरा जिकडे तिकडे ठसा । राबणार राबतील शेतां, स्वस्थ चावडीं बसा ॥ चाल ॥ बायकोची अक्कल खोटी । जिवीं धरून बांधल्या गांठीं । पहा केवढी कळीची काठी । भावाभावांत पडल्या तुटी । वेगळेपणाची हौस मनामधें आगीन करी धुगधुगा । दुघड नार०॥२॥

अशी मनसुभी वांटून घाटून आडला आवत्या गडी । लटकीच कुरबुर बायको झोडिली घालुन बसला अढी । रागें भरून गोठ्यामधें निजला हातीं पांई घोंगडी । आला बाहेरुन भावा ह्मणतो कुठें गेल्या धांगडी । नका भाऊजी लाऊं कुरकुर करीन तलाव बावडी । घ्या अक्कल व्हा शाहाणे माझे काय भिजतील तीन खडी ॥ चाल ॥ मला होईना तुमचा धंदा । कुठवर मार खाऊं तिनदा । कोणी आड येईना या चिंदा । अशी घळमळ पडली मंदा । सारी रात्र असा विचार केला धरिला दाहोनि फुगा । नांदत्या घराला विभो लावला पिळ पाडून केला भुगा । दुघड नार० ॥ ३ ॥ चवघांनीं वांटणी करून बरोबर वांटा करुन दिला । अर्ध्या आडामधें भरून आंबाडी सासुरवाडी गेला । तेच सालीं खरपाड पडलें शेतामधें तोटा आला । पट्टी वारी बिलकुल पैसा अवघा वाटे लाविला । खायावांचून बैल मेले कर्जबंदी झाला । चलतीचे सोयरे धायरे कोणी पुसेना त्याला ॥ चाल ॥ झाली दशा आली अवकळा । डोइं चिंध्याच्या झिळमिळा । गेला विसरून टाकमाटिळा । देह वाळून झाली पिळा । विळा घेऊन मग करी मजुरी दोहींकडून तुटला लगा । दाणे खाऊन करी गुदराण दांताच्या बसल्या शिगा । दुघड नार० ॥ ४ ॥ बायकोच्या अक्कलेनें झाली थारथोरांची दशा । टऊर वेगळे सोडून निघती मायबापाची आशा । गेला शरण भावासी आपली पुरती फिटली निशा । केली पहिल्याहून चढी

उतरला डोळ्यांवरला नशा । एक जोडी पर दैव दहांचें हाजा उडवी परखुशा । जिकडे तिकडे मान लौकिकाच्या उशा ।।चाल।। नामीं विठ्ठलाचे छंद गीति । घर ऐकून मूर्खा चित्तीं । नवशिकाची किंमत किती । श्वानास भिईना हत्ती । परशराम येस्तू निवडून दावी हा मोति हा फुगा । तीळ नाहीं म्हणून कोळ ठेविलें घरांत घालून आंघा ।। दुघड नार० ।। ५ ।।

## लावणी ७५ वी.

प्राणसख्या छळिशील किती तरी । नको होऊं अधिर क्षणभरी ।। धृ० ।। येशिल किंवा न येशि ऐसें । नाहीं समजलें पुरतें । परि हें लक्ष तुझ्या वरतें । अंगणांत उभी मी राहून । मार्ग तुझा धरितें । आंत बाहेर महालीं फिरतें । कसा येशील लपून छपून । अशि चिंता करितें । कुणि पाहिल अब्रुला मरतें ।। चाल ।। हा निश्चल गुणि चातुरा । ममाजुं घरीं दे फितुरा । अजुनि ह्या पहिल्या महरा । असतिल जागे कुणि शेजारा । हे भय अंतरीं । प्राण० ।। १ ।। समाचार ना घेशिल म्हणून । आज रागें भरलें । तूं न पुसाशिल रितें भरलें । तुझी खूण तुजला ना समजली । या करितां झुरलें । गळालें मांस हडें उरलें । मीच बोलते उलटी तुशी । कां मौन धरलें । बरोबर करतां मन हरलें ।। चाल ।। निशिदिनीं करावी चिंता । कळले सारे गण गोवा । निष्ठूर तुझीरे ममता । नाहीं कुणाचें कोणी

अखेर । हें कळलें अंतरीं ।। प्राण सख्या० ।। २ ।। स्त्री होऊन मी कशीरे निश्चल । धैर्यवंत केवढी । तुज अति विषयाचि आवडी । भोग विलास करून मशीं । परी रात्र थोडी । पाहशी नित्य नव गोडी । दहा-द्वारें पुजिशील जेव्हां । मग तुजला सोडी । पुसते खूण सांगा एवढी ।। चाल ।। कर विवेक पुरतां राया । जन्मला न दूषण द्याया । जन टपून । तुज निंदाया । झाली सामसुम येइ आतां । येई सख्या झडकरी । प्राण०।।३।। कुडी आत्म्याची प्रेम कथाही । खूण मनां पटली । दहाद्वार दशेंद्रियें ह्मटली । माया नटवी आत्म्यापाठीं लागाया नटली । देखतांच कुडीनें हटली । नामें विठ्ठल कविच्या छंदे । भ्रांत मानींचि हटली । परशराम कविता उटली ।। चाल ।। येसु महादुची जोड अजब । रामकृष्ण रामाची लकब । करि शास्त्र पाहुनी कसब । वावी गांवची धजा फडकली । चहु मुलुखांवरी।। प्राण सख्या० ।। ४ ।।

## लावणी ७६ वी.

पतिव्रता खुण करून पतीला गुंफून दिधला तुरा । पर पुरुषीं जर रत मी होईन तरीच सुकेल चातुरा ।। ध्रु० ।। पर मुलखीं जाऊन राहिलां बारा वर्षें जरी । नाहीं सुकणार तुरा जराभर हीच प्रतिज्ञा खरी । ऐसें ऐकून नारीचे शिपाई हर्षले अंतरीं । आह्मी जातों लष्करीं, कामिनी खुशाल रहावें घरीं । चार कामें

तुज सांगून जातों निक्षून हृदयीं धरी । बिन पैशाविण महाल बांधून बाग लाव । रसभरी: पुरुषाविण स्त्री पणूंन आण एक आह्मास रूपगुणपरी । पुत्र पतीविण पैदा करून ठेव आपलें मंदिरीं । असें सांकडें घालून गेला फंदी फाकडा शुरा । रात्रं दिवस काळजी नारीला चैन पडेना जरा ॥ पतिव्रता खुण०॥१॥ नवगेंदाचा तुरा मस्तकीं फुलाशीं फुल दाटलें । हुजूर चाकरी राजापाशीं कांहीं दिवस कांटले । ताहादार नित्यनवा सुके न अग्नी लोळ तुटले । कुठून लावितो नकळे शोधितां सहा महिने लोटले । कांहीं तरी किमया असेल पराक्रम आश्चर्य वाटलें । वर्म पुसाया त्यासी एकांती राजानें गांठलें । तो ह्मणे आमची नार सती घरीं सुवर्णमुशीं आटलें । तिचें ब्रीद हें लावून आह्मीं चार मुलुख खेटले । ऐकून राजा चकित झाला वाण जिव्हारीं पुरा । तुरा सुकेल तरी नक्षा राहील यावर आपला कुरा ॥ पतिव्रता खुण० ॥ २ ॥ पलंगाची चाकरी शिपाई जवळ हुजूर ठेविला । पतिव्रतेचें व्रत भंगाया प्रधान पाठविला । शहराबाहेर मुक्काम करुनि कागद भेटविला । गोष्ट लावितां तिशीं पतीचा हुकुम आठविला । बाग महाल जर बांधून देशील तरी जीव वाटविला । दाशी हातीं संदेशा मनसुभा थोडक्यात आटविला । बाग महाल त्यानें सहा महिन्यांमध्यें तयार करून ठेविला । आपल्यासारखी सजउन दासी तिशी रंग लुटविला । पतिआज्ञे-स्तव असत्य भाषण कधिं बाधेना जरा । पतिव्रता व्रत राखून

अपुलें अभंग अक्षई हिरा ।। पतिव्रता खुण० ।। ३ ।। कुच करून मग प्रधान आपल्या नगराशीं जातां । सर्व निघाली गवळण होऊन कोणा न कळतां । पत लाऊन तिनें पती भोगिला पाहून दिस चौथा । पोपाख खंजिर खूण मागितली लाऊन मोह ममता । करून साज पुरुषाचा निघाली परतून घरीं येतां । खंजिराशीं लग्न लाऊन आणिली दुसरी दुहिता । नवमाहिन्या घरीं पुत्र प्रसवली आनंद बहु चित्ता । वर्तमान लिहून पाठविलें झाली मूलवार्ता । पत्र वाचितां हरुष झाला मग वांटी साखरा । आज्ञा मागे बहु युक्तीनें जातों आपल्या घरा ।। पतिव्रता खुण० ।।४।। दासी भोगून प्रधान थकला विनोद राजा करी । नाहीं सुकला तुरा जराभर नार सती ते खरी । तलफ चुकऊन पोषाख दिधला खुप उमदा भरजरी । यशाचा शिरीं तुरा लाऊन लय घेऊन आला घरीं । चार कामें ही करुन ठेविली वाईट अथवा बरीं । पोषाख खंजिर खूण दाखविली याला साक्ष हरी । दोघी बायका आणि पुत्र प्रीतीनें बसून अंकावरी । लाखांमध्यें कोणी विरळा, असली नाहीं घरोघरीं । नामीं विठल परशराम गुण येसू गातो शिरा । रामकृष्ण रामाचे तोंड हे ऐकून नवशीक झुरारे ।। पतिव्रता खुण० ।। ५ ।।

## लावणी ७७ वी.

कोणि विरळा एकादा राहिल संभाळून अबरू । इषकाचे

पायीं सजन मारिला गबरू ।। धृ० ।। एक शिपायाची रूपसुंदर नाजुक अबला । परि कर्मनिष्ठ घरिं प्रपंच अगदीं दुबळा । चहुकून उणा संसार दुःखाचा उभळा । हे तसे परी दोर्हानें धरून धीर सबळा । एक पुण्यपरायण साधु शेजारीं होता तयाचें ऐका । तो भजनशील रागिणी राग गायनांत केवळ पक्का । सत्काळ घालून अहोरात्री लाऊन हरिभजनाचा ठोका । त्यासी निरऊनया स्त्रीला गेला रोजगारा निघून परमुलखा । बारा वर्षें राहिला नाहीं पाठविली खबरू ।। कोणी विरळा० ।। १ ।। त्या साधुपायीं निश्चय दिसेंदिस आगळी । शिकवितां कविता गायनकळा आली आगळी । पती यावा सुखाचा ह्मणून देह उगळी । अंतरीं ध्यान लावी जशी बगळी । तुळशीवृंदावनीं बसून अर्धे रात्रीं गायन करी । रागिणी राग मधुर सुर कंठ कोकिळापरी । एक सिंहल देशींचा मृग अति सकुमार अंश ईश्वरी । तिचें गायनास्तव नित्य भुलून एकाया येतसे घरीं । दररोज मुखांतून लाल लागला उभरू ।। कोणी विरळा० ।। २ ।। एक लाल पृथ्वीचें मोल असे जन म्हणती । दोन विकले त्यांतून नाहीं पैक्याला गणती । पति यावा सुखाचा ह्मणून कारितसे खन्ती वाट पाहतां पंचीप्राण लागले तंती । बारा वर्षांची मोहिम शिपाई आले खजिना भरून । तिथें नाहीं झोंपडी महाल पाहतां नेत्र गेले फिरून । इनें कुठून मिळविला पैका वाटतें बदकर्मी शिरून । चला पाहू चरित्र कसें, राहिला आधी मनामधें धरून ।

ही निर्मळ मनाची केवळ सुखाचा आगरू ॥ कोणी विरळा० ॥ ३ ॥ पति आले हर्ष अंतरीं पाहून जीव रिझला । उपचार सकळ साहित्य प्रीतीनें पुजिला । माझी विनंती ऐका नित्यनेम आहे मजला । घ्या क्षणभर निद्रा म्हणतां लटकेच निजला । तिरकमान घेऊन उशा पाहतसे डोळा । नारीनें विणा घेऊन गातसे वर्णून हरीच्या लीला । तो मृग आला ऐकाया नित्याची धरून आपली वेळा । पायांचे साज लव्हाळले वाजल्या फरसबंदीच्या शिळा ॥ किचकिल्यातून सोडिला जसा वाघरू ॥ कोणी विरळा० ॥४॥ हृदयांत भेदला बाण जिव्हारीं लइसा । मूर्च्छागत पडला लाल मुखामधीं तैसा । नारी गायन पुरतें कर बोलिला ऐसा । मग सुखी मी जाईन निजधामा कैलासा। गायन ऐकून प्राण सोडिला इच्छा धरून । धड शृंगावर टाकितां नार उभयतां गळें मरून । विठू परशराम ससूचे तोंड अति गोड रसिक रंग भरून । रामकृष्ण रामाचे छंद ऐकतो चतुर जिवीं धरून, वावी नांव गांव धनवटांत अखाडा जबरू ॥ कोणी विरळा० ॥ ५ ॥

## लावणी ७८ वी.

मोत्याच्या झालरा कळस तुझ्या न्हाणाच्या मखरा । उभी राहून लाजून बोलसी, किती करशील नखरा ॥ धृ० ॥ वय नाहीं पण न्हाण आलें तुज रंग गोरा झुरका। अटकर बांधा

लहान खुजी भुईवर शालूचा झुरखा । पाईं पैंजण वाजती चालशी हंसगती झरका । अलंकार नग मंडित भवती सख्यांचा गरका ॥ चाल ॥ शिरी बांधून मुंडुळ्या फूलांचे झोक । हिरवे पातळ भरजरी पदरीं जरी झोक । तबकीं पानें गंगेरी विडांवर शोक । रंग रूप अनुकुळ सखे तूं पूजिलें शिव शंकरा । मोत्याच्या झालरा० ॥ २ ॥ भर नवतीमधें धुंद बुंद दोन्ही जोबन वर चढले । कुरळ केस मोकळे सडक तुझे पाठीवर पडले । बाजुबंद बाहुल्या चुडे हातीं गुजराथी घडले । लेऊन चंदन उटी आंतुन गोरेपण िवडिले । मुख हळदीनें उटलें नाकीं नथ जडाव । दिवसनादिवस तुझ्या भर जानीचा चढाव । स्वर ऐकुनया कोकिळा घेती वनीं थडाव । जवळ कस्तुरी असून भटकती मृग सोडून अखरा ॥ मोत्याच्या झालरा०॥३॥ पड्‍पोस पितांबर आणवी अवरूच्या गतीं । उर झांकून न्हायाला बससी चौरंगावरतीं । चौभोताली थाट सख्यांचा ना दिससी पुर्ती । सौभाग्याचें मळवट कुंकानें भरती । वर अक्षता टाकिती येऊन चढोवढी । कटी बारीक अती नाजुक फुलांची छडी । घे आशीर्वाद होय पुत्रवंती तातडी । ओटी भरणाचा गजर पुढें आहे द्रव्याचा विखरा ॥ मोत्याच्या० ॥ ४ ॥ चार दिवस सुख सोहाळे भोगून थाटानें सजली । भर नवतीची हवा सख्या घ्या आज तिसरे मजलीं । चौभोताली लाऊन समया मधें चमके बिजली । विषयसुखाची आवड उभयतां रत होऊन निजलीं ।

नामीं विठ्ठलचे छंद तऱ्हेतऱ्हेची धरण । जनचतुराईवर खुषी दुधाला मुरण । स्वर ऐकुन झाले शर्थ शत्रूचें मरण । परशराम गुणी येसू गातो नांवाच्या बखरा । मोत्याच्या० ॥ ५ ॥

## लावणी ७९ वी.

आजच आला पालव मजला किती जावा झुरशी । दिवस पांचवा ऋतु संपादन मग जा गुणराशी ॥ धृ० ॥ कवळी कांत सकुमार कळी फुल नाजुक जासूदी । वयासारखा जोडा तुह्माला बे वहार फंदी । पत्र आलें त्यावरून तयारी केला जीनबंदी । येईन बरोबर म्हणलें राहू घरीं कशी सरसुदी । आजच आला पालव मजला मधी आडवा दंदी । दर महिन्याची पाळी ठावकी माझीच मज संधी ॥ चाल ॥ अडचणीचा ऐसा प्रसंग । कसं करूं । वर्जितां होईल मन: भंग । कसं करूं । हा विचार करी मशीं दंग । कसं करूं ॥ चाल ॥ रत्न पोटींच्या पोटीं जिरतील दोषाच्या राशी । घेऊन मस्तकीं भोगून जातां विषयाची बरशी ॥ आजच० ॥ १ ॥ करून तयारी जाते वेळीं तुह्मी मजला पुसलें । शिवतां नये ह्मणून माजघरामधें आडमोरी बसलें । बाहेर कशी येऊं लाज्जित होऊन मनच्या मनीं फसलें । चौघामधें नये सांगतां ह्मणाल कीं रुसलें । ऋतुवंती कशी टाकून जातां काय तुह्मां दिसलें । व्हा शहाणे आज कंबर सोडा चार दिवस फसले ॥ चाल ॥ मजपासून वेगळे निजाल । कसं करूं । रागांत येऊन मनीं खिजाल । कसं करूं ।

कीं परनारीवर रिझाल । कसं करूं ।। चाल ।। तीन दिवस कसे जातील येवढे निघून झुरझुरशी । कळवळे माझा प्राण तुझ्या-स्तव लागली चुरचुरशी ।। आजच आला० ।। २ ।। प्राणसख्या मजविणा तुह्माला कशी येईल निद्रा । विषयसुखाच्या आल-सान्या माझ्या तीवर तपे रुद्रा । कसा वैर साधिला विटाळें आज दैवीं भद्रा । सेवा करितें हृदयीं लाऊन तुमच्या पदीं मुद्रा । करीन भुमीवर शयन घालून खालीवर पदरा । मुलाम नथणी जड मज झाली नाकाच्या छिद्रा ।। चाल ।। उतरलें वदन हिंपुटी । कसं करूं । ठेवी गुडघ्यांवर हनुवटी । कसं करूं । प्रीतिमधें पडतील तुटी । कसं करूं ।। चाल ।। पतीसेवेमधें अंतर पडलें किती जीवा झुरशी । भिऊं नको वल्लभे स्वस्थ रहा वृथा खेद करशी ।। आजच आला० ।। ३ ।। टवटवलें मुखवदन नारीचें दिन चवथ्या दिवशीं । उष्ण पाणी स्नानास आणविलें लावी अत्तर केशीं । चौरंगावर न्हाया बसली भोंताल्या दासी । तेल फुलेल गंध सुगंधी आधींच पती हौशी । न्हाऊन उठली साज करी पुढें ठेऊनसा आरशी । अस्ताचळीं पावला गभस्ती मग झाली सरशी ।। चाल ।। तबकीं पानाचे पुडे । राजसा । घाली करून मुखामधें विडे । राजसा । ऋतु बहार नवती रंग चढे । राजसा । आंगसंग करी निसंग होऊन किती कवळून धरशी । नामीं विठ्ठल परशरामाचे छंद ऐकुन झुरशी ।। आजच आला० ।। ४ ।।

# लावणी ८० वी.

आजच झालें दुरसी कशी येऊं ? मधीं आडवी गंगा । चार दिवस अंतरलें सख्या तुमच्या सुखसंगा ॥ ध्रु० ॥ सरंजाम खुप कर्डा कट्टा सरपागा घरची । काय तुम्हाला कमी खजिना सर्वे महामूर खर्ची । सुतारनाल बाणाच्या कैंच्या निशाण लगीं जरीची । जरीपेच नैच्या झर झर अस्सल बेदरची । गंगे पार दिल्हे डेरे परस्थान मोहिम आहे दुरची । येईन बरोबर कृतानिश्चय इच्छा अंतरची ॥ चाल ॥ साधिला विटाळें वैर । कसें करूं । गेले उतरून बुणगे पैल । कसें करूं । झाली तोफखान्याची फैर । कसें करूं । ह्यास्तव मन आड ना विहिर । कसें करूं ॥ चाल ॥ शरीर कोमेलें चंद्र उतरला घाम आला अंगा । अर्जी करा तुम्ही मर्जी पाहून सख्याला सांगा ॥ आजच झालें० ॥ १ ॥ व्रत उद्यापन श्राद्ध लग्न प्रयाणें शुभ पाहणें । ऋतुस्नान स्त्री झाल्यावरती जाणती नर शाहाणे । आजच आला विटाळ फळतें आकाशीचें केणें । उघडें करून सांगतां नाहीं मन जगीं लाजिरवाणें । दासी हातीं संदेसा स्वचित झाले चार दिवस राहणें । शुद्ध मंडळ नक्षत्र देखिल्या कृपा करून पाहणें ॥ चाल ॥ दीपकाविण मंदिर जसें । कसें करूं । घरवाडा भयंकर दिसे । कसें करूं । लागलें प्रीतीचें पिसें । कसें करूं । झालें चंद्र चकोरा असे । कसें करूं ॥ चाल ॥ वियोग याचा न

साहे पळभर काळिज दोभंगा। एक एक घडी युगा समान जावी ठाऊक श्रीरंगा ॥ आजच झालें० ॥ २ ॥ शाल दुशाल पलंगीं बिछाने तुम्ही आवरून ठेवा। अस्पर्शांचा स्पर्श होईल पुढें समया लावा। स्नानाविण नाहीं भोजन करितां उपहारी मेवा। झारी उदकाची शीतळ भरून दासीहातीं आणवा। चार दिवस अंतरलें आतां मी स्वामी पदीं सेवा। झरझर जातील दिवस निघून तो पाहीन गुणी रावा ॥ चाल ॥ मृगाक्षी चुकली हरण। कसें करूं। पहावया पतीचें चरण। कसें करूं। सुखशयनीं कधीं अनुसरन। कसें करूं। घडोघडी होतसे स्मरण। कसें करूं ॥ चाल ॥ अलंकार नग काढून ठेवा आपल्या बोसंगा। एक्या वस्त्राविण निद्रा करणें आली या प्रसंगा ॥ आजच झालें० ॥ ३ ॥ चवथे दिवशीं प्रातःकाळीं लगबगून उठली। गौर वर्ण तिची कांचन कांती जशी हवई सुटली। उंच मोलाचें तेल उदेलें सर्वांगी उटली। कबरी भार शिरीं करून मोकळे विंचरून एकवटली। आणा पाणी स्नानाशीं सख्यांनीं एकीपुढें एक झटली। सभोंताली थाट सख्यांचें खूण मुद्रा पटली ॥ चाल ॥ पडदणीस पितांबर निका। भरजरी। चवरंग मांडून नेटका। त्यापरी। फार उष्ण पाणी घालूं नका। मजवरी। तनु कोमल लागेल ढका। राहा दुरी ॥ चाल ॥ नूतन वस्त्र कटा कसून नेसली सरसाऊन भांगा। मुक्त लगट कंचुकी दाटली आली कमळन

रंगा ॥ आजच० ॥ ४ ॥ चवकी बसाया रत्नखचित तळीं घालून बरवंटी । जड जवाहिर शृंगाराचा आणविली पेटी । दर्पण ठेऊन पुढें साज करी जशी बिर बाहुटी । कुंकुमरेषा निढळीं बारिक, लावी चंदन उटी । आनंदमय चित्तवृत्ति होतसे हर्षयुक्त पोटीं । नार वाहनीं बसून येतसे सख्याच्या भेटी ॥ चाल ॥ केली कायावाचापासून । पदपुजा । उभयतां बोलती हांसून । हितगुजा । निज अंकीं सख्याच्या बसून । करी मजा । नामी विठ्ठलाचे छंद करून खुप हजा ॥ चाल ॥ परशराम म्हणे असाच असूंद्या अक्षयी दिल चंगा । रामकृष्ण गुणी रामा कासार लाऊन ब्रिद्‌चंगा ॥ आजच झालें० ॥ ५ ॥

भाग दुसरा समाप्त.

# परशरामी लावण्या.

## भाग ३ रा.

---

### लावणी ८१ वी.

पोट पिकेना ह्मणून बांधिलें भाराभर गंडे । बाई मी दुःखी फार घोर जीवा वाऱ्यावर हिंडे ॥ ध्रु० ॥ आधींच वर बिजवर पतीला हिणवर मी झालें । सर्व सुख अनकूळ न्हाण बिन दिवसाविण आलें । आज पावेल हरी उद्यां पावेल अशीं वर्षे सात न्हालें । उदास झालें मन माझें मी कर्महीन ताले ॥ चाल ॥ पति भोळा शंकर जैसा । मजवरीं प्रीत करी लईसा । घडोघडी देऊन दिलसा । खर्चुनिया महामुरसा पैसा । कोणीं दोष लाविला असेलगे । ह्मणून मनांत मी भ्याले । पंचाक्षरी आणून आधीं । घरबंधन मी केलें । लेकाची माय पाहून गे तिच्या बाजेजवळ गेलें । तिशीं ना कळतां चोरून गे जावळाचे केस आणिलें । केलें टाणेटोणे सारा । पाहिलें करून झाले स्वोरी । मज बरोबरीच्या पोरी । त्यांशीं कसा पावला हरी । पुत्रवंत्या घरोघरीं । उभारती विजयध्वज झेंडे ॥ पोट पिके० ॥ १ ॥ फळ पुष्पाविण झाड नसे नाहीं सुख संसारीं येऊन । असें वाटतें

सख्या मरावें पुडी जहराची खाऊन । वेरूळांत बैनगंगा उभयतां आलो जोड्यानें न्हाऊन । करूं नये ते उपाय केले । अधिक तस्ति साहून ॥ चाल ॥ सुप हलव्या देव देव्हारे । घुमविले आणून घुमारे । पंचरंगी रेशीम कोरें । ठाईं ठाईं बांधिले दोरे । केली कचेश्वरीं सेवा । एक संतत सहा महिने । तुळजापुर माहूरचें । सांगती खडतर ठाणें । तिथीं म्यां वाहूं केलें । जरी चोळी पातळ पंचामृत हें बोणे । आलें उलटून माघारीं केलें । कोलापुरीं देणें ॥ चाल ॥ महादेवी वाहिली गुढी । तेथून आलें जेजुरगडीं । पुढें कान्होबाची मढी । चळ भरला झालें मी वेडी । केंस थोडके देव पूजिले माळावरले धोंडे ॥ पोट पिकेना० ॥ २ ॥ सर्वांगी डोळे पाहून पायाकडे झुरतें मोरापरी । एक लेंकरावांचून पक्षी निढाळ वृक्षावरीं । नागबळ नारायणबळी केली जाऊन त्रिंबकेश्वरी । हरीहरेश्वर भीमाशंकर पूजिला ब्रह्मगीरी ॥ चाल ॥ कोकणची बजराबाई । महालक्ष्मी आणि नवलाई । वाळकेश्वर मंमादेवी । स्वकष्टी पाहिली पाई । जाहाजांत बैसुनियाबाई द्वारकेस गेलें । घेतल्या तप्त मुद्रा । पुढें गोमतीस आलें । ठाकुरांत ठाकुरजी । पुष्कर तिर्थीं मी न्हालें । आलें गोकुळ मथुरा क्षेत्रीं । हरीद्वारीं मन धालें । तळीं मुक्तेश्वर तो नीट रामघाट सोमरघाट । ब्रह्मवर्त चित्रकोट । पुढें प्रयाग काशी नीट विश्वनाथ केली गया अयोध्या वैराग्यपण दंडे ॥ पोट० ॥ ३ ॥ बद्रिकेदार बद्रि-

नारायण केली कपिलगंगा । कपिलेश्वर पाहिला कलकत्ता झीज साहून आंगा । जगन्नाथीं चढविल्या इंड्या दोष जाती अंगा । सोमनाथ सोरट चापुनी कसत लाऊन संगा । नागनाथा वैजनाथा । पाइ पुजून ठेविला माथा । एक बाळक व्हावें या अर्था । परदेश घेतला माथा । गिरींवरी व्यंकटेशा । मनीं भाव धरून नामिले । लालची धनाचा तो । त्याशीं धन वाहूं केलें । नाहीं बायकांशी दर्शन । स्वामीकार्तिकी जन बोले । सेंदुरातळीं राहून मनच्या मनीं नवशिले । येऊन पंपा सरोवरी । श्रीरंगपट्टण कावेरी । मलकार्जुन रामेश्वरीं । पाहून बारा मल्हारी । पंचवटीमधें गुंफा पाहिली रामाचीं कुंडे ॥ पोट पिकेना० ॥ ४ ॥ सप्तशृंग तापी ही नर्मदा उज्जनी क्षिप्रातिरीं महांकाळेश्वर करून परतलें मन माझें हावभरी । ओंकार मांधाता अराधून तिर्थें केलीं सारीं । राक्षसभुवनीं शनी पुजून मग आलें पंढरपुरीं । आधीं चंद्रभागा न्हाऊन । भेट पुंडलिकाची घेऊन । उभी गरुडपारी राहुन । सावळा अंतरीं ध्याऊन ठेविला भाळ चरणीं । भेटले विठ्ठलाशीं । फळ प्रसाद घेऊनया । घरीं आले विश्वासी । पावला देव मजला । झालें बाळग नवसासीं । त्या सुखाशीं काय वाणूं । पती केवळ गुणराशी । दैवाची अशी मी गडे । लेंकरूं घेऊनया कडे । प्रीतीनें उभी पतीपुढें । जन्म जुगी नांवा चढे । बिठू परशराम म्हणे शुसत नाहीं पालाचे इंडे ॥ पोट पिकेना० ॥ ५ ॥

# लावणी ८२ वी.

गर्भ राहिला मला आतां बाई हरला अवघा शीण । जन्मीं आल्याचें सार्थक झालें फिटलें वांझपण ॥ ध्रु० ॥ तपीं राज बाई कष्टीं फळ असे बोलती अवघेजण । प्रचिती आलें माझें मजला ग्वाही देतें मन । पहिल्यानें मशीं गर्भ राहिला नकळे अंतर खुण । मळमळ सुटली भवभव करी आंगीं, थरथरलें जोबन ॥ चाल ॥ गर्भाची छाया पडली । जाणवतीं चिन्हें पुढलीं । सर्वांगीं लाली चढली । तंग चोळी आंगांत गढली । मी अनाड कांहीं कळेना गे समे देह जड पडली भ्रांती । लेंकुरवाळ्या पुरख्या गे ये । त्याशीं पुसलें एकांतीं । त्यांनीं निज गुज सांगितलें गे ये । मग झाली मनशांति । वाटला हर्ष अंतरीं । एक मास लोटल्यावरी । पती मला पोटाशीं धरी । गर्भीण झालें मी खरी । भाग्योदय झाला मज वाटे कोटी गवसलें धन ॥ गर्भ राहिला ॥ १ ॥ दुसऱ्या तिसऱ्या चवथ्या मासीं आली गर्भिणीची कळा । कमळ लागलें फिरूं पोटामधें करी कांति झळझळा । घडी मोडून दिली हातीं नेसाया भरजरी सोनसळा ॥ चाल ॥ होत डोहाळे पती मज पुरवी हात घालुनिया गळा । ओले नारळ फणस केळें । दाळिंबें द्राक्षें डवळे । घोस खिरण्या खजुरा पिंवळें । अंजीर आणि आंबे आवळे ॥ चाल ॥ रामफळें सिताफळें गे ये । जांबुळें जांब

बोरे । सोळवंडच्या ब्राह्मणांनीं गे । दिले हारे भरून कोरे ।
उटी चंदन मैलागिरीचे ग । दिसे आंतून आंग गोरे ॥ चाल ॥
असे विलास नानापरी । डोहाळे जेवण घरोघरीं । ह्या बाळ-
पणाच्या नारी । मज रमविती मंजुळ स्वरीं । हिरवे पातळ
खण अंजिरी । ओटी भरली प्रीतीनें ॥ गर्भ राहिला ॥ २ ॥
महिना पांचवा साहावा सातवा सरतां सरतां गडे । ऊठतां
बसतां संकट मज पडलें साकडें । डब डब घामें होतो उबारा
चैन जरा ना पडे । ऐन उन्हाळा पडदे चिकाचे झुरक्याला
चहूंकडे ॥ चाल ॥ आंत बाहेर फिरतां महालीं । शरीराची
होते कहाली । अन्नाची शिसारी आली । काया अगदींच
पिंगट झाली ॥ चाल ॥ घरधन्यास कळ पडे ना गे । घडो-
घडी जवळ येऊन । कुरवाळी वदन माझें गे । बाई मुखास मुख
लाऊन ठाईं ठाईं चोपाळे ग दिले । हलक्यामधीं गोवून । आव-
डेल त्यावरी निजणें । घरीं बाळ्याचें बिछणे । दिस नख बोटी
भोजणें । हलवितां मधुर चांदणें । मधुर घालिती वारा मजवर
दासी चहुंकुन ॥ गर्भ राहिला० ॥ ३ ॥ आठवा सरून नव-
व्याची अर्धी घडीना घडी लोटली । अटकर बांधा लहान गर्भ
मुस पोटामधें दाटली । पार पडन मी कधीं पतीला अशी
चिंता वाटली । सर्व आंगीं वेदना गांठ बाइ कंचुकीची सुटली ॥
चाल ॥ विंचाहून अधिक कळा । कळलें आली प्रसूत वेळा ।
केल्या शाहाण्या चतुरा गोळा । त्या कळा जाणती कुशळा ॥

चाल ।। गोड पदार्थ किंचित सांगे । आधीं मजकडून खाविला । बसुन स्थीर स्थीर । ह्मणती हळू बोला । वेणीचा वास माझ्यागे मजकडून घेविला । धरवेना तेव्हां मशीं धीर दैवतास कोणत्या स्मरूं । मशी नका घाबरे करूं । जीव जातो कसेग करूं । बत्तीस लक्षणी बाळ जन्मले न लागतां एक क्षण ।। गर्भ राहिला० ।। ४ ।। आला प्रेमाचा पान्हा मजला मुख पाहूंद्या आधीं । बाजंत्रीं बाजतील वाजूंद्या पूर्वापरी ज्याविधि । सभोंताल्या उभ्या बायका नमस्कार करी पदीं । नारळानें भरी ओट्या साकरा घालुन मुखामधीं ।। चाल ।। शेक शेगडच्या विछित न्हालें । बाराव्ळी सुखाशीं झालें । पती पुढें लेंकरूं नेलें । आनंद पाहून मन धालें ।। चाल ।। भरजरी आंगडे कुंचडें गे । लखलखीत प्रभा पडली । जडिताचें बाळलेणे गे नेई । पिंपळ-पानें घडली । रंगीत पाळण्याला गे । रावे मोरें जडलीं ।। चाल ।। पावला असा हरी । नामीं विठ्ठल हात शिरीं । यशाचा पटका जरी । गुण परशराम छंद करी । येसू ह्मणे काय कळेल सोहळा वांझेला ही खूण ।। गर्भ राहिला० ।। ५ ।।

## लावणी ८३ वी.

जरांवीण जगीं जरब बसेना जर पदरी तर काम होईल ।
जर पदरी जर नसला तर तो नर संसारी येऊन बैल ।। धृ० ।।
जर जराविण जरि अंबाऱ्या जरि पटके जिलब्या चाले । जर

पदरी जर नसला तर तो रंक होऊनी खातो झोले । जर पदरी तर शाल दुशाले । त्यासी म्हणती हुंडीवाले । जर पदरी जर नसला तर त्या जन हसती टाले टोले । जर पदरीं तर घालुन पंजिरीं ठाण बंदी हत्ती ठेविल ॥ जर पदरी जर नसला० ॥ १ ॥ जर पदरीं तर जगत् जाणती जिकडे तिकडे मोठाई । जर पदरी जर नसला तर तो देतां घेतां खोटाई । जर पदरीं तर गंगा यमुना घरींच येऊन भेटावी । जर नसला तर जीतच मेला जगुनि असेल ते ठायीं । जर पदरीं तर लाऊन झरझरिं पानाचें विडे घेईल ॥ जर पदरीं जर नसला०॥२॥ जर पदरीं तर जबराईनें खऱ्यासि खोटें करिरेटून । जर नसला तर वतन मुशारा खरे कलम ये न पटून । जर पदरीं तर जनता त्याला ताजिम देती अवघे उठून । जर नसला तर हीन दीन सहज पुसेना आला कुठून । जर पदरीं तर जबराईनें जवळ कचेरी सदा फैल ॥ जर पदरीं जर० ॥ ३ ॥ जर पदरीं तर क्याहि जांवई आप्त पाहुणे नित्य घरीं । जर नसला तर बंधू भगिनी पुत्र कलत्रहि होती दुरी । जर पदरीं तर प्रपंच खासा यथा सांग विधियुक्त करी । जर नसला तर निराश जननी कळवळुन एकटी लोभ करी । नामें विठ्ठल परशराम म्हणे अशी जराची रिति राहिल ॥ जर पदरीं जर० ॥ ४ ॥

# लावणी ८४ वी.

नव नवसाचें बाळ एक दिलें ईश्वरें । नाहीं समाधन त्याशीं बाई पाहिलें करून घुमारे ॥ धृ० ॥ मी बारावर्षें एक ठीक न्हालें आधीं । जीव सुजला माझा बाई नाहीं बाळक झालें कधीं । कर दुसरी बायको जन ह्मणती दुर्बुद्धि । पति भोळा शंकर जैसा—नाहीं मनास आणिलें कधीं । कडु खातां मदु आलें मी गर्भीण झालें तधीं । उंच शेलारी हिरवी दिली नेसाया जधीं । होती नानापरींचे डोहाळे काय कमी घरीं नवनिधी । एक वाघिणीचें दुध नाहीं मग भरल्या अष्टसिद्धी । असे सुकळाशीनें नवमास झाले पुरे । आली प्रसूत वेळा बाई जन्मलें मूल गोजरें ॥ नव नवसाचें ॥ १ ॥ गेलें बाराबळी पाळणा तेरावे दिवशीं । रंगींत आणवला बाई मग हर्ष माईना मशी । वर नक्षीचा चांदवा काढून बांधून नवरशी । सोनेरी खेळण्या मोहरे जन बोलती अशी । अशी पर केली पाहण्या घरधनी फार हौसी । दिल्या काढून साढ्या चोळ्या हेलकरणी झाल्या खुशी । बाळ आंगडें लेणें लुगडे पैक्याची रवार अशी । आला वडील सासरा पोटीं मी जेठी ह्मून मज कुशी । गजरानें त्यां नांव ठेविलें गेलें छका-शुका दूर देशी । एवयापोरानें घर भरलें जणूंकीं आंगण सारें । दिसे माझें लागलें रांगूं आंगण त्याशी नापुरे ॥ नव नवसाचे ॥ २ ॥ पानसाकळ्या हसल्या पुतळ्या मधीं वाघनखें मढविलें । आणून

जरीची टोपी त्यावरी जाळी काढविली । पाईं पैंजण तोडे घालून राव्यापरी पढविले । होती हौस मनामध्यें बाई कल्पना तितकी उडविली । लेकाची माय ह्मणती घडी आनंदाची वाढविली । झाली एकाएकी शडप डोळे लाऊन तनु झडपिलें । जीव व्याहलाग माझा बाई सुटलें उभें मन वारें । दृष्टीनें कलकन उलटी त्या पाषाणाचे चिरे ।। नवनवशाचें बाळ० ।। ३ ।। केले नवस भोय बगाडे खेळन । गर्भ्याच्या सटवाईला मी जाईन पाहीन वळण । कोल्हापूर चतरसिंगी तुळजापुर अडजुड येऊन रूळन । जळत विंगळावर चालेन जळनगदा मागेन। दाव लमलकी पाव मला नको करूं छळन । नळदुर्ग खंडोबासाठीं घालीन भंडाराचें दळन । जाखाया जोखाया जाणें जोशा पुसले होरे । नवसाचे डोंगर झाले अझून पुरेना धुरे ।। नवा नवशाचें० ।। ४ ।। केले वैद्यवाणी बाई पंचाक्षरी जमविले। सुप हलविले देव देव्हारीं घुमारे आणून घुमविले । त्यांनीं घालून अर्त्याबाई देवाशीं नमविलें । कांहीं गुणाशी येईना बाई धाव दवडी दवडिले । म्यां हिय्या मनाचा केला जाऊं पंढरीस नमिलें । कडकडीत घडीत गुण आला त्याचें पाईंच मन रमलें। नामीं विठ्ठलचे छंद बुंदरचित चित्ताचे श्रमविलें । गाती परशराम येसू महादू विष्की पुरे । काव्याचे ढबले झाले गायाचे पुरले धुरे ।। नवनवसाचें ।। ५ ।।

# लावणी ८५ वी.

घर घेण्या बेढंग्या रांडा कलीच्या बेचाली । भरेल एखादी गर्मी राजसा नको पडूं या ख्याली ॥ धृ० ॥ जशी इर्चाची छाया धुद कैफांत सडक राहाती । तशाच नवऱ्या निसंग होऊन शहरांमध्यें फिरती । सहज नटून रस्त्यानें चालतां उर उघडी छाती । बटकी दासी कसाबिणी बऱ्या त्याहून चळल्या गरती । एकसारख्या झुंडी जमवून पानोथ्या जाती । बोलूं नये तें विचकट बोलुनी मग पाणी भरती । घरधन्यास घरीं राखण ठेऊन परद्वारें करिती । हीच कमाई रांकडी*डी शहं पती वरती । तुह्मी छेल छबिले देखण्यांत बुघडा । भाळून तुह्मावर बळें घालिती झडा । तुह्मी आधींच चंचळ माझे मजला खडा । विषय विडा देऊन भुलवितील लढवून हरविल्ली ॥ घर घेण्या ॥ १ ॥ आधींच हाउस त्यामधें हकीम इंग्रजी खाशी । खुषी किंवा गैरखुषी असा हा कौल बायकांशीं । नव्या नव्या थळच्या फारच चळल्या प्रत्यक्ष जणूं राशी । उंच नीच हें कांहीं न पाहतां जाती भलत्याशीं । वरकांती देखल्या रूपानें उरूरंभा हावशी । त्यामध्यें तूं एक विरळा लाखांमधें सरशी । कवळी किरळी नवती तुमचा पांढली पंच-विशी । तंव्हां झोंबल गर्मी राजसा यमाचे फांशीं । परनार विषाची पुडी बळेंच तुह्मी ध्याल । मग घेऊं नये तें भलतेच

औषध तुह्मी घ्याल । मग भाण अवस्था होतील हालाचे बेहाल । काय असून धन महाल तुह्मास्तव दुःखास कोणी वाली ॥ घर घेण्या ॥ २ ॥ भरल आपल्या पदरचा पैसा खर्चून जगांत भंडवाडा । हेंच सांगतें बदकर्माला आजपून हात जोडा । वेडी वाकडी बरी वाईट घरीं लग्नाचा जोडा । जें जें तुमच्या मनांत असेल तशी हौस फेडा । करून पांची पोषाख आंगा-वरल्या कंठी तोडा । स्वारीशीं घरीं आक्षई बांधा ठाणबंदी घोडा । नांवगांव वडिलांचा लौकिक चिरेबंदी वाडा । धन दौलत ही महामूर भरली चार पिढ्या मांडा । नाहीं तरी एक नाटकशाळा ठेवा घरीं । देखण्यांत जैशी इंद्राघरची परी । राव चोपाळ्यावर बसून लावा झरझरी । शिरीपेंच मंदिल तुरा हा तुम्हीं माझे वाली ॥ घर घेण्या० ॥ ३ ॥ परायाची घर-नार परी ती पत्रावळ दृष्टी । काय नफा संग करून मूर्खपण खडकावर सृष्टी । हीच विनंती तुह्मा सांगतें पहा कृपादृष्टी । तुमच्यानें मी सफळ राजसा मज भरली सृष्टी । पाणी घालतां कोम निघाले लावावयाचे कष्टी । करून सर्व शृंगार नेसली जरी पातळ आष्टी । दिलें वचन फांकडे खुषीनें नको होऊं कष्टी । एक चित्तीं उभयतां भोगिली मग चंपाषष्ठी । नामीं विठ्ठल कवीची पाया शुद्ध हातवटी । कवी दचल पद्याला त्याजपुढें चावटी । वावी नांवगांव जगजाहीर आहे धनवटी । परशराम बसूचे छंद हेगाती सुरताली ॥ घर घेण्या० ॥ ४ ॥

# लावणी ८६ वी.

होइना पुत्रफळ । पोटिं लागली चिंता । अंतरीं नवस करि । पाव लक्ष्मीकांता ॥धृ०॥ केलें धाकुटपणि । सैंवर मायबापांनीं । पाहिला नोवरा । सुंदर अति व सद्गुणी । दीसमास झाली । थोर चढुनीया ज्वानी । वय बारा भरतां । न्हाण आलें साजणी । ती घडी आनंदाची हर्षलें मनीं । बांधिलें मखर बसविलें आंत नेउनी । चार दिवस केला । गजर वाद्य लाउनी । शकुनाचा आणिला । आहेर माहेरच्यांनीं । पांचवे दिवशिं ओटी भरली सवाष्णिनी । गेल्या घरोघर मज । 'पुत्रवंति होय' ह्मणुनी । त्या दिवशी दोष लाविला मला नकळतां । घरबंधन केलें नाहीं मज पडली भ्रांता ॥ होइना० ॥ १ ॥ उभयतां सुख सेजेचें मला रंगमहालीं । विषयांत मगन अशि वर्षें पांच सहा झाली । माझ्या वर्षिच्या पोरी । त्यांस मुलें झालीं । म्या काय तरी देवाची चोरी केली । का पूर्वजन्मीं फळें नव्हती वाहिली । ह्मणून वांझ मी । ह्मणाति जगाची बोली । देह जळून गेला । सुधबुध अगदीं गेली । कोण इवशी माझ्या । अंगणामधीं न्हाली । तिचे नांवचा गजर जागि आहे कवटाली । रडे खळखळा हात गळा सखीच्या घाली । कोणि वैद्य घुमारा पहा असेल पुरता । होय कष्टी तिथवर चला बाइ मजकारितां ॥ होइना० ॥ २ ॥ गेली सुपहलाविच्या घरीं दों चव दिवसां । ह्मणे कापुर उद ।

घेउन येइ थोडासा । तुज खर्च पडूं देणार नाहीं बाइ लइसा । एकसगट सुपारी । लागेल पाऊण पैसा । विड्याची पानं शंभर लवंगा तिन विसा । वीस केळि जायफळ खारका दोन बाइसा । एक आण कोंबडा उपराटें पर ऐसा । नउ–लिंबें तिधारीं नारळ एक तैसा । एक हिरवें पातळ खण आण हिरवा तैसा । भरचुडा आइला हिरवा कंचन जैसा । चागर डोळस भर गव्हानें । सवा रुपया वरता । मज आशा नाहीं । गुळतांदुळ निवदा पुरता ॥ होइना० ॥ ३ ॥ सवा हात दिला रुमाल चउक भरविला । दिले अच्छेर तूप दिवा आइस लाविला । एकांति बसून कामिना विनवि देवीला । काय चुकले सेवा मार्गी लावी मजला । कडकडून बारें मग आलें भक्तिणिला । ती घुमूं लागली । अंगारा लावण्या दिला । एक म्हणे देवा । बाइ बोलते तुजला । जाइ बाइ समज तुज दोष असें लाविला । गे तुझे वेणिचा अग्रभाग कांपिला । तुजला उंबरठा तुझा सोस अवसाला । हा दोष जळेल जा । भाव मनीं धर पुरता । भोग आईस शेंदुर गुण आल्यावरता ॥ होइना० ॥ ॥ ४ ॥ अंगारे केले । जागजागिं तिनें पुसून । परि गुण कशाचा शेंद्री गोळ्यापासून । नाहिं गर्भ राहिला । धन महामूर नासून । मनिं हिंपुटिं झाली । जुइ सुकली पाणी असून । आली पंढरीची। एकादशी पुढं दिसून । गेलि उभयतां पंढरीस दिंडित घुसून । हरिनामाचा गजर श्रवणीं पडला कसून । मुख प्रफुल्ल झाले ।

१०

कमळन खुलली जुसून । विठ्ठल नामें गर्भ राहिला दोष निसून । परशराम ह्मणे पंढरी फळली कसून । झालि अष्टपुत्र सौभाग्यवती ज्या अर्था । देवाचाहि देव फळला इतर काय करता ॥ हो०॥५॥

## लावणी ८७ वी.

तंग चोळी आंगीं बरवी । निसंग होऊन बेबरवी ॥ ध्रु० ॥ नांव तुझें मैना । पाही उभी शयना । दोही रस्त्यानें थाट भरली । जशी कोंदण मुद्रीवरली । कोमल कांती । फुल सेवंती । रूप बारानें । गरबरली । भागामधें मती भरली ॥ लिहिलें चित्रीं । कान नेत्रीं गजबल लरतर गर फिरवी । तुजसारखी न दिसो उर्वी ॥ निसंग होऊन बेबरवी॥ १ ॥ बारीक कंबर । वर पीतांबर । जरी रेशमी बंद लाविला गेंद गुलाबी मुसमुसला । कुंकुमटिळा । स्वर कोकिळा । बोल तुझा हृदीं ठसला । लाखांमध्यें निवडून निसला । कर मन वहाली । रंगमहालीं । धन दौलत अर्पीन सगळी ॥ तंग चोळी० ॥ २ ॥ पाई पोल्हारे चाले गजभार । पदर घेई सरसा करी चहूंकून । घोळ निऱ्यांचा धरी जवळून । सायंकाळीं तिसरे ताळीं आरास करी दीप चहूंकून । बिसणास बोले रोहोकुन । सुखसंगाची इच्छा आमची साठयालाखल चर्वी॥ तंग चोळी०॥ ३ ॥ मंजुळ वाणी ऐकून कानीं । चला म्हणे घरीं सुखसंगा । आळशावरी वद्ध्या गंगा । विठ्ठल धाता पिटल घाता । अक्षय अहृदे दिल रंगा ।

मज भोगाशिल सुखसंगा । परशराम गुणी रामा गातो निरगर्वी सगुण सांवळी तनु झळाळी देखण्यांत नाजुक बरवी ॥ तंग चोळी० ॥ ४ ॥

## लावणी ८८ वी.

काय सुख वाणूं सख्याचे जणूं कलकन छाती फाटेल । अंतरवेदीं केल्या छावण्या आतां कधीं येऊन भेटेल ॥ ध्रु० ॥ हात्ती घोडे महालमाडच्या रथ गाडच्या दवलत भरली । शिवाय जाहागीर छत्रपतीची जन्म जुगा जाईल पुरली । हद्रा वरती बद्रा साजे बाजूवर छत्रें धरलीं । ठाई ठाई बायका नेटक्या तहानभूक पाहतां हरली । दिवाणखाने पुढें पिलखाने हौद पाण्याचे जिल्मा आटल । कचेरीस कारंजें उडती भले लोक भवती दाटल ॥ काय सुख० ॥ २ ॥ छपरपलंग झोपाळे साकळ्या चांदीचे लटकती हलके । पडदे चिकाचे रंगित संगीत जणूं घट्टा काळीज कलके । चौतर्फाला दिले तबेले कोतवाल ठाकश चलके । घरीं कमी तरी काय निवंता रंगबाज बाजती हलके । सुंदरी यापरी निजमंदिरा इंद्रभुवनाशीं पटेल । प्रीतीमधें पर्वत पडला जिवा दुःखना कसें वाटेल ॥ काय सुख० ॥ २ ॥ पाह्यालां पण एकच केलें किनखापानें छत मडलें । खणोखणीं तजविरा काढिल्या आंग्रेजी ऐने जडले । शाल दुशाले महालीं बिछायत मखमाली तके पडले । पानदान

चौफुले सोनेरी साच्यामध्यें सजीव घडले । वारावारा सुखसंप-त्तिला दुःख दर्या जसा लोटेल । घडी एक पण जाते दुःखाची उभें साल कसें काटेल ॥ काय० ॥ ३ ॥ कधीं येतील गुण-निधी सख्यांनो मला तिथवर न्याग । हरणकाळजी फारच बाई मी मला दिलासा कोणी द्याग । पती उतरून खालती आल्याची आनंदाची साखर घ्याग । शिरा कवन ह्मणून जन मानवले विठ्लाशीं अंतरीं घ्याग । सार्थक झालें सगळें आगळें उणी तरी काय विठ्ठल । परशराम येसू महादू ह्मणे भाऊबंदकी जन्माची फिटल ॥ काय सुख० ॥ ४ ॥

## लावणी ८९ वी.

नयन सुरेख दोन्ही लाल आंगावर शाल दुपेटा जरी । जमदा कोणी उमराव दिसे सरदार सौभाग्य घरीं ॥ धृ० ॥ हजार दो चवदा किमतीचा । अबलक तेजी खडक । नैन फेंकला । तीर जसा निट हल्लिस मारिल धडक । पाईं पैंजण घोड्याचे थै थै । नाहीं जराभर अडक । जडाव जीण रेखला कसून । वर शिपाई बसला सडक ॥ चाल ॥ वय दिसे सोळा सत्रांत । जशुं लिहिलें भोजपत्रांत । लजबीर खेट चित्रांत । आले शहरांतुन । गरकन झरकन । आली पहातां मज गिरी । घटकन पडलें । झटकन धरलें । सख्यांनीं वरच्यावरी ॥ नयन सुरेख० ॥ १ ॥ फार सुरेख नवलीख झाक । वाऱ्यांपार

आली झुळक । पटकन स्वारी । सजून गेली । जशी पाण्याची झुळक । कानीं बिगबाळी । चवकडा कंठिला । मोति थोबिलें ढळक ॥ चाल ॥ रूपचंद्र अकाशीं जैसा । तो दृष्टी देखणा लईसा । याचा संग घडेल तरि कैसा । लाग साग या । घेऊन । जातां । ऐसी यासीं घरीं । जगेन कशी मी । मरेन सख्यांच्या जीव पाहुन हुरहुरी ॥ नयन सुरेख० ॥ २ ॥ चलद् सख्यानो । आगे पाहून । साग कोठील सुभा । कुच खबरा आधिं । एकल कोणी । मग पुढला मनसुभा । घाला गळ्याची । आण तयाला । क्षणभर राहिल उभा । अन्न पाणि जो । घेईल पिईल । नीजनयनी गुण नभा । संकल्प मनाचा । केला मी तो । गेंद फुलाचा झेला । विश्वासेल तुमच्या बोला । आणा करून हर बहाणा ।विनवा जाऊन बहुता परी । शहाणा असेल समजेल उमजेल चंदन मैलागिरी ॥ नयन सुरेख० ॥ ३ ॥ भरमी गोष्टी । वरमी बोलुन । युक्तीनें फिरवीला । शहर पुण्याचा । रमणा पाहुन । मधिं मुक्काम करविला । नानापरी करि । आरास महालीं । जरीचा छत चिरवीला । करी साहित्य । सरंजाम कुल । तबकामधीं भरविला ॥ चाल ॥ एक प्रहर रात्र झाली । आणविला छबिला महालीं । हेतु पूर्ण गळां हात घाली । नामीं बिठलाचे छंद फंद अति गोड कवन रसभरी । परशराम येसु म्हादु ह्मणे होय सावध पडशील भरी ॥ नयन सुरेख० ॥ ४ ॥

## लावणी १० वी.

नूतन नव्या नवतीचा बहर । आंगी मदन करितो कहर । येते सुखशयनाचि लहर । कैसे करूं मी ॥ ध्रु० ॥ तुह्मी श्रीमंत माझे राजेसरी । असुनया छत्र माझे शिरीं । मजला टाकून जातां घरीं निरऊन कोणा । नका जाऊं धरतें तुमचे चरणा । तिकडे गेल्या कैचें स्मरण । इकडे अशीच झुरझुरू मरेन । राजीवनयना । पोटीं एक असतें मूल बाळ । तयास्तव कंठून राहतें काळ । माझे दैवीं कैचें भाळ । येऊंद्या करूणा । शीतळ चंद्र अर्गजाशी । करितो क्षयरोग केवढा । आळशी चिंतावी जैशी । विरहानळ एवढा । दीपकाविण मंदिर जैसें । भयंकर दिसे घरवाडा । घरीं असुन रत्नांची खाण । तुह्मी तरी ठेविले परस्थान । विकट पडला हिंदुस्थान । एका स्वामी । करूनिया दुःख मला प्रवासा जाल तुह्मी ॥ नूतन नवी० ॥१॥ अवघड सातपुड्याचा घाट । रस्ता न मिळे जाया वाट जाळ्या बेळवाच्या दाट । कराकरा लवती । उंच गेले ताडमाड । आंबे आंवळे खिरण्या पाड । सागवान नारळीचे बाड । तयास्तव भवती । रामफळें सीताफळें आला बार । रंतजन चंदन देवदार । केतकी कर्दळी अकबार । बहु टवटवती । दाट जाळ्या करवंदीच्याई । कोणी कोणाला ना दिसती । वस्ती भिल्ल भांगाऱ्याची मार्ग सोडुनया दूर असती । झोपड्या बांधून तर-

साऱ्याई । देती पान तस्तातस्ती । दरेखोरे व कोकस्थान । सावध सांवजांचे रान । तेथें वाली एक भगवान । तारील नार्मी । करूनिया दुःख मला प्रवासाला जाल तुम्ही ॥ नूतन नवी० ॥ २ ॥ सिंह शार्दूळाचे थवे । चित्ते सांबर गेंडे भवे । विषय तरसाचे वाटे भय । शबरी फिरती । रोही गिध आणि सिंत्र अपार । उन्हाळा गव्याची एक धार । वानरें करिती भुभुकार । वृक्षा वरती । कोमळ कांती अति सकुमारा । तुम्हाला सोसेना उनवारा । मजली अदल कोस बारा । मुक्काम टरती । सिद्धी तलाव तट पाहूं । राधा धरली सिध्यानें । मगरी सुसरी बाहेर येऊन । शब्द बोलती करकश्य-वाणे । शीर तळहातावर घेऊन । जसे सुळावरले खाणे । मी तरी जाऊ देईना कदा । येऊन मिठी घालितें पदां । नाहीं तर आपल्या हस्तें वधा । एक्या कलमीं । करूनिया दुःख मला प्रवासाला जाल तुम्ही ॥ नूतन नवी० ॥ ३ ॥ ऐकिली चतुर नारीची अर्जी । फिरली प्राणसख्याची मर्जी । रंगीत महालांत चौबुरजी । बैठक खाशी । कंदिल दीप लाऊन चम-चमाट । पलंगीं शेज फुलांची दाट । करी मग तऱ्हेतऱ्हेचे थाट । होऊन सरशी । नूतन नवी नवतीची भवा । उतरली भर-ज्वानीची हवा । आतां मी करीन तुमची सेवा । होऊन दासी । राहिला स्त्रीचे मन बुद्धी । तमाचे सागर गुण आधी । कवि नार्मी विठ्ठल परसादी । कनैया ठेविल समान बुद्धी । परशराम

खसूचे बरदी । केला पण नेती सिद्धी । रामकृष्ण रामाचे छंद गाती । कडोविकडी कटीबंध भेद । काय जाणतील मतिमंद । करतील गुरमी । करूनिया दुःख मला प्रवासाला जाल तुह्मी ॥ नूतन नवी० ॥ ४ ॥

## लावणी ११ वी.

सवति सवतिचा कज्जा लाऊन । तुम्हि देतां पतिराया । लाऊन मुर्खा हस्त आदवा । नाहिं तुम्हां तिळभर माया । ॥ धृ० ॥ मी वचनाची खरी इमानी । लक्ष तंव चरणांजवळी । उत्तरांशि प्रति उत्तर नाहीं । तुम्हास कोण्याकाळीं । सवतीला तुह्मि । जवळ घेतलें । मला ठेवुन महालीं । नित्य उठुन रात्र पहाट बसविली । रोज तुह्मि तिजवर पाळी ॥ चाल ॥ अशि काय अवड जिवलगा । तुह्माला तिची जा। मज मागुन केली । बीच झालि प्रीतिची जी । गोरिगोमटी । अवड तुह्मा सवतिची जी । कळ लाऊन तुम्ही देतां बसतां । पलंगिं गंजिफा खेळाया ॥ सव० ॥ १ ॥ बोले दुसरी । ऐक जिवलगा । गोष्ट सांगते तुर्शी । वर्डाल झाली म्हणुन कां तिंदा । टाकुन बोलल सवत मशीं । ही ह्मणते मी फार चांगली । हिचें गौरपण हिजपाशीं । जरि मी अमंगळ असलें चांगुलपण । नाहिं दावित कोणाशीं ॥ चाल ॥ ही मलाच ह्मणते । तूंच पति फितविलाजी । कांहिं करुन चेटक । करणी मानिं मथविलाजी ।

सवतिनें कसा । पतिराज सुती सुतविलाजी । बरा गळी गुत-
विला लाविलें । मला महालिं धुरबाया ॥ सवति० ॥ २ ॥
बोले पहिली स्वामीराया गोष्टी ऐका चार । माझ्यापासुन
चढेल पाणी । घ्या सहाचाहि विचार । सत्राजणींना विचारलें
तरि । हाच सांगतिल विचार । अठराची मग कथा काय ती ।
एकच होइल विचार ॥ चाल ॥ गुवळात मायेच्या जशि मदी
मक्षिकांजी । तिच्या नादीं लागून बसल अनुला धकाजी ।
जगिं होईल थूथू । देवहि करिल तिटकराजी । करा विचारां ।
पुरवा अंतरां । अजून त्यजा ती माया ॥ सवति० ॥ ३ ॥
बोले दुसरी ऐक सख्यारे । गोष्टि हिच्या ह्या चार । भरेल
यानें पोट तुझें कर । अजुन सोयिचा विचार । साहा सत्रा
अठरा सारे । तमाशाच बनणार । सुखविलास भोग भोग
सख्या । कोणि न कामीं येणार ॥ चाल ॥ बोल जगाचे ऐकुन
मनाचें करणें जी । हंसतिल त्याचे पडतिल दांत स्वहित करणें
जी । ह्या देवधर्माच्या पोकळ डरविण्या जी । विलास चैनी ।
नरें भोगणी । ढोर भोगील कां ? या ॥ सवति० ॥ ४ ॥
माया प्रकृती वाद ऐकुनी । सार घेतलें आत्म्यानीं । षड्रि-
पूची आई माया । सावध झाला खडबडुनी । झणीं निघाला
मायेपासुनि । आला प्रकृति सदनीं । सगूण प्रकृती । सौभाग्य-
वती । निर्गुण पथदायिनी ॥ चाल ॥ कवि नामें बिठ्ठल चतुर
धुरंधराजी । परशराम गुणी । सेवि दो अक्षराजी । येसुची

गोड गोड गमे चतुरांजी । रामकृष्ण गुणिरामा गाती । तल्लिन जन ऐकाया ॥ सवति० ॥ ५ ॥

## लावणी ९२ वी.

अजब शहर गुलजार । बटाव दिल्लीचे राहणार । अमदाबादेमधीं एक नार । मोहना राणी । प्रीति दोहिची कशि जमली ध्या ऐकोनी ॥ धृ० ॥ पुत्र एकुलता एक मायबापाचा । बटाव रहिवासी दिल्लीचा । भोगी सोहळा सुख संपत्तीचा । मोतीवाला । स्वरूप दिसे रतिचा वर किंवा पौर्णिमेचा चंद्र । जणु कोणि अमीर शिपायी बनला । रुसून मायबापांवर । आला घोड्यावरती स्वार । चालला निघून देशांवर । मुलुख पाहाला । वेळ दोनप्रहरची होतां । तृषा अवचित लागतां । अमदाबादेचा पानोथा । पुढें लक्षुनी ॥ प्रीति दो० ॥ १ ॥ छाया वृक्षाची निर्मळ । अमदाबाद पानोथा स्थळ । घोड्यासुद्धां त्यानें जळ प्राशिले जाणा । तिथें एक सावकाराची सून मोहना । नांव तिचें मुखरण । बारा वर्षांमधिं नूतन । जशि देवांगना । चांगुलपण वर्णूं किती । प्रवासा गेला तिचा पति । घागर घेउनिया गजगती । जातसे जिवना । वृक्षातळिं राजकुमर । अवचित दृष्टि गेली त्यांवर । वेधलें मोहनीचें अंतर । लागली ध्यानीं ॥ प्रीति० ॥ २ ॥ बरोबर होत्या संगातिणी । त्यांसि बोले मंजुळवाणी । तुह्मी जा मी येतें मागुनी । धुउ-

रनिया चोळी । किंचित हस्य करी लाजून । मग पदर मुखासी छाऊन । बोले बोले मंद भाषण । पहा वेलाळी । तुह्मी राव कोण कोठिल रहिवासी । कुणिकडे जातां राजवनशी । कांता टाकुनिया परदेशी । आलां या स्थानीं ॥ प्रीति० ॥ ३ ॥ आमुचे वर्तमान गे सखे । नेत्र कुरंग चमकावितसे । दिल्लि शहरीं रहातों आह्मी । मायबापांवर रुसून रागें । केला सर्वही त्याग । बांधुनी विषयाची फिरंग । आलों या कामीं । विनवी कर जोडुनिया सुंदरा । अर्जी आमुची मान्य करा । आज यावें आमुचे मंदिरां । सगुण गुण स्वामी । सासुसासरे असतील घरीं । नका भिऊ कुणा तिळभरी । असावें सावध तुह्मी अंतरीं । न बोले कोणी ॥ प्रीति० ॥ ४ ॥ प्रवासाहुन आला तिचा पती । ढाळ फिरंग घेउनि हातीं । तुह्मी कोण राव कोणचे गती । पुसे मोहनीसी । मोहना ह्मणे पुत्र मामाचा । पाहुणा आहे दों दिवसाचा । मारिला हाव फिरंगीचा । बटावासी । मोहना बसुनी घोड्यावरी । सिणगार पुरुषाचा करी । बटाव बटाव सारे अंतरीं । घेउन वागेसी । चंदन काष्ठें गोळा करुनी । मोतीबागांमधीं जाउनी । दिले बटाव शव पेटवुनी । राजकुमरासी । प्रदक्षणा करी त्या क्षणीं । उडी टाकली तिने जाउनी । विषयां पायीं गेले मरुनी । मुकले प्राणासी । नामें विठ्ठल परशराम छंद करी । जश्या का मोत्याच्या लडी । केला छंद कडोविकडी । अर्थ घ्या पाहोनी ॥ प्रीति० ॥ ५ ॥

# लावणी ९३ वी.

माझे हृषीकेशी दूर देशी अंतरले । प्राणपती भरी कोणाच्या भरले ॥ धृ० ॥ नार सकुमार होती मायबापाजवळी । केलें लग्न अज्ञान तनु कवळी । बय लहानसें रूप चंद्रा आगळें । ऐक सखे पतिव्रता असू ढाळे । नवी भरजानी जीव हा तळमळे । कसे राधेला वनमाळी चुकले ॥ चाल ॥ ती मजला झाली परी गोष्ट नाहीं बरी मी पडलें झुरणी । कोंदणे दिसे आज गगन लावितां लगन लोपले चरणीं । सुखभोगायाच्या दिनीं एकली बनीं दुःख गेले करुनी । गेले भ्रतार दुश्चित मन जाय लक्ष्मीला उणें । संचित फुटकें ही हीन उदासी धरली । प्रवासीं छंद जायचा वारू चिंतामण । जीन जडित हुमा मोत्याचा तयारी केली । संजुक ढाल पट्याची जरी पेच शिरीं मंदिल बर पटका जरी । कानीं भिगबाळी चवकडा जोत काय न्यारी । हातीं जडावाचें कडें कंठीं जडतारें । दिन दसरा उत्तम दिन । मुहूर्त पाहिले त्यानं । दिले डेरे परस्थान ॥ चाल ॥ कांहीं तरी सखा मशीं रिझल । साजणी । चालला मजल दरमजल । साजणी । गेल्या दिल्लीस फौजा फजल । साजणी । गेले दिल्लीस मग इलकार फिरले । बादशाही भेटी झाल्या दैवीं हातीं धरलें ॥ हृषीकेशी दूर० ॥ १ ॥ आले त्वरेनें जासुद माघारां । धरली चाकरी दिल्लीच्या खबरा । दुश्चित झाली व्याकुळ सुंदरा । धाव॥

सैरपानो मशी पंखा वारा । असा जिन्हाणें नसे जीवन थारा । ती पर केली मशीं चंद्रहारा । चाल कर्पूर कर्दळी पुटी अखेर शेवटीं–न लाधे तिजला । ती दमयंतीची दशा–भेट नाहीं आशा–लागली मजला अशी भ्रमिष्ट झाली उखा–कोणीकडे सखा–कोणाशीं रिझला । दिल्ही सोनें सहसा हिन । वय रुतीं दिसे लहान । सुखभोगी सब अज्ञान । जडित मंचकीं पुष्पाची शेज म्यां निद्रा । पतीस्तव सखये–निशीदिनीं पुजितें रुद्रा । दिसती मजला भोवाणी बैठकी सदरा । रहंवर पालख्या कुंजर तेजी बरवे । आभ्यांत रूपव्हा विवी मशीं वरवे । न्यूनता नाहीं तिळरती घरीं आहे सर्व । मिष्टान्न हर जिनसीचें–फुल हवा बागबगींचे । ते फिकेका मज ना रुचे ॥ चाल ॥ चंद्राविण चांदणी फिके । साजणी । नाहीं मालधनी कोणी विके । साजणी । देव धर्म अक्षुक मायलेके । साजणी । जसे व्यापारी बंदरीं हिरे भरले । कर्मगति झाले हसल मुद्दल उरलेंजी ॥ हृषीकेशी दूर० ॥ २ ॥ नेम धर्म एकानिष्ठास्तव चरणी । पतिव्रतेचा भाव पती स्मरणीं कुठवर धरुं धीर मी पडलें शरणी । धन्य ईश्वरा तुझी अघटित करणीं । सात संवत्सर भरले निर्वाणी । कशी एकली करमु वय तरनी ॥ चाल ॥ लोटला प्राणासर जसें । लागलें पिसें । जळो मुठींत धरूं जीव किती । कोणाच्या हाती धाडूं पत्रिका । इच्छाभोजन ब्राह्मण । करी श्रवण शास्त्र कामीन । चातकापरी लक्ष जीवन । त्यांत बरी

सुंदर पति मार्ग न्याहळी दृष्टि । ठेवी पूर्वीच्या नाकळे । नाकळे काय या गोष्टी । अमुक भरली—काय करूं जन सृष्टि ।। चाल।। धरवेना धीर मज आतां । जरा साजणी । उदंड नवासलं भावें देव निरवाणीं । विषाचा घेईन प्याला करी जहण । करी विचार गुणी लक्षणा । जोडी जासुदाची आणा । दिल्हें पत्र केलें रवाना । दिल्ही मुदत महिना सवा । पती पुढें लखोटे ठेवा । जासुदा । माझे प्राणपती भेटवा । जासुदा । हजार रुपये दिल्हें इनाम वचन हरलें । आनंदाची घडी दुबळपण सरलें ।। हृषीकेशी दूर देशीं० ।। ३ ।। पठाण गती दिली चाल जासुदालाजी । जलदी पावले करून रात्रदिन । पत्र एकतां श्रवणीं स्वामीलाजी । जरूर आज्ञा मागें युक्तीनें । झाली बसे दिल्ही रजा बादशाहानें । दिली नालकी पटका निशाण ।। चाल ।। दिली ढाल दक्षिणेकडे । चवघडा झडे हत्तीवर हवदे । राव बसले अंबारीत । झरझरी पाल घटाव उमदे । हजारो लोक जमेंत । आले उज्जनींत लोक कुल समदे ।। चाल ।। घरी सुंदर चंपावती । रंगमाहालावर उभी होती । झाला शकुन होरा वर्णिती । हरुष अंतरी । देखली सख्याची स्वारी । उतरली खालीं । खूप हवाच बनली परी । रत्नमय हारें । पचारती घेऊनया करी ।। चाल ।। आदरे ओवाळी प्राणसखा कामिना । लोकाशी दिधली रजा गेली सारी सेना । सवासिक केलें पक्वान्न उठा भोजना । झालें भोजन दिधले विडे । प्रीतीनें

गळा मग पडे झाली लंपट चरणीं जडे । कवि नामीं विठ्ठल शिरा । खुप झुरा । अशी परशरामाची तऱ्हा । लई शिरा । दूर भगली बिसणीखोरा ठेव दुरा । येसु ह्मणे नार्ही नवशिके कुठे तरले जी । शिवराई पैसे अखंडांत सरले ॥ हृषीकेशी दूर अंतरले जी ॥ प्राणपती० ॥ ४ ॥

## लावणी ९४ वी.

आड न विहीर झाली मजला तडकन जिव जाइना । मी नवतरणी अमली दाद्या कांहिं बरे होइना ॥ धृ० ॥ रात्रंदिस धुंद अमला माजीं अन्न खाइना जरा । पाहुं किती वरखालीं बोंबिल । हडकाचा पांजरा । लाल नयन करि गुंजावाणी । फिरवितसे गरगरा । जणुं रागांमधिं सर्प विखारा कांहीं न बोले जरा ॥ चाल ॥ असा दैवि लिहिला पती । कसे करूं । नाहिं कर्माची धडगती । किती झुरूं । वय भरांत मी वेकती । पान भरूं । जहर खाउन मरूं वाटते । दुःख मला साहिना ॥ आड ना विहीर० ॥ १ ॥ पावशेर गांजा अफीन तोळे तीन सकाळची न्ह्यारी । वरून कुसुंबा पाते कोळे भर घालुन साखर मिरीं । कुचलीच्या बिया काळा धोतरा बचनाग लहरी । तलख तमाखू सरस गांजा अवघा विळ झरझरी ॥ चाल ॥ दारूचा लागे तहान । घडि घडी । त्या अमलामध्यें वेवहार । बडबडी । पडे अचेतन प्रेतासमान । चार घडी । मुर्खा घालिता

विडे खडबडून डोळे वपडुन पाहिना । जणु भट्टीमधिं लाही अमर्दी जळून झाला चुना ॥ मी नव० ॥ २ ॥ मायबापें दिली पाहुन जागा दवलतीची भरभर । नाहि न्यूनता घरि निघतो नित सोन्याचा धूर । वया सारखा नाजुक जोडा । मी चंद्राची कोर । हात बोट कधिं मसि लाविना अमलामधिं चूर ॥ चाल ॥ दोहिंचा एक बिछाना । शेजारीं । घाम पाघाणी येइना । तिलभरी । झालि विषयाची वासना । अंतरीं । महि-न्यातुन जर शिवनां एकदां । तरि अगळ घालितें मना । दुःख विषयाचें सगळें टाकून पुरे अंतरींच्या मना ॥ मी० ॥ ३ ॥ धन दवलत सारी वाटि लाविली । याच्या अमलापायीं । वडिलाचा ना धाक शिकाया कुणि घरिं दुसरें नाहीं । एक अमाविण अंमल खोटा । उगीच पडला ठायीं । शेजबाजाचें सुख जरी असतें दुःख न गमतें कांहीं ॥ चाल ॥ पोटिं असतें एक मुलबाळ । भलतुस । मग कंठुन रहातें काळ । चार दिस । झालि संसाराची राळ । करुं कसं । बिठु परशराम झणे जतन कर टाळ जन्म नाहि पुन्हां । रामकृष्ण गुणिरामा गातो चतुर जाणती खुणा ॥ मी० ॥ ४ ॥

## लावणी ९५ वी.

दुर्गुण त्यजग । मग चाहिल वैसी सजग ॥ धृ० ॥ मी चांगट रुप देखणी अस्सल : असे जिवीं धरशील । नाहिं

रूपासारखा जोडा म्हणुनी । किती झुरसील । अगांवर लेउन बस्ता । ठुमकत फिरसील । नाकीं नथ सरजाची घडघडी । सरसी करशील । पैक्याचा पाउस तुजवर । हटकुन वरसील । पाहुन धजग । मिथ्यावर पडली विजग ॥ दु० ॥ १ ॥ जरी पातळें नित नेसुनी । वर शेल्याची बहाळ । चांगुल पण जैसें कां हरबऱ्याचा टहाळ । शहरांत अगाजा तुझा । जो तो घेतो बहा[illegible] । नव नवती नदीचा पूर अंतरीं गज पहाळ । परत येईना वस्त[illegible] हरपली गहाळ । मग निघुन जाईल । डोळ्यावरचे पहाळ । देहिला । झिजग । पति ईश्वर मानुनी पुजग ॥ दु० ॥ २ ॥ चेटिपटि करशील मुख अयनी । पहासील टाकून । सालस पण दावी । ऊर पदरानें झांकुन । दो नयनाच्या समशेरा । मारशील फेंकून । संदर्प लावले मोठ मोठ्यानी चहुकून । पाय फुंकुन ज[illegible] चालसील । अबरु राखून । शिकविल्या गोष्टी । घे पदरीं [illegible] देहीला झिजग । वाइट असेल तर खिजग । [illegible] ३ ॥ कली युगीं उलटा पहारा । [illegible]ोटा अ[illegible]र्दी । [illegible] नये तें । भलतेंच करतिल नगर्दी । [illegible] अंम [illegible]हार ना[illegible] कागदी । चोरा सिंदळाला [illegible] फिरा[illegible] [illegible] परशराम येसुचे [illegible] भांगेची [illegible] । [illegible] । रामकृष्ण [illegible] भजग । दुर्गु० ॥ [illegible] ॥

## लावणी ९६ वी.

गेले टाकुनि मजला स्वामी । तगमागितें अंतरयामी ॥धृ०॥ तारुण्य वय मदनें भरलें । कुच आम्रफळें तरतरलें । समयांत अशा अंतरलें । फळ प्राक्तन वाटे सरलें । प्रीयकर आज रागें भरलें । साधितां बहुत घाबरलें। कंठूं मी कशी निजधामी। तग मागित अंतर० ॥ १ ॥ सुख शयनीं न गमे नयना । दधीपासून गेले त्यजुनि । अहोरात्र सख्याचे भजनीं । देह माझा झिजला सजणी । जीव प्राण घातला वजनीं । मरतें मी पडलें झिजणी । कधा रत होईल त्याकामी । तगमागितें अंतर० ॥२॥ पती योगें भरला चळ। न गमे मजला घडीपळ । गे जसा दमयंतीचा नळ । लागली तळमळ । त्यागिलें वनीं निढळगे । वाहे नेत्रीं निर धळधळ । कोणी आणा सख्या निजग्रामीं ॥ ३ ॥ घरीं आले सगुण गुणराशी। करी शेज फुलाची सरसी। नामीं विठ्ठल विठ्ठल स्मरशी । जय परशराम भव तरशी । मलुराज कवीचा नरशी । लागली जिव्हारी तिरशी । यशवंत गुणी बहु कामी । तगमागितें० ॥ ४ ॥

## लावणी ९७ वी.

किती जिवाला नटशील म्हणशील । मजसारखी दुसरी नाहीं । तुजहून चढी दुनयांत एखादी सहज तुला बांधील गाई ॥धृ०॥ काळी घूस मोठाले थान दांत प्रतिमा फाळाची । पिचपिच

डोळे त्यामधीं काजळ नाकीं नथनी पितळाची । तुझी झोपडी तिनवाशाची दारीं छपरीं कोळाची । चहूंकून कुड सणकाड्यांचा आंतमध्यें खाट मोळाची । चार माचवे जुने किडखादी जाई न घडी पळाची । रहाट नवरा अक्षयी केला पुढें टोकरी पेळाची । एका कणावर चोविस जातीं फिरविशील बसल्या ठायीं । तुजहून चढी दुनया० ॥ १ ॥ पाय फेंगडे खुळी हातामध्यें वेळा घालशील कुसरीच्या । जग भाळवणें पोरचाळवणें निंदा करशील दुसरीच्या । दोघी चवघी एकसारख्या गोडसुऱ्या जणू मिश्रीच्या । टाके नवनीत नवे ठाकशी दाहीं बोटी पौच्या । अशा रुपाला जो कोणी भाळेल कडू वृंदावना उसरीच्या । चौऱ्यांशीचा न चुके गरका दाढेंत पडल्या सुसरीच्या । नग लगद्याचा खोटा अगदीं खरें करून लोकां दावी । तुजहून चढी दुनया० ॥ २ ॥ ठाकनवेणी तनवे ठाकशी दाहीं बोटीं घालून छल्ले । वळखून ठेवलें तुला फाकडे किती करशी इल्ले बिल्ले । अतिरथी पाताळीं घातलें असून सोन्याचे गड किल्ले । धनुष्यबाण वीरकंकण हातांत रात्रंदिवस चढवून चिल्ले । कौरव पांडव मुसंत आटले कैकांचे मन केलें ढिल्ले । सनकसनंदन शुक वैशंपायन हेच निवडले रणदुल्ले । चौदा कल्प तुच्छ मानूनीं पेटीं घेऊन बसले डोयीं । तुजहून चढी दुनया० ॥ ३ ॥ निर्गुण तेथें वंशनिवृत्ती प्रकृतीस पुसेल कोण । ह्मणून प्रकृती वायीं बांधली भेदावांचून काय गाणें । तांबेपितळ कशास घेवा

पुतळीचें टाकून सोनें । विठ्ठलनामें कवी धुरंधर दो अक्षरीं भरी केणें । परशराम गुणीं ऐसू गाती चतुर सुज्ञ जाणती खूण । रामकृष्ण गुणीं रामा गाती पाहून आले शयना शाई । तुजहून० ॥ ४ ॥

## लावणी ९८ वी.

विनवाग बहुतापरी । परंतु कसाहि आणा घरीं ॥ धृ० ॥ ओतीव पुतळा सुवर्ण लाटा । दिष्टीपुढें दिसे गोरा गोमटा । मज विषयाचा भरला फाटा । आला थरारून आंगाशीं कांटा । प्राणसख्याचा महाल चहूटा । जागा धरा जा चहूकून वाटा । एकांता मधीं जाऊन गाठा । समजाऊन आपल्याशी थाटा । अशा वस्तूचा बोभाटा । करा निरूपण चतुर सुकटा । धोर लागले झाले चिपटा । हाणीन खंजीर उरीं । विनवाग ॥ १ ॥ लावण्यामधीं केवळ विजवा । अग्र लागलें कोणी तरी विझवा । घेऊन या तो कसाही रिझवा । उभयतांला रुपाशी गजवा । वाळा धरचें पडदे भिजवा । रंगमहालाचे झुरके बुजवा । शेज फुलांची सुंदर सजवा । चरणकमळ मजकडून पुजवा । मंचकी मज शेजारीं निजवा । प्राण प्रियकर घेईन उजवा । विडे देईन स्वकरीं । विनवाग० ॥ २ ॥ आसपास आधीं घेऊन थडवा । असल जवळ कोणी तिजला धुडवा ॥ अंतरखुण प्रीतीची भिडवा । अर्जी मर्जीमधें विकल्प उडवा । क्रोध सख्याचा

समुद्रीं बुडवा । येईल आसा कांहीं हुन्नर लढवा । राज्यापरी जिवलगास पढवा । कसाही त्याचा संगहा घडवा । या देहीच्या करून खडावा । नेऊन तयाच्या चरणीं जडवा । मला धीर धरवेना वडवा । दृष्टीला दावा तरी । विनवाग बहुता० ॥ ३ ॥ आसपास सख्यांचा पाळा । विनविती जाऊन कृपाळा । घऊन आल्या चतुर नृपाळा । रंगमहालीं बांधून चोपाळा । जशी राधा इच्छिती गोपाळा । पूर्व पुण्य आलें भाग्य कपाळा । लावण्यामधीं बनली चपळा । चंपु वृक्ष जैसा पुष्पाळा । आज देईन सोन्याचा चपळा । चरणीं ठेऊन मज प्रतिपाळी । कटि बंद विठ्ठलाचा चपळा । परशराम छंद करी । विनवाग ॥ ४ ॥

## लावणी ९९ वी.

सख्यारे तुजवांचून किलवाणी माझी काया । पावता पत्र निघावें राया ॥ ध्रु० ॥ वाट किती पाहूं पाहतां मी शिणलें पोटीं बहु दिस झाले तुह्मी प्रवासीं नाहीं गाठीं । देव किती नवसूं नवशिलें सख्या तुजसाठीं । आहे तसे रे यावें म्हणून चिंता करीते मोठी । नको धन द्रव्य द्रव्याची मजला कोटी । अखंड भाग्य सौभाग्यवती ओटीं । प्रवासा माजी छावणी कोणत्या ठाया । जासुद जोड्या पाठविल्या खबरा घ्याया । सख्यारे ॥ १ ॥ उत्तरदेशी जासुदा तुम्ही जा जागा । सदर दिल्लीच्या स्वामीच्या ह्मणती पागा । भेट झाल्यावर

चरणाशीं बळकट लागा । डाक फिरवी दक्षिणेंत एवढें मागा । किंव काकुळती सांगावी होती यागा । घरीं येतील होती गोष्ट आणावी भागा । येथून एक महिना लागेल तुम्हाशी जाया । बिकट रस्ता सांभाळून जावें पाया । सख्यारे ॥ २ ॥ रवाना जासुद मग केला त्या नारिनें । चालता आला कांचन बारीनें । तापी नर्मदा उतरून गेला जारीनें । माळवा ग्वालेर सोईचे सर्द सोईने । पोंचला दिल्ली कुच मुकाम झडकरीनें । भेटला त्याशीं ते होते सडे स्वारीनें । पुढें टाकूनिया कागद लखोटा पाया । घेऊन कसे बसले हृद-यांत कशी नाहीं माया । सख्यारे ॥ ३ ॥ वाचितां पत्र मग तयार केली स्वारी । फिरवून मोहरा कूच जमीयत अवघी सारी । कधीं भेटल ही प्राणसखी अधिकारी । अशी हमेशा जिवास वाटे हुरहुरी । आला घरीं आपल्या गजघांट वाजवित दारीं । भेटतां दोघे श्रम हरले सहपरीवारीं । नामीं विठ्ठलचे छंद अचुक जडणा गाया । परशराम येसू छंद गातो नवे नित्य राया सख्यारे० ॥ ४ ॥

## लावणी १०० वी.

दोनचार बायका करून फसला चंदन हौशा गडी । एकदांच केली धांदल चवघीनीं गुंगझाली चौकडी ॥ धृ० ॥ मूळ लग्न पहिली बाइल झाली अगदींच लहान । भारिभरून केली

तिजवर दुसरी घर ठेवून गहाण । चार महिने मजा उडविली तुह्मी चंदन मी सहाण । नवरा पणि खुष होलुं लागला पाया मिळेना वहान । स्त्री पाटाची चंचळ झाली केलें लंकादहन । टिक्का मोरा ह्मणुन मी फसलें पाहुन भरली गव्हाण । हत्ती पोसवेल पर बाईल न पोसवे लोखंडाची लहान । दिवस अवळींचें कुडवर घालूं गाहि ठविलें शाहान । ना पुसतां गेली उठुन माहेरीं घालून दारांकडी । अगत असली तर दे खाया पुरव चोळी बांगडी । दोन ॥ १ ॥ पाटाची गेलि रुसुन माहेरी चैन पडेना जरा । चार मिळून घर माझें उघडा घ्यावा यशाचा तुरा । पुढाइलाची पाठ पुरवली नित घालून येरझारा । आधिच फटकळ गडी नाहिं चालविला सारा दोरा । दुसरीवर तिसरी केली देखण्यांत खुपाशिरा । चोळी लुगड्यांवर राजी केली । बैलहि विकला मोरा । ह्मोतुर लावुनी घरां आणिली बसवूं पाहे कुरा । दो सवतींची गुणगुण ऐकुनि फूंनागिन प्याली वारा । तळची आगातिची मस्तकीं गेली । जांश वाघिण कडकडी । दोघी असतां कां माझि गैर गोविली चल उठ जाउ चावडी ॥ दोन० ॥ २ ॥ तिसरीनें फार दंगा केला उभि अंगणां माधे राहून । चल पारांवर करुं पंचाइत दे फारकत लेहून । थीर ह्मेष दमधर तुझी निशा उतरीते येते माझा भाऊ घेऊन । सिंगे ह्मसीची काय ह्मसीला जड गेली माहेरी तट खाऊन । तिसरी वर केली चवथी आणिक पोटार्थी पाहून । तीच उलट त्यापोसुं

लागली । मन विषयीं मोहून । चवघींची मग गरळ टाकिली बसला डोळे लावून । चोर जार अवरुं बारा गाडे जन वागति त्यासी भिऊन । एक लग्नाचे दो पाटाच्या । एक एक येति निघून । ताणून धरिला चौकुन त्याची । केलि उचल बांगडी । लचका लचकीं मम हतघाई । जणु समशेरीं धांगडी ॥ दोन० ॥ ३ ॥ चवघीनें ओढुन नेला चावडी खमंग मिळाले पहाया । फट्ट फजीति झाली जनांमधीं । अगदींच गेली त्या । दौलत जरि पदरीं असती । घरीं बसुन खाया । मग ही फटफट कशास होती । आह्मी येतो सांगाया । नवरा ह्मणजे छत्र शिरांवर । चिरबंदीचा पाया । नामे विठुची खरी शाहिरी जन रिझले ऐकाया । रामकृष्ण रामाची तोडही एकाहुन एकचढी । परशराम ह्मणे सखारामाला समतोल जाउ बिनघडी । दोन० ॥ ४ ॥

## लावणी १०१ वी.

तूं बालपणींचा मैत्र जिवाचा गडी । नकोरे प्रियकरा धरूं मनीं आढी ॥ ध्रु० ॥ आधीं लाऊन माया आतां नका दूर धरूं । सख्या तुजविणा कोणाला स्मरूं । होईल तुजला दृष्ट मनीं कितां झुरूं । माझा तूं लावण्याचा सरू । अमोल हिरा पाहुन घातली उडी । काशीस लाऊन न्या पइल्या थडी । तूं बालत्वाचा ॥ १ ॥ देखण्यांत जैसा नाजुक बटमोगरा । सुवासिक चंदन मैलागिरा । तूं कृपा समुद्र केवळ रत्नहिरा ।

चालून आलें प्रीतीच्या आगरां । एक चित्त असुनिया रुसवा कांरे घडी । कोण्या सवतीनें लाविलें चढी । तूं बालत्वाचा ॥ २ ॥ काया कवळी नवाळी नवतीच्या भिरा । लाऊन शिरपेंच मंदिल तुरा । विनोदें आनंदें विलास महालीं करा । सेवेमधीं उभी तुमच्या प्रियकरा । तो सुदिन मजला भोगीन प्रिय आवडी । पिकल्या पानाचे वदनीं विडी । तूं बालत्वाचा० ॥ ३ ॥ काया परस्त्री परद्वारीं प्राण जसा । जाणून भुलला देह विषयाच्या रसा । गोरटीं धरीं मनगटीं । मंचकीं बसा । नामीं विठ्ठलकवीचा ठसा । गुणी परशराम छंद तऱ्हेतऱ्हेचे करी । येसू गंगारामाच्या रुढी । तूं बालत्वाचा ॥ ४ ॥

## लावणी १०२ वी.

किति सांगु स्वाहित नित हित गुज तुमचें पशी । संताप श्राप हा माफ करावा मर्शी । सांपडे वस्तु अंधारिं न मिळतां जशी ॥ धृ ॥ वाटतें आज मज चला एकांती निजूं । सामान सिद्ध मी सेजीं होते रुजूं । मम सौख्य धुरंधर निधी म्हणून किति भजूं । तुह्मा रहित मी पाय कुणाचे हो पुजूं । प्रीतिच्या स्थळीं भाषण बोलावें उजूं । मज विषयीं कांहीं तिळहि नका गजबजूं । आज्ञेंत सिद्ध मी कर जोडुन नित पुढें । पुण्याई सबळ यशवंत माझे चुडे । थोरा संगें दुर्बळास पाणी चढें । हा गंगा सिंधु संगम घडवा रशी । किति० ॥ १ ॥ किति सांगु

माझ्या सौभाग्या अधिपती । तप साधानें जैसें । सूर्य बिंबचे झांतीं । हा ढग वळला मज झालें मेघाकृती । घडिघडी विनंत्या किती करूं आवृत्तिं । मोहिले रुपाला चित्त चंचल वृत्ती । जळुं माझी लागेल । दृष्टमुख चंद्रांप्रती । कोणती सवत आशि मज-वर चढ भेटली । न विनवी बरिंच कीं तिची गोडि लागली । हे शास्त्र अवडतें वद्दारीत कोठली । गांठिवली वस्तु श्रम केल्या जातीनिशीं । किति० ॥ २ ॥ घ्या पदरीं दासी क्षमा करुनि मजला । पावन सखया करा देउन पायीं स्थलां । तुम्हि सिंधू माझे त्यजा न मज गंगेला मी हंसी तुम्ही राज हंस राजसा । फळ अमृत पाडा आलें सेवा रसां । तुजविण त्याची रुची । कळेल कां वायसां । नका अंत पाहूं जीव जाईल असा । मन हेतूं पुरवा गोड एकदां हसा । घ्या प्रेम दिलासा द्या शेवटचा ठसा । करिन कुर्वान प्राण तुजवर न कधिं भेटशी । किति० ॥३॥ किति करूं घोकणीं जीव चालला झुरुन । त्यजून देह जीव नेत्रिं राहिला उरून । पाहुन एकदां सख्यास डोळे भरून । खैरात जिवाची करून सख्या वरून । मग जावे वाटे आनंदाने मरून । पति अंतर फुटलें दया आलि गहिंवरून । मग प्रेमा-लिंगन दिधले वक्षीं धरून रसरंग उभयतीं लुटला एकीं करून । नामीं विठल गुरुचें पाय परशराम स्मरून । करि जडणा घडना बारि येसू गुणराशी । किति० ॥ ४ ॥

# लावणी १०३ वी.

बोले कावळा लवतो डोळा फुरफुरती बाही । गेले प्रवासीं घरीं कधीं येतील आमचे शिपाई ॥ धृ० ॥ गेल्या दिवसापासूनि कागदपत्र नाहीं आला सेदसा । झुरुझुरु पांजर झालें शरीर किती करूं अंदेसा । बिकट वाट बाई कठीण मुलूख तो खांदेसा । दुष्काळामुळें न चाले रस्ता पडला मंदेसा । ग्वालेरीवर तमाम फौजा एकवटली शाही । दक्षणच्या लोकां आसरा दुसरा कुठें नाहीं । बोले कावळा० ॥ १ ॥ भूमी मिरासे राजे रजवाडे करून निर विग्जी । जिकडे तिकडे टोपीवाला चहुंकडे इंग्रेजी । आतां कशाला जाऊन राहिला पोकळ अलगरजी । एक प्यादडीवर काम हत्यारें दिलीं सोडून बुरजी । वंश बुडवाई होईल वाटे लष्करचे पाई । रत्न कोटीच्या कोटीं जिरतील जीव जळून जाई । बोले कावळा० ॥२॥ अबरूसाठीं लाऊन राहिलें आंगाला माती । वाट पाहतां हात पायांच्या झाल्या वाती । एक सखे मी स्वप्न देखिलें आज आर्ध्या रातीं । चोळी पातळ हिरव्या बांगड्या दिल्या माझ्या हातीं । ओटी भरून हळदी कुंकूं माझ्या निढळा लावी । शकुन चांगला तुजला झाला आम्हा अवघ्या गाई । बोले कावळा० ॥ ३ ॥ दिल दिलासा देतें मी सखया फारच सुख मानी । अवचित स्वारी आली दणानित ऐकुन या कानीं । लगबगून उठली मिळालें

पाण्याचीं पाणी । नामीं विठल परशराम येसू ह्मणे चतुर शहाणी रामकृष्ण गुणी रामा गातो ठिकाण मूळ वावी । धनवट देशामध्यें महाशुर नक्षा सवाई । बोले कावळा० ॥ ४ ॥

## लावली १०४ वी.

तुझ्यापाशीं पत माझी गेली । चल दुरुन बोल मेल्या भगली ॥ धृ० ॥ मी ह्मटलें आधीं रे दादा । कुणि असेल शिपाई उमदा । ह्मणुन विषयाचा केला सौदा । नको येउ माझ्या घरी तिनदां । इथ्या दूर हो मेल्या चिंदा । अरे तुझी खोटाई कळली तुझ्या पासि पत माझी गेली ॥ १ ॥ ह्मटलें चतुर तूं अग मोठी परि अंतरिची मुळखोटीं । नारि तुझ्या प्रीतिच्या साठीं । आणविली पैठणी जारिकाठीं । अग मी ह्मटली रत्नपेटीं । निवडलीस सिंपल्या गांठीं । चल डवक चल नथनीवाली ॥ तुझ्या० ॥ २ ॥ अरे मी ह्मटलें राजहंस । निवडली कागाची रास । अरे चल दूरहो दुर बैस । झाली आशाची निर आस । तुजविणें कोण उपासी बसली ॥ तु० ॥ ३ ॥ अग आह्मा इष्क बाज लहरी । पाहिल्या अशा कैक नारी । नवल नाहि तूच एक परी । काय कमी असे भूवरीं । नामें विठुची मति गहिरी । परशराम येसु गुण लहिरी गुणि रामाचि तोड चमके बिजली ॥ तुझ्या ॥ ४ ॥

## लावणी १०५ वी.

हळ हळतें पक्षांवाणी। गेले टाकुन जिवलग स्वामी ॥धृ०॥ वय बारा वर्षां मधीं। कळि फुललि जशी जासुंदी। नव अमली चढली धुदी। चालली रुतूची संधि। करि भडका शरिरांमधी ॥ हळ० ॥ १ ॥ आले न्हाण मला सइबाई। पाण्या वांचुन सुकलिग जाई। पतिराज घरा मधिं नाहीं। नाहिं ढेकूण पिसू रगडावी। हुरहुर जीव निशि दिनीं। गेले० ॥ २॥ पढरीनाथ मसी पावले। पतिराज घरांसी आले। दिले काढुन सालु हुशाले। विठू परशराम कवि बोले। येसु महादु वावीवाले। जोड रामकृष्ण रामाची गुणी। गेले० ॥ ३ ॥

## लावणी १०६ वी.

असा कां केलास माझा त्याग। कुण्या गोष्टिंत धरिला राग ॥ धृ ॥ अंगीं तारुण्य ठस ठसले। जोबन न्हदयीं रसरसले। बाहेर काय लई दिसले। ह्मणून मन पर ठाइं बसले। असारे कां फिरशी जागोजाग ॥ कुण्या०॥ १ ॥ सख्या तुह्मी घरांकडे याल। उचलून कडच्यावरि घ्याल। प्रीतीनें मुख चुंबन द्याल। दोन्ही हातो जोबन माझें चुराल। घ्याल माझ्या नवतीचा सखया भोग ॥ कुण्या० ॥ २ ॥ बोली बोलुन चतुराईची। नामें विठ्ठलाच्या नामाची। छब न्यारी परशराम कविची। बिनतोड जढण येसुची। रामा किति वळवी। असे पातिम। कुण्या०॥३॥

# लावणी १०७ वी.

नाजुक रुपडें दिपडें ठिकडें जिकडे तिकडे असकारा । करा-डची का कोल्हापुरची देखण्यांत बाकी तारा ॥ धृ० ॥ शहर पुण्याच्या भररस्त्यामधें भरनवतीचा तवर नवा । चुडालकाकित जडाव अगदीं कोंदण केलें मधीं रवा । तंग चोळीवर रंग कुसुंबी गोरे गाल जसा नरम खवा । ऊर पदरानें झांकुन ठाकून किति चालशी नटून जिवा । तडें मकोडे समलेवाले भले लोक झाले गर्द चुरा । बिन घावाविण घायाळ घुमती एक एक नामी मोहरा । केलें वटून । नाजुक रुपडें० ॥ १ ॥ जोबन गहेरे नैन तारे जशी वीज गगनीं कडाडी । उदी शाल आंत साज भरजरी तंग काचोळी तडाडी । उभे थव्यावर थवे तुजसाठीं नवे पाखरूं फुलबाडी । शहरामधें पुकार पडली उभे सुभे माडोमाडीं । मोठे मोठे सावकार धनाढ्य कोट्यावधी पैका गहेरा । नजर कराया उभे फाकडे हातीं घेऊन पुतळ्या मोहरा । घे आधीं रोकड । नाजुक रुपडें०॥२॥ काजुम खावे माजूम मेवे हातीं पुढे बर्फी ताजी। शनवारांतून झुकत चालली केली हौद्यावर जीनबाजी । मोठे मोठे सरदार धारकरी दिले मोकलून भलते जी। जिकीर सोडून फकार झाले जो तो रुपाला नबाजी । आदितवार सोमवार पेठेंतून थेट निघाली करून त्वरा । जशी चमकली नंगी समशेर अलम पाहती भिरा भिरा । तुझ्याकडे ।

नाजुक रुपडें० ॥ ३ ॥ अक्कलकोटचे थेट राहणार चार खुट फिरलों शाही । थिजलों रिझलों पाहून रूपाला तुजसारखी दुसरी नाहीं । आह्मी शर्थी गर्ती निर्मळा साक्षभुत ईश्वर शाही कर कृष्णेचें स्नान दान हा आंगीं दोष सहसा नाहीं । विठू परशुराम ह्मणे स्वभुवना स्वस्थ जाय तूं आपल्या घरा । राम- कृष्ण गुणी रामा गातो एकनिष्ठ एक नेमी स्वरा । खूप खंबीर । नाजुक रुपडे ॥ ४ ॥

## लावणी १०८ वी.

पांचीप्राण तुजपाशीं लागले माझ्या मनमोहना । कधीं भेटशिल चतुर नयना ॥ धृ० ॥ बारा वर्षांची उंबर माझी नवती माझ्या आंगी । नवती माझ्या आंगीं रे रात्र वैऱ्यांची पलंगीं । साता पडद्या आंत माझा पलंग बिछाना । राजहंस पक्ष्याचा मिलाफ कररे भगवाना । झुरती राघोसाठीं मैना । पंच प्राण ॥ १ ॥ गोसाव्याचे रूप धरून आलों तुझ्या द्वारीं। नको परत लाऊंग माघारी । बत्तीस खिडक्या आहेत नारी । तुझ्या बंगल्याग शेजारीं । दोर लाऊनी येतों वरी । रात्रंदिवस हिंडतों फिरतों उपाय चालेना । झुरती राघोसाठीं मैना । पंच- प्राण ॥ २ ॥ गळ्यांतल्या ताईता तुला मी आंघुळ घालितें । गंध उगाळून ठेविते । पंक्तीच्या आधीं तुला मी भोजन वाढितें । पाट बसाया ठाकितें । वेळा लवंगा चिकण सुपाऱ्या

पानें तबक्रांत । विडा खुप रंगला मुखांत । झुरती राघोसाठीं मैना । पंचप्राण० ॥ ३ ॥ सोवळ्याचें निमित्त करून बसले आंगणांत । राहुट्या दिल्या खणांत । पाहुण्याच्या निमित्तें साजण बोलविला आंत । पुरविला मनचा मनोरथ । विठू परशराम गातो लावणी महशुर दक्षणांत । जरीचा पटका सेनांत झुरती राघोसाठीं मैना । पंचप्राण ॥ ४ ॥

## लावणी १०९ वी.

अजि बेत कराहो बंगल्याचा । हेत पुरवा राजसा मनचा ॥ धृ० ॥ मी सराईत बाळपणची । पुरवावि हौस मज मानचीं । घडि भरलि सख्या मम रुतुची । मशि कुस्ती करा पेंचाची । वरि भरा सवारि टूम घडिची । वजनांत भरा बिन धाडची । घ्या मुक. चपल हरणीचा ॥ अजि बेत० ॥ १ ॥ पोषाक करा कटिबंदी । महश्वरी पातळ मजकंदीं । करा पलंगिं पराची गादी । दोन अथर्नीं महाल सुरु खादी । घ्या विषय भोग तिथं फंदी । मी दासी तुमची बंदी । मशि छंद लागला तुमचा ॥ अजि० ॥ २ ॥ कोण सवत भेटली द्वारी । वाटली मजहुन ती प्यारी । मी कळी गुलाबी गहिरी । तुह्मी काय भटकतां सैरी । मी चटक चांदणी बंबहरी । कां जातां त्यजुन अंधारीं । मशिध्यासच कोरि चांदाचा ॥ अजि बेत० ॥ ३ ॥ जीव झालाग माझा बावडी । शरिराची झुरुन झाली काडी । मज रुचे न

हवेली माडी । नग दाग नको गन सोडि । पालेपाय लाखाची जोडि । झाले लीन पती जीव तुदचे ।। अजि वेल० ।। ४ ।। पति निष्ट पाहुनी हो सती । पनि निचा पालटली मती । सिंधूस गंगा जशि मिळती । आंगाचा तुच्या घिलगती । नामीं विठ्ठलाचे माधुरी अर्थी । परशराम गातसे गितीं । झगझगित छंद येसूचा ।। अजि वेल० ।। ५ ।।

## लावणी ११० वी.

निर्दय नसुन मन निठुर केलें माणलख्यानेगढणी । आशा सोडुन राहिला पती पाहून इतराचे चढणी ।। ध्रु० ।। सर्व सुख अनकूल असुनसा घरी सोदेवी सवती । बालमपटे बिटे चालती शिवद्या भवती । असा चंद्र लखलखीत जिवेचा चढती कळा आंगीं नवनी । जरवाची पोशाक आंगावर मुलाम नाजुक गवती । मजनाचुनिया माणसख्याला घडी एक करमत नवती कसा गेला टाकून मलाग बाई केली वज्राची छाती । ठाई ठाई चोपाळे बिछाने किनखापी छत मढुनी । असा विलासिक राघा गेला माझ्या हातींचा उडुनी । निर्दय० ।। १ ।। वाळून झालें कोळ सख्या मी अगदींच जैसी भालू । झोंप येईना पलगी सख्याविण किती घोंकण्या घालूं । महालांतून आंत बाहेर येतां जड झालें नग शालू । पिंजऱ्यांत कोंडिली मैना दुःख कोणापाशीं सांगुं । [illegible] झाली शरीरीं जाग

नका मशीं बोलूं । असें वाटतें घेऊन खंजीर हृदयामध्यें फेलुं । जसा मच्छ तरमळितो वाळूमध्यें मनच्या मनीं तरफडूनी । वाट पाहातां परी पक्ष्या ऐसें वाटतें जावें उडुनी । निर्दय ०॥२॥ पर मुलखी तुह्मी जाऊन राहिलां कांहींच येईना वार्ता । जासुद जोडच्या करून पाठवा असाल कोण्या प्रांता । उदास झालें चित्त आतां मी मिष्ट अन्न कडू खातां । जगेन कशी हा नाहीं भरवंसा असें भासलें चित्ता । असें संकटी पाव विठाई नवसूं कोणाशीं आतां । वणव्यामध्यें पडली हरणी तुजविण न दिसे त्राता । ही नविन झाली गाय सखे गडे गगन पडलें कडकडुन वाट पाहातां नेत्र शिणले जळो तुझी अशी कशी करणी । निर्दय०॥३॥ उदास झालें चित्त आतां मी विष खाऊनियां मरतें । त्यांच्या माझ्या स्वर्गीं भेटी होतील कळलें पुरतें । एकच धरला खंबीर संकट घालुन श्रीहरी वरतें । पूर्ण चंद्र पौर्णिमेस पाहातां आलें दर्षाला भरतें । नामी विठ्ठल परशराम येसुची अचुक जडणी । ऐकून झाले खुषी गडे चित्ताच्या पडल्या होडणी । निर्दय० ॥४॥

## लावली १११ वी.

सखा मशिं टाकुन गेला बाई । ऋतु दिवसांतगे ॥ धृ० ॥ नव्या नवतिचा पूर अंगिं भरलास । जाशि गंगा दोथडी । बार जातसें । कवटाळी सिंधू तिजला जसे । राजसे । आज उद्यां येतील म्हणून दम धरलासे । कुण्या सवतीच्या घरीं । गे ऊस

रात्रसे । दचकुनी पलंगिं उठतसे । मदन साथगे ॥सख्या०॥१॥ दिस जातो इकडे तिकड रात जाइना । गोष्टि विनोदी पतिच्या चित्त विसरेना । मोत्याचा चारा येऊन । हंस खाइना । हा पाडरसी भरला । राघु सेविना । मी फुललें कमळ न इकडे । भ्रमर येइना । काय कमी जाहले बाई नवसांतगे ॥ सखा० ॥ २ ॥ पक्कान्नहि खातां लागे कडू जहर । मउ सेजे वरती निजतां । उठती अंगीं शहर । पाहु नको अंत सखयारे । मदन करि कहर । किती कोमल मन तवराया । दयेचा बहर । कां नये कींव दासीची । लागुनी लहर । सेवेंत कायमी चुकलें क्षमा मी मागें ॥ सख्या० ॥ ३ ॥ गगनांत गिरक्या घाली । घार एकली । तशि सैरावैरा फिरतें । चित्त बाहुली । पतिसाठीं जीव मी देतें । मदंगा बळी । लावुनी लक्ष चरणीं खंजिर पाजळी । पति चरण स्मरण मग करण्या । उभी राहिली । मारावा उरीं इतक्यांत । पतीकर धरिगे ॥ सखा० ॥ ४ ॥ जसा सर्प कवटाळुनी धरी केतकिला । आलिंगुनि लवलाही । हृदयीं धरि तिला । पति पाय वंदुनी तिनें । पलंगी पुजिला । उपभोग उभयतां भोगून जीव सुखविला । नामि विठ्ठल कविच्या गुणें परशराम भला । गुणि कसून यशवंत काढी । माणिक मोतीग ॥ सखा० ॥ ५ ॥

## लावणी ११२ वी.

पंच प्राण तुजपाशीं सासऱ्या घेऊन जाते कुडी । खुशालीचें

वर्तमान लिहून कळवित जा हरघडी ॥ ध्रु० ॥ जधीपासून स्नेह तुमचा माझा वियोग नवता कधीं । मन इच्छित मन विलास केलें बसुन आनंदामधीं । जनाचार जन रूढी सासऱ्या पुसून जातें आधीं । दयालोभ मजवरी असुंद्या प्राणसख्या गुणनिधि । प्रीतिमधें आड पर्वत पडला विरहानळ धडधडी पंच प्राण० ॥ १ ॥ जिवनकळा तुह्मी मालक माझे पाहिल्या- पासून लळा । कधीं येऊन भेटन मागुती रुदन करी ढळढळा । वसंतकाळीं दूर अंतरलीं तुह्मास मी कोकिळा । हेंच दुःख वाटतें मनामधें मिठी घालतें गळा । थरथरा कांपे शरीर भरलीं हृदयामधीं हुडहुडी । पंच प्राण ॥ २ ॥ आसनी भोजनीं गगनीं शयनीं विसर पडेना तुझा । रात्रंदिस घोंकण्या रुपाच्या करितें मानसपूजा । गगन कडकडून पडुंद्या मजवर अंतरच्या हित- गुजा । आठवून कंठु राहूं चार दिस या भेटूं करूं मजा । नेत्र येती भरभरून बोलतां वेळीं वाचा बोबडी । पंचप्राण०॥३॥ आज्ञा घेऊन गेली सासऱ्या चतुर सखी गोमटी । प्रेम समाधी लाऊन तप करी बसून निर्जन मठी । पद जडणा चतुराई कवि नामीं विठ्ठलाची हातवटी । परशराम येसूचे वाजले तवले देश धनवटी । पुरुष प्रकृति वर्णन केलें छंद कडोविकडी । पंचप्राण ॥४॥

## लावणी ११३ वी.

माझे मंदिरी चाल चाल । मला झोका दिल्हास काल ॥ध्रु०॥

निर्दय मन कां निष्ठुर केलें । आधीं मर्धी मजला कसे फसविलें । वाट पाहूं पाहूं नेत्र शिणलें । प्रत्यक्ष माझे व्हाल व्हाल । मला झोंका दिल्हास काल । माझे मंदिरीं० ॥ १ ॥ आज गांठ पडली देवाभक्ताची । प्रीत जरी तोडाल आण रक्ताची । कुठवर सांगूं भाजा तुमची । कोण्या सवतीघरीं जाल । मला झोंका दिल्हास काल । माझे मंदिरीं ॥ २ ॥ नाना यत्न केले तुजसाठीं । उभी केव्हांची होतें मी कष्टी । अवचित स्वारी पडली दृष्टी । पाहून मन खुपी व्हाल । मला झोंका दिल्हास काल । माझे मंदिरीं ॥ ३ ॥ प्राणसखा म्हणे नार दूलंगी । बहु युक्तीनें भोगून पलंगीं । विठ्ठ परशराम म्हणे खुपरंगी । रामकृष्ण गुणी राम । मला झोंका दिल्हास काल । माझे मंदिरीं ॥ ४ ॥

## लावणी ११४ वी.

चल दुर कर मोहनाराणी बटावछुच्या । कुणि शास्त्रि वर्णिल्य कीर्ति जार जारिणीच्या ॥ धृ० ॥ बादशाही तख्त दिल्ली अति जुनाट जागा । शख जबर सिकंदर समशेर बांधुनी पागा । चौराजूचे लोक नोकरी लष्करी पागा ॥ बावण उमराव रखवालिस जागोजाग ॥ [ चाल ] ती दिल्ली पाहून लोक आले दख्खनचे लक्षावधी । कोण छेल बटाव हा कोण कुणाचा कुणी ऐकिला कधीं । धनवान रुप देखणा तोच कां होता मानवां मधीं । चौदा विद्या चौसष्ट कळा विक्रम

नयाच्या अर्धी । त्याची कीर्ति गाति ऐकली सकळ जन करून अवघी । एक अमदाबादची मोहनी ह्मणती होति गुजराथा मधीं । सिंदळकी करून गेली सति जसें कां मीठ मिळविलें दुधीं । काय कीर्ति केलि चांगली पांगली अपकीर्ति लोकांमधीं । मूळ मासेवांचून मिथ्या गोष्टी केच्या । कुणि ॥ १ ॥ साऱ्या पतिव्रतेमधि अनुसया केवढी । तिन्ही देव करूनि बालकं पुरीवली आवडी । आणखी हि पंच पतिव्रता निवडल्या निवडी । त्यांचीं नांवें घेतां जळती पापांची दुरडी । सीता तारा अहिल्या मंदोधरी आणि द्रौपदी । वेश्या गंडका पतिव्रत करितां झालि गंडका नदी । नदीमधीं त्या निपजताती शालिग्राम मूर्ती मुळ आधीं । निर्गुण निवृत्ति परमार्थाला एकपण नाहीं जुदी । प्रकृती पर पुरुषही जशी लुब्धली माशीमधीं । कडु गोड ते कडू सांगतां गोष्ट न लागे सुदी । वाल्मिक व्यासाच्या कवित्वें रंझिजाविली वाचा । कुणि० ॥ २ ॥ शीरपतीचे हसविले सुलोचनेनें ऐका । वैकुंठी विमानीं बैसुन गेली गणिका । तपकरी सुळांवर मांडव्य ऋषि एक बांका । भृगासि टोंचला कांटा बसला झोंका । [ चाल ] कासी राजाची कन्या सांडिल्या सुमती । सांडिलेल्या भ्रतारास जरा रक्तपिती होती । राजाची नाटकशाळा पाहून बसली प्रीति । पाटीमधी' घालून ती भोगाया घेउन चालली पती । अंधारिं रात्र काळोख मार्ग दिसेना जरा एक रती । त्यासि ढका लागतां शापिली पाहुन गर्भ मति । ऐक--

सांच बसली हट्टून अटीनें नेम करून ती साति। दहा दिवस कोंडला सूर्य वचनें तिच्या। कुणि ॥ ३ ॥ कुणि पुण्य परायण पुरुष हा वंशधारी। नित नेम कारिती जे त्या सिता सिद्धी हरी। जे अधम दुरात्मे असाति कलिंत अनाचारी। अवतार कलंकी धरून त्यासि संव्हारी [ चालः— ] परपुरुप ओळखल भाव धरुनिया मनीं। पति सोडुन अपुला रत झाल्या गोकुळच्या गवळणी। क्रिडा कारितां मांडिरास हरि त्यांसह वृंदाबनीं। तें वर्णन केलें भागवती महाराज व्यासांनी। त्यापुढें कथा काय दुरकर बटाव—मोहना कहाणी। विठु परशरामाचे तोंड मूळ पाहुनी। ऐकती चतुरजन सभा ठेविति मनिं खोदुनी। बावी—गांव नांव धनवटांत महशूर एक सरणी। रामकृष्ण रामाचा नव शिक्यावर कमच्या कुणि० ॥ ४ ॥

## लावणी ११५ वी.

टुमदार कोणाची छान। नवती भरज्यान। पुसारे आली कुठून। स्वरूपाचे तुटतां तारे कडा कड विजवा पडतील तुटून ॥ ध्रु० ॥ छबीदार। सुरत फांकडी। बुंद राखडी। जडून वर खडे। गुंफिली वेणी नागिणी लडारे गालांवर दोहींकडे। पान खाऊन। ओठ करी लाल। आंगावर शाल। झळकती चुडे। गजगती चाले हळु हळु उरींग जोबन उमटले हुडे ॥ चाल ॥

वय आटकर बांधा लहान । हरपलों पाहून झुकतहान । कर अर्पण पंचीप्राण । रणीं ग जाऊं कटून । स्वरुपाचे तुटती तारे कडा कड विजवा पडतील तुटून । डुमदार कोणाची ॥ १ ॥

वय बारा तेरात । ऐन आली भरांत । भुई ग ठेंगणी । दंडीं बाजुबंद बाहुट्या सरपहुच्या । हिरे जडले कंगणी । गगनांत चांदणी । टळक । मारशी । झळक । उभी ग आंगणीं । किती नटून थटून मारशील छनाछन नैनाच्या संगिणी । चाल ॥ झालों घावाविण घायाळ । झोंबला मिसारो व्याळ । जणूं टाहो करी कोयाळ । तूं नकळे घालशी माळ । कोणाला ग उठून । स्वरुपाचे तुटती तारे कडा कड विजवा पडतील तुटून । डुमदार कोणाची ॥२॥

तो दूर देश बंगाल । मुलुख गेलंग । गेलो सैलासैल । आलों करून । नार्दी धन दौलतीला कमी आणिले उंट मालाचे भरून । चाहील तें माग या घडी । देईन जिन घडी । ताजवा धरून । तुझे भारोभार देईन सले खैरात करीन तुजवरून । असा हेत मनामधें धरून राहिलों रुमाला भुलून ॥ चाल ॥ चार महिने तुजसाठीं टरून । मना दे पटून । स्वरुपाचे तुटती तारे कडा कड विजवा पडतील तुटून । डुमदार ॥ ३ ॥ घरीं चला राज-अंबिरा गुणगंभिरा । पाहिलें करून । वचनाचा करावा मान करीन सन्मान पलंगीं बसून । विठू परशरामाचा नक्षा चहुंकडे दक्ष पहा पहा जा पुसून । गातो रामकृष्ण रामाचें तोंड हे मूळ वस्तादापासून ॥ चाल ॥ नवशिके ठाउके वेमूर । चाल बदलून

गाती टीर । घरोघरीं वाजाविती डौर । जशी अक्षतिजेची गौर । काम तिर्शारे झटून । स्वरुपाचे तुटती तारे कडा कड विजवा पडतील तुटून । दुमदार० ॥ ४ ॥

## लावणी ११६ वी.

आतां संसाराची घुळधाणी । होशील कधीं शाहाणी ॥ ध्रु०॥

साता नवसाची मी गुजीग । माझी भुई फारच खुजीग । रुपडें ढगांत विजवा दुजी । नवरा केवळ शिजली भाजी । वयांत फारच लहानी । आतां संसाराची० ॥ १ ॥

वयांत बिजवर पती मजपुन दूर निजे । पाहून परनारीवर रिझे । जीव हा लाहीवाणी भुजे । माझें रगत तिळ तिळ झिजे । बाळक लई तान्ही । आतां संसाराची० ॥ २ ॥

लग्नाआधींच मी गर्भिण । एकनळ मुलगे झाले तीन । त्यावर प्राणपतीचें मन । बाळक लइ तान्ही । आतां संसाराची० ॥ ३ ॥

अशीग मी संसारी एक तुका । खर्च नाहीं केला रुका । भुलाविलें जन पाहाती । टकमका विठू परशराम गुण वाणीरे । वयांत फारच लहानी । आतां संसाराची० ॥ ४ ॥

## लावणी ११७ वी.

चौ भंवतालचा उभ्या वायका । त्यांत नारी तूं जळभरशी । नक्षत्रिं तारका सरशी ॥ धृ० ॥ पदर जरीचा धाटा घेऊन

कर्दळी लवली जशी । घोळ मिऱ्या जपुन धरशी ॥ ठळक हातीं चुडे झळाळी । डागिन्यांत घवघवशीं । रुपरंभा केवळ इवशी । बाक्या वेळां दंडी माळा गळ्यांत गळसरि ठुशीं । कटि बारिक रेखिव जशी । सार मंथुनी ब्रम्हें स्वकरीं सर्व सार एक मुशीं । काय अठवलें जग दिपवाया । जणु झाली सातां नवशी । नक्षत्रिं० ॥ १ ॥ देश आमचा प्रांत माळवा । मूळ दक्षणचें राहाणार । शहर पुण्याला जाणार । छान छबेली सुरत फाकडी पुढें उमती मधिं येणार । आशि भेट न कधिं होणार । तुशि बोलाया भीड न लोटे । जिवालागली चुरचुरशी । डोल रुप्याचा दोर रेशमी । हळूच पाणी भरशी । नक्षत्रिं० ॥ २ ॥ लहान पराई । उंबर कवळी । वर्षे बारा तेराची । प्रत्यक्ष शापित अप्स-राची । पाहुन पराई । आलिस पाण्या । दिसते कोणा थोराची किंवा नभांतिल तारांची । पाज आम्हांला शीतल पाणी धर्म घडेल धर्मीं सरशीं । घडि घडि ठरुनी काढुन पाणी । नाकीं नथनीं करि सरशीं । नक्षत्रिं० ॥ ३ ॥ पाजुं तुम्हाला कैसी पाणी । नार गातिं मी अबरूची । जन पाहेल जाइल रुची । चतुर सखा मग नेला महालीं । करी विनंती गवरूची । चंदन बाळा अत्तर गुलाब । सर्व तयारी शेजाची । एक चित्त भोग यारूची । पुरली आशा । आला दिलासा । विठ्ठल गुरुच्या पायाशीं । परशराम गुणि येसू गातो । छंद तऱ्हेचे चौभाषी । नक्षत्रिं० ॥ ४ ॥

# लावणी ११८ वी.

अस्सल जरदी घोडी भिवरथडी वर बसली चांदणी । कान कळाशीं फेरफटक्यामधीं कोणी तरी दिली आंदणी ॥ ध्रु० ॥ जडीत जोहार ल्याली आंगावर नवी नवतीचा नवा । वाळे रुमझुम पाई छुम छुम बोलती जणू चिमणीचा चिवचिवा । चोळी अंजिरी जरी कांठाची रंग कटारी नवा । कवळी कर्दळी पिवळी कांति मृदु मिन्याचा रवा । चिरी कुंकाची बारीक निढळीं घाम आला डवढवा । नेत्रीं अंजनी चित्री बाहुल्या पाहुनि आवरली जीवा । दोन्ही बोटीं मुद्रिका दाट हातीं लखलखाट झळकती चुडे । [ चाः– ] वर नीळ पाचुचे खडे । रस्त्यांत उभी जाऊन नटून जशी वीज तुटून कडकडून पडे । फांकली प्रभा चहूंकडे । मनसुबे करुनिया सुभे राहिले उभे तुजसाठीं गडे । झाले गर्द मिशा मर्द वेडे । कोण्या हौशाची गजगामिनी रंभा उर्वशी पुढें काय उणीं । फिरवी गरगराट नेत्र धुनी । आरोपार केली जखम जिव्हारीं दुणी ) घालून अक्षई तुजसाठीं धुणी । वाटतें तप करावें बसून वनीं । हांसून बोलतां दंत झांकिती जशा चुन्याच्या कोंदणी । अस्सल जरंदी घोडी भिवरथडी वर बसली चांदणी । कान० ॥ १ ॥ गंडापट्टा गेंद जोडच्या रेशमी फुंदणी लाऊन झेला । शिरी किनखापी कलगी मोराची मिना वरून फिरविला ।

उंच मखमाल। नक्षी कलाबुत चार नाम ठेविला । तळ थांबेना पळभर भूमीवर सडकेचा दुलदुला । सजऊन वजऊन नीट नेटकी अमोल चढली मोला । सरंजाम वर तसाच कंठा कोणी नजराणा दिला । सरसाऊन पदर नीट घेऊन । स्वार वर होऊन बनून फाकडी मस्तकीं सुंदर खडी । पुढें शिबंदाचा थाट सभोंवता दाट पायाला उडी । राहिले उभे चढवडी । गोरे गाल कीं ही कश । गुलाबी गाल रंगली विडी । नाजुक फूलांची छडी । गरजु आलों हेत मनामधें धरून । सखे राहिलों रूपाला झुरून । क्षणभर उभी राहे बोल मुख भरून । व्हावें बोलणें कशाला दुरून । घेशील जीव पण जिवाशीं हिरून । गडे ती घडी येईना फिरून । जसा सर्पानें प्राण अर्पिला मैलागिरीं चंदनीं । कानकळाशीं० ॥ २ ॥ फुलबागेची थेट खेट केली प्राणसख्या मित्रकरा । मागुनया तुम्ही बसून सद्नीं करून जाता त्वरा । गेले घुलकावित घोडी फाकडी वळवाचा फटकारा । रमणुक जागा पाहून उतरले जल्द अरास करा । वसंतकाळीं ऐन उन्हाळा राजविलासी खरा । केशर कस्तुरी गंध उगाळून नक्षी तबकडी भरा । बे बहार गुलाबी सरू मोती सरू चंपक मोगरा । डवना मरवा गुलतुरा । बाळागीर पडदे आणवा । मंडप ताणवा । कनाती चिरा । शिडकावा विलासी करा । मधें बैठक गुणगंभिरा । राजअंबिरा सगुण सुंदरा । पाहतसे मार्ग भिराभिरा । रंगाचे हौद गहिरे भरून । उडती कारंजी फुगारे

धरून । स्वारी सजनाची देखिली दुरून । अवघें चित्त मन गेलें हरून । केला ईश्वर इच्छा पुरून । टाकी लिंबलोण उतरून । पाहून तुझा मुखचंद्र राजसा गुतले बहु वंदणी । कानकळाशी० ॥ ३ ॥ हत वत संकेत होता तो आला उभयतां घडून । करून गड बाग सभवतीं पडद चिकाचे सोडून । रंग खेळणें झालें आनंदें करी अर्जी कर जोडून । निज अंकीं बसवावें राजसा निःशक्ति गेली भिडून । लफेदार वंच बसंता पातळ हातीं दिली घडी मोडून । पानें गंजेरी पुढें ठेवितसे तपकामधीं निवडून । चारी प्रहर कामिली रात्र । राजीवनेत्रा । बागामधीं मोहिला चतुर गुणनिधी । झाली इच्छा मनाची पुरून । बोला मुख भरून । पार भवनदी न्या उतरून मजला आधीं । करि विलास नानापरी । उभी गुलपरी । नमूनया पदीं । कर जोडून सेवेमधीं । लक्ष हे पक्षाच्या तयापरी । टेऊन राहिलें सख्या तुजवरी । नामीं विठ्ठलचा नक्षा दुरी । परशराम येसू नित्य वर्णन करी । बावीस्थळ दक्षिण गोदेतिरीं । पांचा कोसांचा छट्टा दुरी । रामकृष्ण गुणी रामा गातो स्वर अक्षरें बांधुनीं । कानकळाशी फेरफटक्यामधीं कोणी तरी दिली आंदणी । कानकळाशी० ॥ ४ ॥

## लावणी ११९ वी.

छबीदार सुरत गुलपरी । गेंद दोन उरीं । नयनांचा खोचली

सुरी । जखम केली पुरी ॥ ध्रु० ॥ पाहून मुखचंद्र कळा । रोखेला टिळा । दुल्लड मोत्यांची गळा स्वर कोकीळा । नेसुनी जरी सोनवळा । रंग पिवळा । गोरी कांती करी झळझळा । बहार कोवळा । पोषाग नवे नित्य करी । कंचुकी उरीं नयनांची खोचली सुरी । जखम केली पुरी । छबीदार ॥ १ ॥

जन नाकेबंदी करून । दुरुस्ता भरून । पहावया मार्ग तुझा धरून । राही चाले दुरून । कशी चपळा तुटली वरून ! उदेला अरूण । धरी घोळ निऱ्या आवरून । पदर सावरून । जडत्रिल्या चुन्या बेसरी । करून कुसरी । नयनांची खोचली सुरी जखम केली पुरी । छबीदार सुरत गुलपरी । गेंद दोन उरीं ॥ २ ॥ डुब डागिन्यांत खुप सजून । रूपाला रिझून । सारी सभा राहिली थिजून । मनीं गजबजून । सौंदर्य खाण दुनरी । उमज अंतरीं । नयनांची खोचली सुरी । जखम केली पुरी । छबीदार ॥ ३ ॥ शरशद्ध वर्मी भेदले । चित्त वेधले । तुम्ही कोण कुठले शोधिले हें उतर दिधलें । शिव सांब आराधिलें म्हणुन लाधलें । चित्तवृत्ति मन बोधिले । काय साधलें । विठ्ठल लक्ष तूं धरी । बोध अंतरीं । परशरामी कविता पुरी छंद मुक्त रसभरी । छबि० ॥ ४ ॥

## लावणी १२० वी.

अरे मी उभी केव्हांची द्वारीं । करमिली रात मंदिरांत कुणा

शेजारीं ॥ धृ० ॥ तूं दगलबाज बैमाना अरे दुस्माना । कांपि-ल्यास कितिकांच्या माना । अरे दुस्माना । घिरघ्या घालुन मोहिलेंस माझ्या प्राणा । घेतलेस हिरुनिया देहभाना । ही इष्क सुळाची पोळी आणा कीं ध्याना । तूं खूप असशिल चतुर शहाणा । सुख नाहिं मला दुख या संसारी जाणभारी । अरे० ॥ १ ॥ काल घरचे स्त्रियेस दिवस होतां चौथा । गे गुंतलों सखे त्या करितां । कार्या कारण रत तिशिं झालों एकांता । मी शास्त्र मार्ग केली वार्ता । हा वख्त चुकविता रुजुं नाहीं गे भगवंता । हें दूषण अपुल्या माथां । हा देह ठेवि जीव तारी अथवा मारी अरे० ॥ २ ॥ मोलाचें बोलणें तुझ्या मनिं बहु बसलें । रे छिन्न भिन्न अवघें दिसलें । मासेचें विचारे काल तुम्हा मी पुसलें । कपट्याचें कपटपण दिसलें । सख्या अन्याय झाला । बोलुन मी फसलें । घ्या जीव सन्मुख मी बसलें । खरें कीं खोटें साक्ष देतिल परभारी । अरे० ॥ ३ ॥ झालि दासि माया विवेकाची जन्म जाया । प्रकृति पुरुषाची भार्या । एक चित्तिं रत होति प्रेम सुख भोगाया । विवेकानें त्याजिली माया । नामें विठ्ठलाचे छंद भवपार जाया । खूप मधूर गोड सेवाया । वावि गांव धन-वटीं परशरामीं महशुरीं । अरे० ॥ ४ ॥

## लावणी १२१ वी.

बाहिली ती गंगा राहिलें तीर्थ मग आतां तरी होय शहाणा ।

कारे घर वर्जिले वैमाना ॥ ध्रु० ॥ नमून वस्त्र बरोबरीचें पाहतां । माझें रूप पाहुनी भाळलास तुझे हातीं कोणी गुळ दिला होता । विषय तुला आधीं ठाऊक नवता । सारे गांवभर तुझी काय विश्वाद् कशी येईन हातां ॥ चाल ॥ फिरूं रे नको माझ्या भवता भवता । पाडलास फंद लाऊन ममता ! तूं कां वर्जिलें गणगोता! करून बाहाणा । वाहिली ॥ १ ॥ अजून मज सोन्याच्या बाह्या । झालें उतरट वस्त्र नाजुक पुतळी येती मज जन पाहाया ॥ चाल ॥ पुरवलें तुला सख्ये घ्याया । मजवर तुझी काय छपराची छाया । तुझें मन रुतलें परठाया । त्यामधी माझें काय गेलें वाया । गरजी कुत्रीवर माया । हातीं अन्न । वाहिली ॥ २ ॥ आढळ मीत चालवणें तुजला । ज्या कोणी मिळे तुला जी नवीन तसाच राहा निजला ॥ चाल ॥ धरूनि मी नको राहूं अनबुजला । आहे कीं नाहीं सांग तटका तोडुनी । विपकी गडी मनांत गजबजसा । झाली आग जसा पापड भुजला । कोणी तरी समजावा याजला । चतुर शाहाणा । वाहिली ॥ ३ ॥ नारी ग तूं शिंदीचें झाड । तळ कोंकणची असे ताड । मी नको करूं मन मोड । हासून तुझा शद्ब काय गोड । जन निंदील निंदूंदे करून द्वाव गाढवाचे घोडें ॥ चाल ॥ कवीरे नामें विट्ठलचें तोड परशराम येसू करी निवड । रामकृष्ण रामाची जोड । पाहून दैना । वाहिली ॥ ४ ॥

## लावणी १२२ वी.

मुंबई । वसई । पैक्याचें नगर । दर महिन्या वांटती पगार ॥ धृ० ॥ ते शिबंदी झालें गबर ॥ सजना ॥ चाल धराया रोजगार । घरीं झाले माझे बहु हाल । नाकामधें नथनिं तरि घाल ॥ मुंबई० ॥ १ ॥ जणूं आणीबाणिच्या रकमा । कर मुलुख सर धन्याच्या हुकमा । घरिं बसुन काय मिळणार । गत बरि न बाई होणार ॥ मुंबई० ॥ २ ॥ गवत्या गोम्याच्या पडली फंदीं । नित्य भरडीत बसली चंदी । फसवून गेली म्हाला मंदीं । मेला दुस्मान मला रोज दंडीं ॥ मुंबई० ॥ ३ ॥ बाइल बुद्धिनें भरका भरला । रोजगार अटीनें धरला । खांदीं बुंदक धरतां हरला । पुढें विठ्ठल नामीं मग विरला । परशराम येसुचे ख्याल अनिवार । सजना चाल कराया रोजगार मुंबई० ॥ ४ ॥

## लावणी १२३ वी.

मज पुतळीच्या हारा । भरलास रागें कां फंदी शिरा ॥धृ०॥ अंतर काय पडलें सांगा मला । मज कलगीच्या लाला । अर्धांगीं मी जडलें तुला । माझ्या गुलाबाच्या फुला । येतां जातां मशीं तूं बोल शिरा । मज पुतळीच्या हारा भरलास रागें कां फंदी शिरा ॥ १ ॥ रजपुतें घेऊन आपल्या मांडी जवळ । मुखडा पाहान मी निवळ । पंचप्राण तुम्ही माझे केवळ ।

असें वाटतें घालावी कवळ । इच्छा मनची करा हेतु पुरा । मज पुतळीच्या हारा । भरलास रागे कां फंदी शिरा । मज पुतळीच्या हारा ॥ २ ॥ आशावंताची आशा मोडूं नका । गडे माना दिलभर सखा । घेऊन तुम्ही मजला मुका । प्रीतीनें घ्यावा माझा मुका । येतें मी बरोबर नखऱ्यानें शिरा । मज पुतळीच्या हारा । भरलास रागेकां फंदी शिरा ॥ ३ ॥ आल्या लिंबोळ्या पाडा जशा । चिरा उखळा माझा राव नशा । घेऊन तुम्ही पलंगावर बसा । चौऱ्याऐंसीं आसनें कसा । नामीं विठ्ठलाचे छंद शिरा । मज पुतळीच्या हारा । भरलास रागे कां फंदी शिरा ॥ ४ ॥

## लावणी १२४ वी.

धावा धावा सख्यानो धावा । कोणी प्राणवल्लभाप्रती आणून मशी दावा ॥ धृ० ॥ ईश्वरें दिलें रूप तारा । रूप लावण्याची नवाळी वर्षें बारा । वाहतसे नेत्रीं जळधारा । कोणी मंद मंद मशीं घाला शीतळ वारा । रंगमहालीं होतो उबारा । कोणी भिषक्कर आणवा राजेंद्राचा थारा । शृंगार कशाला व्हावा । कोणी प्राण वल्लभाप्रती आणून मशी दावा । धावा धावा० ॥१॥ जातसे समय ऋतुसंधि । वय नूतन माझी कवळी खंदी । जासुंदी शृंगार कंचुकी आधीं । झीट झिटकारून काढा शिरीं फुल बिंदी । चंद्र चकोर जशी बंदी । यापरी भाव किती पाहावा

खोली रुंदी । विष भरून आणून पुढें ठेवा । धावा० ॥ २ ॥ चौताळावर जुमखाने । ठाई ठाई बैठका जाडित मिन्याचे ऐने । गज हस्तीचे रथखाने । याग मैना सळया बोलती मंजुळवाणे । नग तऱ्हतऱ्हेचे लेणें । एक रायावांचून आवघेच मज किलवाणे । प्रालब्ध पूर्वीचा ठेवा । कोणी प्राणवल्लभाप्रती आणून मशी दावा । धावा धावा० ॥ २ ॥ बरखास कचेऱ्या झाल्या । एकांतीं समया लाऊन आर्जविते झल्या । सकुमार फुलाच्च्या झेल्या । एकजीव उभयता होऊन कल्पना हरल्या । विषयाच्च्या रमुजा केल्या । कवि नामीं विठ्ठल अचुक जड्या जडल्या । छंद परशराम करी अर्जवा । कोणी प्राणवलभाप्रती आणून मशी दावा । धावा धावा० ॥ ३ ॥

## लावणी १२५ वी.

दंतजशा हिरकण्या चमकती रत्नाच्च्या राशी । घडिघडी पहासी मुख हातीं घेउनिया अरसी ॥ धृ० ॥ गौरवर्णावर सुवर्ण लबाळी अळंकार सारे । धनुष्याकृति भिंवया कमानि नयन खुळे तारे । पाईघोंळ रुमझुमति सांखळया चालालि गजभारे । गेंद बुंददें उरस्थळिं कांचोळीवर भिंगे सारे । तुरे दार नथ शिरा फिरावी आधरानें धरसी । दंतजशा हिरकण्या चमकती । रत्नांच्च्या राशी । घडो० ॥ १ ॥ चिंचपान वर छंचि नेसली पातळ जरतारी । किसनीच्या बांगड्या पुढें गोट

सुवर्ण चारी । महाल तुझा तिनताल त्यावर बैठक बेबहारी ।
कुरळे केस शिरी सरळ मोकळे । फुलमोतीं सारे । करशिल गायन कळा गळा कोकिळा ।निपट निरसा । दंतजशा० ॥ २ ॥ पिवळी कांति सुकुमार फार नादर जाशि देवानें घडली । चांदाची चांदणी कोंदणी चुनी जशी जडली । फुलशेवंती नूतन नवती । उभारि मधें चढली । विसर्नाचें बाजारीं हजारो दुरस्त उडी घडली । ज्यावर होशिल फिदा तयाची दैव दशा सरली । दंत० ॥ ३ ॥ अंगसंग नारी घडो फाकडे ही इच्छा अमुची । वचन मान कर जरा इशारत उणिव न चैनीची । तनमन झाले खुषी दास मी प्राणसख्या तुमची । नामें विठूचे बोल । रत्न समताल । पैसाचा । परशराम जडणी चौबाजूनी जाशि घडिव खुरची । दंत० ॥ ४ ॥

## लावणी १२६ वी.

रूप चांदाचा टुकडा मुखडा पाहून मन धाले । अमदाबाद कीं शहर बडोदें पुसा कोठील राहणेवाले ॥ ध्रु० ॥ भला घोडा अस्सल काबुलचा लाल बोर टाकम तुर्की । जडाव जीन वर स्वार होऊनिया शिंदेशाही बांधून फिरकी । चतुर सुलक्षण बत्तीस लक्षणी धन दौलत घरीं महामुरकी । असा विलासिक रुसून प्रवासा आले दिल्हें सोडून घर वीं । भरगच्ची पोशाक

आंगावर झका झोक पाहिला भरकी । मुखडा पाहून चंद्री लागली गरर गरर आली गिरकी । उभे थोर जनलोक शाहाण्या पुढें शेवकजन हुदेवाले । टिळा कस्तुरी गंध केशरी घामानें ओलें झालें । दिलें चोपून । रूप चांदाचा० ॥ १ ॥ कडें तोडे कुल जडाव अगदीं अबदागिरीची वर छाया । जसा अभाळीं सूर्य झांकला रिघाव होईना मुख पाह्या । हुन्नर लढवा ठरवा वरवा जागे सख्यांनो लवलाह्या । त्वरें आणागे फंदी फाकडा एक रात्रीं महालीं राह्या । कबुल सुरत ह्मणून तन भुल झाले अर्पण केली ही काया । कटून मरावें पहा यशाच्या कीर्ति उरलथा मार्गे गाया । लाल नैन दोन्ही तारे चमकती विषयाचे घोकून भाले । कोणी जगवा । रूप चांदाचा ० ॥ २ ॥ एकी- पुढें एक जल्द धावती एक्या जावामधीं केली अर्जी । मुकाम ठरवून आलें सांगाया प्रसन्न झाली मज मर्जी । सरंजाम आधीं पुढें पाठविला तूप साकर मैदा सोजी । मानकरी तुह्मी पांचि मुशाफर गरिबाची भाकर भाजी । हार गजरे गुंफून ठेविले शेज फुलांची केली ताजी । कधीं दिस जाईल रात्र होईल देह दानावर उदार जी । थाट करून मी वाट पहातसें पडदे चिकाचे करून खुले । चव्हतर्फा लाविले गलास जिकडे तिकडे उजाले करी आरास । रूप चांदाचा० ॥ ३ ॥ महालीं आला खुष झोकाखालीं वदनीं सुवासिक घेऊन विडा । मज आळशावर अंगा वळली ऋगानुबंध पाहिला जोडा । सन्मानानें मंचकीं

बसविला समसमान मजला जोडा । स्वस्थ असा राजसा कल्पना चित्तांतील अवघी सोडा । नामीं विठ्ठल परशराम ह्मणे एक भाव मनीं करून धडा । रामकृष्ण गुणी रामा गातो ऐकुन नवखिक मनीं झुरा । वावी गांव राजाची जागा कवित्वास जन आनवले । आधीं मूळचें । रूप चांदाचा० ॥ ४ ॥

## लावणी १२७ वी.

मोहनीराज । महाराज शाम-सुंदरा सांवळी तनू । नैवासें केलें ह्मणून नेवासें सकळ लागले म्हणूं ॥ धृ० ॥ देव दानवें । मिळून केलें समुद्र मंथन जधीं । शेषाचा दोर लावला । मंदर-चळाची रवी । हात पायाची । करून मालढी । नाटक हरि लाघवी । पृथ्वि लागली । डबूं कच्छ रुप । देवें धरिलें तधीं । सुरापान अमृत वाटितां । कळूं लागली दुही । सुर पंक्ती मधिं राहु बैसला । चंद्रे दावित खुणूं । तानोडानें शीर छेदिलें । निवडुन जैसें कणूं । मोहनीराज० ॥ १ ॥ मुळ द्वारांतुन मुळी निघाली । कंठांतुनि प्रवरा । रतन गडापाशिं । रत्नें वांटुन । दिधली सुरासुरां । राहु मारिला । म्हणून राहुरी । वस्ति मुळेच्या तिरां । टोभ्यापाशीं । संगम झाला । स्थापुन सिद्धेश्वरा । हरी हरांची दोन्ही स्थानें । जुनाट परंपरा । अमृतांची धार बारिक । वाहे प्रवरानिरां । पुण्यप्राणी असेल कोणी । योगि त्यांघडेल न्हाउन । मोहनीराज । महाराज० ॥ २ ॥

# लावणी १२८ वी.

माझे पंच प्राण लागले सख्या तुजपाशीं । प्राणावर झाले उदार अहो गुणराशी ।। धृ० ।। प्रीत चंद्र चकोरापरी अंतरीं ध्यातां । जीव झाला वावडी तुला न दृष्टी पाहातां । परभारें यांकडे दुरून दुरून कां जातां । विष अमृताचे केलें भासलें चित्ता ।। चाल ।। यास्तव मी पडलें झुरणीं । रात्रंदिवस तुमच्या स्मरणीं । वाटतें मरावें मरणी । भाळलें रुपाला पाहुन जशी मधमाशी । दे अभय दान बेमान होऊं नये गुणराशी । माझे पंचप्राण०।।१।। तुह्मी कल्पवृक्ष जरी पाहून शीतळ छाया । कल्पिल्या कल्पना अवघ्याच गेल्या वाया । मन निर्दय निष्ठुर कठीण केलेंस राया । कडेलोट करून मशीं जातां परक्या ठायां ।। चाल ।। कोण विवशी मिळाली तुजला । मजहून चढी तिशीं रिझला । खरें सांग सख्या कां थिजला । चंदनापरिस देह झिजला लक्ष तुजपाशीं । प्राणावर झालें उदार अहो गुणराशी ।। २ ।। नवी नवतीचा भार आंगी आला रस पाडा । एकांती चला मुखव्यसनी कल्पना सोडा । तुह्मी राजहंस मी हंसी नाजुक जोडा । सायाशीं संगत घडली पूर्वींचा तोडा ।। चाल ।। हीत शरय हातीं धरल्याची । भारक्रिया पदरीं भरल्याची । अपकीर्ति मागें सरल्याची । जय लाभ यश घ्या पदरीं मज गरिबाशीं । प्राणावर झालें उदार अहो गुणराशी ।। ३ ।। एकांती क्रिया क्या केल्या मनोमन गाहीं । जसे जहाजा वरलें पक्षी दुजें स्थळ

नाहीं । समजला चतूर फाकडा आपल्या देहीं । अबला आलिंगून हृदईं धरी लवलाही ॥ चाल ॥ एकाचित्तीं होऊन रत झालें । नामीं विठ्ठल कवीच्या बोले । गाती परशराम सुरताले । रामकृष्ण रामा वावीवाले । छंद चवमासी । चहूंकडे ठसा आहे महासूर धनवट देशी । माझे पंच प्राण लागले सख्या तुजपाशीं । प्राणावर झालें उदार अहो गुणराशी ॥ ४ ॥

## लावणी १२९ वी.

लांब लावणी । रूप लावणी । कलि सत्वाचि लावणी । चतुर भाग्यवान् । दिसेल त्यांना । उकिरडी चिंतामणी ॥धृ०॥ निराकारही निरगुण नव्हते । कांहींच नव्हतें जधीं ॥ शुन्य अकारा येऊन पसारा । नव्या सृष्टिचा जधीं ॥ नार निवृत्ति । पुरुष प्रकृति । पंचतत्व त्या अधीं ॥ ब्रह्मांडाची रचना झाली । सुरवर हरिहर विधी ॥ मूळबीज हे मिश्रित अंकुर । इच्छा रचने मधीं ॥ साधुसंत निरगूण मिळाले महान तपस्वी गुणी । चतुर० ॥१॥ पंचमुखीं मुळ ब्रह्मा होतां । चित्त देऊन ऐका ॥ प्रथम निघाला रुग्वेद सगळा । दर्दुर मुखांतुनि निका ॥ अश्व मुखीं यजुर्वेद निघे । सामवेद श्वा मुखा ॥ चतुर्थ वेद अथर्वण ऐका । आला मुखीं जंबुका ॥ चहुवेदां चार । वाणी ह्मणती । शास्त्राधार हा पक्का ॥ चहुवेदीं षटशास्त्रें झालीं । अंकुरें आद्य लावणी । चतुर० ॥ २ ॥ षट् शास्त्राचें मंथन केलें । अभ्यास नारा-

षणी ॥ ज्ञान गभस्ती । जणू घातली । अकाशास गवसणी ॥ सदाचार सध्दर्म वांटा । जाया सगुण निर्गुण । पुराण अठरा लिहून ठेविले । सेवाया बुधजनी । महाभारत भागवत जैसे । चंद्र सूर्य हे गगनीं । चतुर० ॥ ३ ॥ कली प्रगटतां धर्म बुडाला । तत्व झालें मनोमनीं ॥ ज्ञानेश्वर रूप नटेश नटला । ज्ञान दिलें खोउनि ॥ तुकाराम श्रीएकनाथ हे । अवतरले भक्तमणी । उद्धव अक्रुर जना आल । गेले करून लावणी । कथा किर्तनीं अभंग गाउनि । तत्व दिलें गोवुनी ॥ चतुर० ॥४॥ श्रुति स्मृती षट्शास्त्रें आणिक । वेद खंडें करुनी ॥ धर्माचा बडिवार वानिला । तत्व करिति लावणी ॥ नामें विठ्ठल गुरु प्रसादें । शास्त्र पाहुन लावणी ॥ एक अभंगीं गाणें गाउनि । परशराम करि जडणी ॥ पाहिल त्याला । दिसेल नयनीं । उकीरडिं चिंतामणी । चतुर० ॥ ५ ॥

## लावणी १३० वी.

चाल दूर होय क्रिया नष्टा । समज तुझें ज्ञान दुष्टा ॥ध्रु०॥ तुझ्या बुद्धीस भ्रंश पडला । हिरा म्यां ह्मटला सांपडला । अंतरीं खोटा उलगडा । राजहंस मनिं माझ्या जडला । कावळ्या दूर जाई भ्रष्टा । अरे चाल जाई क्रीया नष्टा । कळलें तुझें ज्ञान० ॥ ॥१॥ आह्मीं गे ह्मटलें चतुर तूं नार । कपटी हृदयीं निवडलीस फार । धटी पैठणी आणूं गुलजार । तुझ्या सेवेसी दासी दोनचार । मान कर, नको करूं चेष्टा । अरे चाल जाई क्रियानष्टा ।

कळलें जाइ तुझें० ।। २ ।। तुझ्या शरीराची येती दुर्गंधी । फुगीर दोडका बायकांमधीं । डोईला जाळें तुटकी चिंधी । दोन प्रहरची कठीण तुज संधी । छंदीं तूं नको पडूं नादिष्टा । अरे चाल जाई क्रीया नष्टा । कळलें तुझें ज्ञान० ।। ३ ।। आगे आह्मी फंदी फाकडे गडी । पाहिल्या नारी तुझ्याहून चढा । विठ्ठल परशुराम छंद जडी । गुणी रामकृष्ण राया बिनखर्डा । दुगाणी दूर पैसा खोटा । अरे चाल जाई क्रियानष्टा ॥ ४ ॥

## लावणी १३१ वी.

पोषाग जरीग जरबाब करुनियां जरा न वर पाहासी । मुखडाग तुझा बुंद सदा कैफांत धुंद राहशी ।। ध्रु० ।। निर्मळ मुखडा चंद्रकार । सरळ नाकाची शोभती धार । घडविली नाकीं नथणी झुमकेदार । वर चमचमाट सरजे चार । नेसली पातळ उंच जरतार । गळ्यामधीं नव पदरांचा हार । कंठ कोकिळा विण्याची तार । सणासण मारी नैनाचे मार । जखम विषयाची काळजापर । गडे ते समर्थांच होतो ठार । अशी लक्षांमध्यें निवडली नार । पहाती परस्परें जन सरदार । मूर्त निर्मिता धन्य करतार । किंवा उर्वशीचा अवतार भाग्य त्यार्शी । पोषाक जरीग जरबावे करुनियां जरा न वर पाहशी । मुखडाग तुझा बुंद सदा कैंफांत धुंद राहशी । पोषाख० ।। १ ।। मोती दैवानें खातो हंस । त्यावर नाहीं कोणाचा घउस ।। अशी एक जन्मली वस्तु ही घउस । दग वळवाचा खचला पाउस ।।

केवळ पद्मिनीचा अंश । तुम्हीं लपटावें वाटते हौस । महीना थंडकाळ याचा पौष । राहिलीं हाडें गळालें मास । जसा वृक्ष वाळला तिउस । कीं सर्पानें केला डंश । वाटे निर्मुळ करसी वंश । भ्याला सूर्य पाहातां राहूस । अति विषयाचा झाला अंश । कांहीं तरी शके करसी । पोषाख जरीग० ॥ २ ॥ सुरत फांकडी नादर आजवा । सुकृत जन्मांतरींचा ठेवा । पूर्ण हरीची केली सेवा । तें फळ प्राप्त झालें दैवा । अवांतर नारी करतील हेवा । तारुणपण हा उघडा मेवा । परहातीं पडल्यावर मेवा । अशामधीं कांहीं विषक करावा । झुरा बावरा पाहून वरावा । खुप शत्रुचा गर्व हरावा । जैसा मैनाशीं लंपट रावा । जिकडे तिकडे होईल वाहवा । प्राण प्रियकर घेशील जेव्हां । जिवांत जीव घालशील तेव्हां । बऱ्हाणपुरी पोषाक नवा । किती घुंगट घेशी । पोषाख० ॥ ३ ॥ चंदना परी देहींचा सुगंध । निपट सुकुमार केळीचा कद । चुडे हातीं गजरे बाजुबंद । रुपानें चांगट रसिक मंद । पाहून जनलोकांशीं आनंद । तुझा लोकाशीं लागला छंद । नजर लोकांची झाली मंद । वाटतो तुशीं करावा फंद । गडे हा पूर्वीचा ऋणानुबंध । खुषीनें घडे देह संबंध । नेला रंगमहालीं फुलाचा गेंद । जरी पोषाख केसरी गंध । आली लोकांत नसे बेबंद । कवि नामीं विठ्ठलाचा कटि-बंध । परशराम यस्त्रू गातो छंद । हामेशा वाचींत गुण हावशी । पोषाख० ॥ ४ ॥

## लावणी १३२ वी.

निराकार आकार वानिसी गोष्टी सांगसी फार । बोल हृद-यीचे खोल अमोल शब्दीं नव चातूर ॥ धृ० ॥ प्रथमारंभीं गुण गंभीरा स्थीर करी चिंता । ओवाळिला शिव पार्वतीनें वद कोण्या वख्ता । आली पर्वणी कोण उजळुनी सिंहस्थ भरला नव्हता । शिव शक्तीनें केलि आरती । कोण वार होता । कुण्या योगावर ओवाळिलें । तिनें शिव नाथा । दोन प्रहर कीं प्रहर तिसरा कवण संधी होता । नाकळलें तर इथून पुढती शास्त्र देख आतां । बोल० ॥ १ ॥ वसुंधरेची वाटी केली एक कवीच्या सुता । शशि सूर्याच्या ज्योती केल्या । ही ईश्वर सत्ता । शृंगार करी पार्वती विभूत चुरी माता । अंशि पांढरी । चोळि सेला पांढराच होता । भंभं भोला वदनीं गीत गात होता । उभे उभयतां होते कोठें बोल चतुरा आतां । शास्त्रीं उलगडा असे जाहला । वेदावीण ना कविता । बोल० ॥ २ ॥ दुर्योधन नृप दुराचारी धृतराष्ट्र सुत होता । पतिव्रता सती छळित द्रोपदी माता । वैऱ्यानें तिसि जाव मारिला गेला भेदुन चित्ता । आज वहिनी पाळि कुणाची । सांगा ही वार्ता । द्रोप-दिनें शोक मांडिला । धाव भगवंता । आला वहिणिच्या कैवारास्तव त्रैलोक्य त्राता । शेषाची पाळी खुण सांगितली । धीर देउन पुरता । बोल० ॥ ३ ॥ शेष भोगाया भानु मातिला

नित्य येत असतां । वसुंधराही कोठें ठेवी । बोल चतुर गुणवंता ॥
शेषा पासुन सुटली कैसी दुर्योधन कांता ( अपूर्ण. )

## लावणी १३३ वी.

कसून तीर गेला उराशीं नवळी गवळी जशी नागन । प्राण-वल्लभे उभे तुजसाठीं प्रभे नभाचे भरलें गगन ॥ धृ० ॥ कटी बारीक वेताची जशी बोथाटी देखणी सरळ सडक । दाहीं बोटें रंगविलीं मेहंदी अनवट बिचवे पाई कडक । गोलदार हिरवी सेलारी नागपुरी नेसुनी भडक । तंग चोळी अंजिरी आंगामधें गच्च गढली खातसे तडक । उटी लेऊन बाजुबंद बाहुच्या मोठ्या मोठ्याच्या झडी सघन । कसून तीर० ॥ १ ॥ पाई रुळेरे मंजुळ साकळ्या घोळ मिऱ्याचा दामकरी । थरक मुरक नैनाचे मारशी तरतरीत दोन्ही गेंद उरीं । ढबदार मुर्ती मोत्यांची नथ सरजाची छान भरी । घ्या घालून उशाला कवळी कांत सकुमार सरी । रूप अगाजा पैजा घालून कधीं बघन । कसून तीर० ॥ २ ॥ मस्तकीं मुद राकडी फाकडी चापचोप मधें सदा । हास्यवदन जशी मदनपुतळी ठुमकत चालण्यांत सदा । बरंशा सरशी मारी नैनाची पाहून हजारो अलम फिदा । रस्तोरस्त मिळे तुज पाहती जन सोडुं हुद्दा । सारी सेना गजबजली बिजली जैसी लावी आगन । कसून तीर०॥ ३ ॥ घडो संग तुज फंद पडो हा हेत मनाचा मुरल कधीं । वेड लागलें जसें राजसे कसें करावें सांग आधीं । भर्मा भर्मीं वर्मी बोलतो जिवांत जीव घालशील जधीं ।

अभय भाष जर देशी खुषीनें पेल्लच साकर वाटूं तर्धी । नामीं विठ्ठल परशराम म्हणे जिवीं जिवाशीं लावी लगन । कसून वीर० ॥ ४ ॥

## लावणी १३४ वी.

रावसाहेब महाराज करावा इनसाफ गोष्टीचा । अल्परुपी घोडा हुस्वार । तो प्रताप ब्रीदाचा ॥ ध्रृ० ॥ अल्परुपी घोड्यावर्ती । निर्गुणाची स्वारी । सूर्यसूत पाहे कर्ण धार गेली त्याच्या द्वारीं । अष्टदिशीं फिरतो घोडा । चपळता भारी । गेला वर्नु छठायासी । तिथें दिसे नादकरी । घोड्या पुढें नार घाली पराक्रम तिचा । एक्या पल्लीमेळवीं । शिपाई स्वर्गाचा । रावसाहेब०॥१॥ दुसरा वारु तुला सांगतो । ऐक त्याची ख्यात । आसा गमनीं वारु उडवला । सुरेंद्र सभेंत । इंद्रासि घातलें पुढें । राव दुडदुडा धांवत । दोन पायीं घोडे पाहिले केलि सिरीदंत । तळीं उतरला वारु शिपाई । मदिला चुंबीत । अष्टादिशांमधिं फिरतो घेतो शोध उदकाचा । अग्निला भक्षितो अहार तो इथे छिपायाचा । रावसाहेब० ॥ २ ॥ तिसरा वारू तुला सांगतो कां पडली भ्रांती । स्वार झाली बाईल घोडा नाचवति गति इतकी । वारु उडविला तिनें सूर्यमंडळी माधि फिरती । कर्मे तिला पावाळिं घातली त्या घोड्या पुढती । तीन पाय वारुचे पाही बोल घे सुतीं । सप्तद्विपा हिंडतो घेतो शोध उदकाचा ।

रावसाहेब०॥३॥ गिरिजा पतिनें पुढें घातला जात ब्रह्म्याची । सीमा झाली धावतां वाट । नेलि सागरीची । ( अपूर्ण० )

## लावणी १३५ वी.

खणाणी जसा गजघाट असा बोभाट रुपाचा तुझा । हेत धरून मनीं आलों पहाया अटकर बांधा खुजा ॥ धृ० ॥ दंत दाळिंबेचे दाणे त्यावर दातवणाच्या चिऱ्या । नैन चकोर गरगराट फिरविती तीक्ष्ण जैशा सुऱ्या । सरळ नाक राव्याची चोंच मोती नथणीच्या तुऱ्या । शिशी शोभे मुखचंद्र राजसा सोळा आंगीं कुऱ्या । हिरवें पातळ उंच चंदेरी दाट खोविल्या निऱ्या । शुभ्र कंचुकी वक्षस्थळीं ही नारंग्या रसभऱ्या । सर्व भवताल्या उभ्या बायका थाट हजारों पऱ्या । त्याजमध्यें गनारी तूं एक मुखरण जशी झगागी हिऱ्या । पाहून नेत्र गपगपा झांकती कांठीं चमकल्या विजा । हेत धरून० ॥ १ ॥ अवयव आकृती रेखिली वोतप्रोत सारखी । निवडणार निवडील असेल रत्नाचा पारखी । कुलपी चुडे करीं हात सर कंकण आरक्त मेहंदी नखीं । सव्य हस्त सरसावी पदर आदरानें धरला मुखीं । पारीजातक परी सुवास कांति गौर वर्ण लखलखी । प्रदक्षणा करी वसंत पाहून होऊन अंतर सुखी । कटी पाहून ते सिंह लाजले वनांत फिरती दुखी । सकुळ निकळ तं निकोप अगदीं शब्दामध्यें नाहीं चुकी । स्वर ऐकून कोकिळा

दडाल्या गिरिकंदरी अनवुजा । हेत धरून मनीं आलों० ॥२॥ कीर्त ऐकिली कानीं त्याहून आगळी तूं शतगुणी । नख दृष्टी ना पडे घालितां अनंत जन्मीं धुणी । किती वर्णावी सीमा रुपाची पाहतां नापुरे धणी । झांक जरा मुखचंद्र फांकडे दृष्ट होईल तुज म्हणी । लावण्याची सकळ संपदा सहज उभी नवखणी । नेत्र जगाचे तटस्थ पाहुनि घायाळ घुमतां रणीं । अचेतासीं चेतवशील जरी इच्छा धरशी मनीं । महान महार्चीं तपें ढाळली मारक होशील गुणी । चंचळ अचपळ चालक रमणी आह्मी जाणून मूळबीजा । हेत धरून मनीं० ॥ ३ ॥ शब्द भेदला वर्मी बसला बाण जिव्हारीं जसा । इच्छा दासी मी चरणाची पुरवा परी राजसा । भीनीस्तव आपल्या सख्यारे जीव करपुन कोळसा । घरीं आला तुह्मी आतां मला मन भरल्या दाही दिशा । नामीं विठ्ठलाच्या जडणा घडणा रंग रसाच्या मुसा । उभा दंड पर एकच पाणी घेरंडा आणि उसा । आपल्या मोलानें विकतील खूण चतुराला पुसा । परशराम ह्मणे हा काळ निभला शाहिरकीचा ठसा । एक अभंगीं गाणें गाऊन येसू करी नित्य मजा । हेत धरून० ॥ ४ ॥

## लावणी १३६ वी.

डौल ज्वानीचा फूल गुलाबी रुप नादर गुलपरी । पाईं जोडवीं खणण वाजे नग चाळी तरतरी ॥ ध्रु० ॥ थाट नवे नीत होट लाल करी पानें खाउना सदां । असल शहरची

राहाणेवाली करी झुरक्यांतून अदा । जरी किनारी कोरदार तंग चोळीवर रंग उदा । उरीं उमटल्या नूतन गरसा झांकी पदर वरसुंदा ॥ चाल ॥ सहज उभी नटून सखी जशी वीज तुटून पडे वाटे । पाई रुमझुम परी जोडव्या विरोद्याचे नेटें । फरसबंदीवर हळू चालतां नथ नाकीं थरथरी । वांचीवशील तर वांचाव कांहीं धांवाधांवी करी । हौल ज्वानीचा० ॥ १ ॥ सडक पातळ विजना कंबर पितांबर नेसली । न्हाण आलें असेल अथवा येईल वय इतकी भासली । चटी पटी चाप चोपी मधें नवती मुसमुसली । दाट बांगड्या पाहती ताराऱ्या भरतां कळ सोसली ॥ चाल ॥ मोती भांगांत भरून । करून शृंगार कधीं येशी । सखे तुझी वाट धरून । भुलून राहिले कैक हावशा जखम इषकाची करून । लागली उरीं सुरी जैशी । देहभान विसरलों घसरलों झाला आशा पुरी जसा गज हस्ती अंदु लेऊन करी ठाणावर धुरी । हौल ज्वानीचा० ॥ २ ॥ देऊन विसरला रूप हे दाता हातीं चढशील कधीं । तुझा आपला संग घडल गडे कर ऐसी या मधीं । निर्पी नजर वर पहा जराभरने रंग महालामधीं । भर नवतीचा पुर मग वसरेल जशी कोरडी नदी ॥ चाल ॥ पंची आह्मी आलों दुरून । कीर्त तुझी ऐकु- निया कानीं । सकळ व[illegible]त तूं सगुण । गुण रत्नाची खाणी कंठ कोकिळा परी । स्वर ऐकून पडली मोहनी । एक एक तुझे बोल अमोल ऐकुन [illegible] । अशी ज्याला वस्तु लाधेल

कमाई त्याची पुरी। डौल ज्वानीचा॥३॥ इषर्काबाज इषकाची दर्दी साज करून होती उभी। कबुल सुरत खुप पाहून रिझली छेल छबिला खुबी। नजर विडा पाठविला सुचविली अतर खुण मनसुबी। आज रात्रीं या महालीं सखया पूर्ण हेत कर खुबी। चाल॥ करून खुण मुद्राशीं। चतुर गुणराशी घरीं नेला। आवड मनीं फार होती। भोगिला पुष्पाचा झेला। भोगिला भाव धरून नामीं विठ्ठलच्या या बोला। अटींतटीच्या जडणा घडणा परशराम नित्य करी। चंग रंग दंग एकुन झाले पळाले इरदास तरी। डौल ज्वानीचा० ॥ ४ ॥

## लावणी १३७ वी.

बोल आम्हाशीं झोल नको देउं तोल संभाळून पाहे पुढें। उदार मजवर दुधार आणवा पन्हेदार लेऊन चुडे॥ ध्रु०॥ लाल आंगावर शाल शोभली मशाल जैशी राजसभे। हाट तुसाठीं थाट दुरस्ता पहायाला जन दाट उभे। जखम जिव्हारीं भकम लागली रकम कानीं सोन्याचे झुबे। जर पदराला हातभर त्यावर बहार बहार अंतरीं क्षुभे। सजली बिजली थिजली मजालस गर्क पाहून जन बेडे। नथ सरजाला सुर्ती देणा गाला वरती प्रभा पडे। बोल आम्हाशीं० ॥ १ ॥ कवळी नवळी कटांत चवळी पिवळी कांति बुत घेऊन। कोण्या सभाग्याशीं अशी खाशा तनमन झालें गर्क पाहून। आसपास लई सुवास

जैसा कोस कोस परिमळा मोहून । रंभा कीं उर्वशी उमटल्या चर्का खर्का गेली लाऊन । हलक झाले खलक पाहून माल मवाशानें सुगंड । महान महानी तपें डाळिलीं जपी तपी फिरती उघड । बोल आह्माशीं० ॥ २ ॥ सुरताविना रंग मिना फिरविला मैना जशीं बोले करी । हार पुतळ्याचे भार गळाभर जवमाळा वर लेऊन सरी । गच्च गजरे पाटल्या दाटल्या आटल्या मोहरा अकबरी । धरी आवरुन लुगडें कुच उघडे किंचित् झांकुन पदर वरी । चोळी वसती पसंत केली वसंत पाहून बुद गडे । दोही बोटीं मुद्रिका दाटल्या लखलखीत वर रत्नाचे खडे । बोल आह्माशीं० ॥ ३ ॥ रूप नादर करी आदर सादर भ्रांती ती ठेऊन परती । आंगरुप मी छाया राया अमूच्या माया मजवरती ॥ चाल ॥ सख्या तूं झल्या फुलाच्या सगुण गुणाच्या मूर्ती । स्वस्थ असा राजसा आतां मी दासी पुढें सेवा करिती । विठ्ठल नामीं मनोरथ झाले मग विकले सोळा पाडे । परशराम येसू महादूचे खर अक्षर रूपयांत गडे । बोल आह्माशीं झोल० ॥ ४ ॥

## लावणी १३८ वी.

तिनसे कोस गांव येथून खोटें मानू नका । दों चव महिन्या मध्यें त्याचा लावुन द्यावा तुका ॥ धृ० ॥ त्या रायानें महाल

बांधला कितीक होता पैका । पोटीं नाहीं सुपुत्र कीर्ती करितो मृत्यू लोका । चाल । धन्य तो कारागीर । ज्यानें तयार केलें मंदीर । बंगले बुरजांवर गंभीर । मैरापीच्या सर्जा केल्या जशि दुसरी द्वारका । हिंदूची पंढरी तशि मुसलमानांची मक्का । निपुत्रिकाचा महाल सांगतां कृतानेरिं ऐका । औट पणावरि तेल जळतसे । पाहे कविच्या लेका । दों चव० ॥ १ ॥ कृतानेरिपरगणीं येतो गांवो गांवचा पैका । चाऱ्ही गल्ल्या एकसारख्या तिळभर नाहीं चुका । चहूं दिशानां । चौ दरवाजे । चौक साधला बांका । कारंजाचे तुषार उडती जागजागीं कवतुका । चाल । ही जागा असे धनंतर । तिथं पैका नाहीं कमजोर । जणुं नांदतसे धन कुबेर । संत सज्जन सेवा करिती । नवल त्याचें ऐका । आल्या दिसां भोगितो दिवस वाटावें कवीच्या लेका । दों चव० ॥ २ ॥ सर्वाठायीं माल गाडला । कष्टा विण पैका । परीस गवसला म्हणतो कोणी अत पार ना सुखा । कोणी म्हणतो किमया करतो योग साधला बांका । कोणी म्हणती संपतिसाठीं संतति बसला धक्का । चाल । सप्तपाताळ तें मंदीर । रंगमहाल त्याचेवर । तीन त्रिकुटाकार तळघर । ऐसीं हजार दीप जळती । नवलक्ष वाती ऐका । औटपल्लें कापुस वातिस । वेरिज कर नवसिका ।

दों चव ॥ ३ ॥ दर दीपामधिं तेल किती मोजुन कागदीं लेखा । किती वाती वजनीं सांगा । गुप्त ठेवू नका । औटमणाची नीट वांटणी । कदा पडेना चुका । औटपल्लें कापुस वातीस शास्त्राधार पक्का ॥ चाल ॥ ( अपूर्ण )

## लावणी १२९ वी.

रंग माहालावर उभी । खुबी कर छबी उघडल्या सजा । कवाळि कांत साजणी सकूमार अटकर बांधा खुजा ॥ धृ० ॥ कटी सिंहाची मान आजखा साज केला भरगच्ची । दागि-न्यांत खुप लुटपुट झाली लवली कर्दळी जशी । दोन्ही भवया कमाना कसुन रसून तिर नैनाचे मारशी । वाणी उदमी दुका-नदार सोडून घरदार पाहाया तुशी । सजदार सजवली सजली बिजली कोण कोणाची अशी । रंगमाहालावर उभी ॥ १ ॥ गेंद उरावर झोंक नोक आणि शोक उभी रेखली । तुटती रुपाचे तारे छनाछन अवांचत तुज देखली । मज पाहून तन झुल फुल मखमुल अंजेरी खुली । अत्तर लाऊन न्हालीस लटगा कंबर नांगीन डुली । पान खाऊन रंगेल अधर पदर घे सरसा लाजून जरा । बोलणें मधुर स्वर तार विण्याची अमदा-बादी तऱ्हा ॥ २ ॥

## लावणी १४० वी.

करीन लावणी । अलक्ष वेंचुनी । देवा पंढरीराया । अभेद गाणें । नामें तुझिया । गाईन मी ताराया ॥ धृ० ॥ दहि दुध प्यालों । हास खेळलों । नित्य हरीच्या फंदा । अति आवडता श्रीकृष्णाचा व्रजवासी मी पंदा । खत जाहलों । पुन्हा मनाला भेटावे गोविंदा । ह्मणून झालों । अभंग गाथा । नामयाचा गोंदा । जन्म दूसरा घेउनि भजलों । अखंड पंढरिराया । अभेद गाणें ॥ १ ॥ अभंग गाणें । अभंग पुजणें । अभंगाचा धंदा । अभंग केला । प्रपंच सगळी । अभंग झालो बंदा । बहु दिस झाले । ह्मणून गमले । पाहू मेघश्याम । आतां लावणी । करणे साठीं । झालों परशराम ।

## लावणी १४१ वी.

छेल छबीली नाजुक पुतळी उंबर कांहि एक वर्षांची । पुसावी कोण्या हवशाची ॥ धृ० ॥ देहकांति कर्दळीचा गाभा प्रभा तिच्या मुखचंद्राची । तूंच परी कां इंद्राची । नथ सरज्याला मोती सुढाळिक शहर सुर्ती बंद्राची । किंमत हजार पंधराशांची ॥ चाल ॥ शुद्ध दिसे खुप कद्राची । चपळ जैसी साळ इंद्राची । पर्वत मेरू मंद्राची । महान महांची तपें ढाळिलीं एकुलती एक नवशाची । पुसावी कोण्या हवशाची । छेल छबिली नाजुक०

॥ १ ॥ छडी फुलांची कंबर बारीक पितांबर नेसून नटली । जणूं गगना उविट तुटली । वर्ख सोनेरी तेज झळाळी हळदीनें केवळ उटली । नवांवध कंचुकी तटतटली ॥ चाल ॥ चैतन्याची मुस आटली । अंत कळेना आहे कुठली । त्रिगुण गुणाची मति खुटली । ती तालावर नित्य बैठका बिलोरी दो आरशाची । पुसावी कोण्या हवशाची । छेल छबिली० ॥ २ ॥ अनवट बिचवे पाई पोल्हारे वाक साकळ्या गज अंदु । खचित भासली जग भोंदु । अघटित जिचा खेळ दिसेना झांकून चाले मुख इंदु । ह्मणे एकली काशि नांदु ॥ चाल ॥ अथांग भरला गुणसिंधु । सदांच विषयामधीं धुंदु । ठाई पडेना मूळ कंदु । वचन फाकडें खुषिनें द्यावें लोभी जात पुरुषाची । पुसावी कोण्या हवशाची । छेल छबेली० ॥ ३ ॥ ज्याची त्यास लख लाभ असा आह्मी मुशाफर अकल्यारी । आह्मा निर्गुणीं मुखत्यारीं पहा बाहुलें जसें भिंतीवर चित्र काढतो चितारी । निराजिव सरजिव चितारी ॥ चाल ॥ लक्ष घालील काय पथारी । होय साह्य मज आतारी । सीव नदी तीरचा उतारी । नामीं विठ्ठल परशराम ह्मणे शिरा धन्य घडि हर्षाची । पुसावी कोण्या हवशाची । छेल० ॥ ४ ॥

## लावणी १४२ वी.

भवई कमान भारी अदाचीबाण गेली सररखी जगगना ॥ धृ० ॥ शालु रंग लाल वर पिंवळी दुशाल तिची

तऱ्हेदार । चाल । सारे जन पाहती भिराभिरा । अनारीदार तिची किनारीदार तंग चोळी शहरी तऱ्हा । चुर मदनांत लाल विडी वदनांत । खुप सुख सदनांत जशी कमान लवे करकरा । डव गाहिऱ्यांत उभी होती शयनांत खुप अदाची मारी लहरा । ॥ चाल ॥ स्वर्गीची जशी अप्सरा । फिरविशी नयन गरगरा । उभी राहून बोल कां जरा ॥ चाल ॥ दोन्ही गाल मखमूल । करी नवती तुलतुल । नारी हुल पडली सारी जनांत । भवई कमान० ॥ १ ॥

गजरे बाजुबंद लाऊनी रेशमी गाड दोन दोन । छातीवर गेंद अंगांत चोळी तडतडी । सरज्याची नथ तिची हिऱ्याची जोत खुप आणवा सुरत फांकडी । केश सदा सोनेरी । वरून कादूनी बुटी जरी नेसुन पैठणी शेलारी । तिची नवीन मोडली घडी । जवाची माळ हार मोती सुढाळ करी टाहो कोषाळ घडघडी ॥ चाल ॥ एकून भरली हुडहुडी तुजसाठीं शहरचे गडी । [illegible]ली कितीक देशोधडी । करी शब्दाचा मान । नको सोडूं इमान । तुजपुढें ठेविला मान । हा देह जावो अंगना भवई कमान० ॥ २ ॥ चुडा नक्षीदार । वरती तीधारी चाल । चाले गजभार फार । नार नटून । उठे घनघोर । फिरकी विरोधाला मोर । टाकी भुईवर पाय आपटून ।

ऱ्हेदार थाट । लक्ष मनुष्याचा हाट । नाहीं पहावयासी वाट ।
डोघर्डी जन पाहती उठून । खूप झाला धूर । दिला ईश्वरानें
पूर । जशी नदी भरली एकवटून ॥ चाल ॥ कैकांनीं पाहिलें
उटून । काम येईना कोणाचे पटून । गेले आपआपणामधें कटून ।
स्वरूपाची तार मारी फेंकून कटार जशी फिरंग दुधार । चम-
कली समरंगणां ॥ भ० ॥ ३ ॥ पती प्रियकर । उभे जोडूनी
दोन्ही कर । करी क्षमा मजवर । तुह्मी माझे प्राणवल्लभा ।
करी आदर मग धरी पदर । तुह्मी बृहस्पती मी सभा कृपा
न्याहाल मशीं करा बहाल । पहा रंगीत महाल । मग अवघी
दाऊन सभा । होऊनी अमळ धरी चरण कमळ देह भावें
वंदिलें नभा ॥ चाल ॥ विठ्ठल ज्ञानाचा गाभा । ते आलेत
पाहून सभा । काय लुग्याचा मनसुभा । परशरामाची तोड ।
मोठी विसणी खोड । जशी वतान्याची मोड । कोणी घेईना
दुप्पट वजना । तेजी विशारत गध्याशीं टोणपा । तसाच कामा
गना । भवई कमान० ॥ ४ ॥

## लावणी १४३ वी.

गणाधी गणपती गणेशा तुज नमो सद्गुरुदाता । धांवत
झडकरि येई माझा रंग राख आतां ॥ ध्रु० ॥ पूर्ण बोध आनंद
कंद सद्गुरु स्वामी महाराज । परेसि परता अलक्ष दाता ।
सकल गण शिरताज । प्रथम माया उभी राहिली कर जोडून

देवा तूज । सर्वांचा सुत्रधार तूं कळले न तिला गूज । निर्गुण होता सगूण झाला । कैवल्याचा तूं दाता ॥ धांवत झडकरी०॥ ॥ १ ॥ अनंतरूप अनंत अवतार । अनंत तुझे गुण गाती । ब्रह्मादिकांहि पार कळेना । इतरांची मग काय गती । एक्यांशी कोटी सवा लक्ष दश, सेवक तव गणपती । सहा, चव, अठरा ऋर्षा दिगंबर । कुंठित त्यांची झाली मती । माया चैतन्य विश्व तिच्यावर आहे तुमची सत्ता ॥ धांवत० ॥ ॥ २ ॥ अगाधाचा अगाध स्वामी ! तो निर्गुणचा रहिवासी । चौपदार्थीं केला रचना जीव पडला मायापाशीं । विश्वप्रपंचीं जीव गुंतले हिंडुं लागले चौऱ्यांशी । जिवा कारणें केले उपकार । देवा तुमची खुशी । ज्ञान भक्ति वैराग्य संगें घेउनियां अवधूता । धांवत झडकरी०॥ ३ ॥ पतित पावना दीन दयाळा मोक्ष पदाचा दाता । श्रीगुरु मुखें प्रसाद देउनि वास करी माझे चित्ता । नामें विठल विमल पाउलें हाच ध्यास चित्ता । परशराम ह्मणे त्याविण अखंडित भासे विन्मुखता । राम कृष्ण गुणिं रामा गाती येसु हार गुंफिं मुक्ता ॥ धांवत झडकरी० ॥ ४ ॥

## लावणी १४४ वी.

मुलाम रूप सोन्याचे तगट । असें हें जिकडे तिकडे प्रगट । चांगुलपण हे पद्मिनीचा मुगुट । सरमोत्याचे भराल काय

फुगट । नको धरूं शाहाणा बिसणी सगट । पाहून गुंडा त्याशीं लगट । आम्हीं जरी तुर्शी फरावी लगट । पोकळ गलका वाजेल जगेट । नारी ये समयीं येथून झुगट । स्थळ एकांतीं येऊनियां बिगट । ओळखुन मैत्रागिरांशीं लगट । अतिशितळा । सहज लागतां सुवर्ण मग तरी करशील काय पितळा । बरा पहात रुपानें नितळा । जोंवर बहार आहे प्रीयकर । दिलभार कर पाहून पुतळा ॥ १ ॥ गाल दोन्ही लाल नारंगी वनांत । वय द्वादश नूतन आली पणांत । जशी ताणून चिरली कनात । रुपडें खूप हवई भवनांत । राहा विषयाच्या योजनात । तरुणपण जाईल क्षणांत । जा कोणी ठसला असेल ध्यानांत । पकररतळा । नादर आदरावर नथ चमके आवर जरी पितळ । जोंवर बहार आहे प्रीयकर दिलभर कर पाहूर पुतळा । बरा पहा स्वरूपानें नितळा ॥ २ ॥ उरीं दोन्ही गेंद गुलाबी संगीत । वर कंचुकी ल्याली तंगतंगीत । मुखरण दोनवशाच्या ल्युंगीत । पाईं पोलारे नाद सारंगीत । पटली तुमच्या आमच्या सांगीत । बहु अनिवार चवळीच्या शेंगेत । पहावी अशी वस्तु वानगींत । द्यावी द्रव्याचा तुला । जोंवर बहार आहे प्रीयकर दिलभर कर पाहून पुतळा । बरा पहा स्वरूपानें नितळा० ॥ ३ ॥ मी राधा तुह्मी यदुराया । नका कल्पना धरूं तिळमाया । करूं नमन भागिर्थी समवाया । नेला रंगमहालीं मजा । जरी पाह्या मसालेदार मिठाई खाया ।

सोडले ध्यानू करुनियां गाथा । कवि नामीं विठ्ठल गुरुच्या पाया । प्रसाद यशवंता गर्जीत राया । परशराम लीन हरी गुणगाया । छंदबंद करुनियां । राहे वावी स्थळीं स्वरुपानें नितळा । जोवर बहार आहे मीयकर दिलभर कर पाहून भुलळा ॥ ४ ॥




प्रकाशकः--तुकाराम पुंडलीक शेट्य, बुकसेलर, माधवबाग-मुंबई.

-- - ---

मुद्रकः-तुकाराम सुर्याजी मशेकर, एस. रमण प्रेस, १६२४
गिरगांव बॅक [illegible] मुंबई नं.४.